श्री सयाजी साहित्यमाला-पुष्प १३८ वें.

[ प्रकीर्ण गुच्छ ]




# मुंबई इलाख्यांतील जाती

लेखक व प्रकाशक

**गोविंद मंगेश कालेलकर**

शहाबाग, बडोदें

मुद्रक

**अनंत आत्माराम मोरमकर,**

श्री लक्ष्मी-नारायण छापखाना

३६४ ठाकुरद्वार,

मुंबई नं० २

इ. स. १९२८ } **किंमत २-०-०** { प्रथमावृत्ति
संवत् १९८४ } { ५०० प्रती

# जाहिरात.

आपल्या देशी भाषेच्या साहित्याची अभिवृद्धि करण्याच्या सद्धेतूनें पतितपावन श्रीमंत सरकार महाराज साहेब श्री सयाजीराव गायकवाड, सेनाखासखेल, समशेर बहादूर, जी. सी. एस. आय., जी. सी. आय. इ., एलएल. डी. ह्यांनीं कृपावंत होऊन दोन लक्ष रुपयांची जी रक्कम अनामत ठेविली आहे, तिच्या व्याजांतून "श्री सयाजी साहित्यमालें"तून विविध विषयांवर पुस्तकें तयार करविण्यांत येत असतात.

तदनुसार मि. एन्थोवेन यांच्या इंग्रजी ग्रंथावरून हा "**मुंबई इलाख्यांतील जाती**" नामक ग्रंथ रा. रा. गोविंद मंगेश कालेलकर, बडोदें, यांचेकडून तयार करवून उक्त मालेंतील "प्रकीर्ण-गुच्छां"त १३८ वें पुष्प म्हणून प्रसिद्ध करण्यांत येत आहे.

| | | |
|---|---|---|
| भाषांतर शाखा<br>विद्याधिकारी कचेरी, बडोदें<br>ता. ६-७-१९२८ | मं. र. मजमुदार<br>भा. म. | **नं. के. दीक्षित**<br>विद्याधिकारी,<br>बडोदें राज्य, |

# उपोद्घात.

**प्रास्ताविक**

प्रस्तुत पुस्तक मे. आर्. इ. एन्थोवेन, सी. आय्. ई., आय्. सी. एस्. यांच्या Tribes and Castes of Bombay या ग्रंथाच्या आधारें तयार करण्यांत आलें आहे. तथापि त्यांत तें पुस्तक प्रसिद्ध झाल्यावर उपलब्ध झालेली कांहीं नवीन माहितीही घालण्यांत आलेली आहे. एन्थोवेन साहेब हे मुंबई इलाख्याच्या लौकिक पाहणी खात्याचे ( Eothnographical Survey ) सुपरिंटेंडेंट होते, व प्रस्तुत लेखक त्यांचा असिस्टंट होता. मूळ इंग्रजी ग्रंथांतील बहुतेक जातींचीं वर्णनें, गोळा केलेल्या माहितीवरून त्यानेंच तयार केलीं होतीं. हें काम करीत असतांनाच, ह्या विषयावर मराठींत एक विस्तृत ग्रंथ लिहावा असें त्याच्या मनांत आलें. परंतु फुरसतीच्या अभावीं त्या बाबतींत त्यास त्या वेळीं कांहींच करतां आलें नाहीं. पुढें कांहीं वर्षांनंतर त्यानें मे. नंदनाथ केदारनाथ दीक्षित, विद्याधिकारी, बडोदें, यांस आपला विचार कळवून, असा ग्रंथ तयार केल्यास तो आपल्या खात्यामार्फत प्रसिद्ध करण्यांत येईल काय, असें विचारलें. एवढ्या विस्तृत ग्रंथास मराठींत ग्राहक मिळणार नाहींत. आपण जर तो ग्रंथ सार रूपानें मराठींत तयार करून द्याल, तर श्री सयाजी साहित्यमालेंतून तो प्रसिद्ध करण्याची आपण व्यवस्था करूं, असें त्यांनीं सांगितलें, व तें प्रस्तुत लेखकानें कबूल केल्यावर त्याजकडे हें काम सोंपविण्यांत आलें.

प्रस्तुत पुस्तकांत मुंबई इलाख्यांत आढळणाऱ्या सर्व जातींची माहिती त्रोटक रूपानें दिली आहे. त्यावरून आपला समाज किती विस्कळित झाला आहे, याची कल्पना होईल. जातीजातींत परस्परांविषयीं वसत असलेले गैरसमज दूर होण्यासही त्याची बरीच मदत होईल.

वर्णन केलेल्या सर्व जाती एकाच खानेसुमारीच्या वेळीं गणल्या गेलेल्या नाहींत. त्यांची गणना दोन तीन खानेसुमारींत मिळून झालेली आहे. अशा स्थितींत जातींच्या संख्या दिल्या असतां त्यांत एकरूपता राहण्यासारखी नसल्यामुळें त्या दिलेल्या नाहींत. ज्यांस जातींच्या संख्या पहावयाच्या असतील त्यांनीं खानेसुमारीचे रिपोर्ट पहावे.

**जातींची उत्पत्ति**

हिंदुस्थानांत जातिभेद कसा उत्पन्न झाला, ह्याविषयीं अनेक विद्वानांनीं उहापोह केला असून, निरनिराळीं मतें प्रतिपादन केलेलीं आहेत. त्यांचें विवेचन ह्या लहानशा उपोद्घातांत करतां येणें शक्य नाहीं. स्थूलमानानें जातिभेदाच्या उत्पत्तीस पुढील गोष्टी कारणीभूत झाल्या असें म्हणता येईलः–( १ ) आरंभींची चातुर्वर्ण्यसंस्था, ( २ ) प्रादेशिक भेद, ( ३ ) धंद्यांमुळें झालेले भेद, ( ४ ) भाषेमुळें झालेले भेद, ( ५ ) राजसत्ताभिन्नत्वामुळें झालेले भेद, ( ६ ) धर्मपंथांमुळें झालेले भेद.

आरंभीं एकच वर्ण होता असें वर्णन भागवतांत आढळतें. पुढें यज्ञयागादि कर्मकांडाचा विस्तार जसा वाढूं लागला, तसा ब्राह्मणांचा वर्ण पृथक् होऊन, त्याच क्रमानें क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे वर्णही हळू हळू पृथक् झाले. परंतु सुरवातीस या सर्व वर्णांत परस्पर अन्नव्यवहार होत होता; इतकेंच नव्हे तर, अनुलोम विवाहही होत असत. तसेंच चातुर्वर्ण्याची उभारणी गुणकर्मांवर झालेली असल्यामुळें, गुणोत्कर्षानें कोणासही खालच्या वर्णांतून वरच्या वर्णांत जातां येत असे. अर्थात् हें चातुर्वर्ण्याचें स्वरूप हल्लींच्या जातिभेदाच्या स्वरूपाहून अगदीं भिन्न होतें. परंतु, कालेंकरून त्यांत फरक होऊन चार वर्णांचे चार अगदीं पृथक् समुदाय बनले व अन्नपानादि व्यवहारासही निर्बंध उत्पन्न झाले; इतकेंच नव्हे, तर एक एका वर्णांतही नवे नवे भेद उत्पन्न होऊं लागले.

प्रादेशिक भेद कसे उत्पन्न झाले हें पहावयाचें असल्यास ब्राह्मण

**प्रादेशिक भेद**

जातींकडे पहावें. सुरवातीस ब्राह्मणांची एकच जात होती. पुढें त्यांत वेद व शाखा यांवरून भेद झाले; व नंतर गौड व द्राविड हे दोन मोठे प्रांतिक भेद उत्पन्न होऊन, त्यांचे पुनः पंचगौड व पंचद्राविड, व त्या पांचांतील प्रत्येकांतही आणखी अनेक लहान लहान प्रादेशिक भेद झाले.

**धंद्यांमुळें झालेले भेद**

गुणकर्ममूलक चातुर्वर्ण्याची कल्पना सुटतांच प्रत्येक धंदा एक एक गुणकर्म बनून जितके धंदे तितक्या जाती झाल्या, व ह्या धंदेवाल्या जातींतही कारणपरत्वें भेद झाले.

**भाषेमुळें झालेले भेद**

प्रांतभिन्नत्वामुळें जसे भेद झाले आहेत, तसेच भाषाभिन्नत्वामुळेंही झाले आहेत; म्हणजे एकच धंदा करणारी जात निरनिराळ्या प्रांतांत राहिल्यामुळें जशी पृथक् जात बनलेली आहे, तशीच एकच धंदा करणारी पण निरनिराळी भाषा बोलणारी जात निरनिराळी बनलेली आहे.

**राजसत्ता-भिन्नत्वामुळें झालेले भेद**

एकाच जातींतील कांहीं लोक एका राजसत्तेखालील प्रदेशांतून दुसऱ्या राजसत्तेखालील प्रदेशांत रहावयास गेले, म्हणजे त्यांचा निराळाच समुदाय बनून त्यांची एक स्वतंत्रच जात बनल्याचीं अनेक उदाहरणें आढळतात. असें होण्याचें कारण, पूर्वकाळीं राजांचा अंमल जातिसंस्थांवरही चालत असून, जातींतील चालीरीतींसंबंधी कांहीं वाद उपस्थित झाला, तर त्याचा निर्णय तेच करीत

असत हें होय. अशा रीतीनें बनलेल्या पुष्कळ जाती गुजराथेंतील ब्राह्मणांत व वाण्यांत आणि इतर जातींतही आढळतात.

**धर्मपंथांमुळें झालेले भेद**

धर्मपंथांमुळें बनलेल्या जातींचीं ठळक उदाहरणें म्हणजे स्मार्त आणि वैष्णव ब्राह्मण होत. तसेंच लिंगायत पंथाचा स्वीकार केल्यामुळें बऱ्याच हिंदु जातींत लिंगायत जाती उत्पन्न झाल्या आहेत. मेश्री आणि श्रावक वाणी, तसेंच गुजराथेंतील दुसऱ्या कांहीं जातींत आढळणारे जैन विभागही, ह्याच स्वरूपाचे आहेत.

जातिभेदाच्या उत्पत्तीचीं वर जीं कारणें दिलीं आहेत, त्यांशिवाय चार वर्णांतील अनुलोम प्रतिलोम विवाह व त्यांचीं विविध मिश्रणें हेंही स्मृतिकारांनीं दिलेलें जातिभेदाचें कारण ग्राह्य मानण्यासारखें आहे. तसेंच परदेशांतून हिंदुस्थानांत आलेले शक, हूण, गुर्जर, आहिर वगैरे वंशाचे लोक व त्यांचें हिंदूंशीं झालेलें एकीकरण यामुळेंही कांहीं जाती निर्माण झाल्या आहेत.

**अस्पृश्य जाती**

येथपर्यंत जातिभेद कसा उत्पन्न झाला त्याचें संक्षिप्त दिग्दर्शन झालें. पण तें मुख्यतः स्पृश्य जातींसच लागू आहे. अस्पृश्य जातींसंबंधीं असें मत प्रचलित आहे कीं, आर्यांनीं जेव्हां हिंदुस्थानांत वसाहती केल्या, तेव्हां तेथील मूळ रहिवाशांस आपल्या वस्तीपासून दूर, गांवांच्या सीमेबाहेर जंगलांत, डोंगरांत वगैरे, हांकून लाविलें; व त्यांच्या माथीं अत्यंत गलिच्छ व हलक्या दर्जाचीं कामें लादलीं. व हळूहळू या कामामुळेंच त्यांस अस्पृश्य मानण्यांत येऊं लागलें. पुढें इतर जातींप्रमाणे अस्पृश्य जातींचेंही दृढीकरण झालें.

हिंदु समाजाचा विस्कलितपणा नुसत्या जाती उत्पन्न होऊनच थांबला नाहीं. पुष्कळ जातींत हळूहळू क्षुल्लक कारणांमुळें पोटभेद उत्पन्न होऊं लागले व तेही पुढें दृढ झाले. ह्या पोटभेदांत परस्पर बेटीव्यवहार बंद झाला, व कांहीं पोटभेदांत रोटीव्यवहारही बंद झाला. सारांश, खरी जात म्हणजे पोटभेदच होय.

पोटभेद

पोटभेदांनंतर शरीरसंबंधाच्या सोईसाठीं पाडण्यांत आलेल्या गोत्रादिकांचा विचार करावयाचा. गोत्रें फक्त ब्राह्मणांत व थोड्याशा क्षत्रिय जातींत आढळतात. वैश्य जातींत गोत्रांचा पूर्णपणें लोप झाला आहे. तथापि अलीकडे पुष्कळ जातींत आपणास उच्चत्व प्राप्त करून घेण्याची मनीषा उत्पन्न झाल्यामुळें, त्या गोत्रांचा स्वीकार करूं लागल्या आहेत, व कालेंकरून बहुतेक साक्षर जातींत गोत्रें उत्पन्न होतील अशीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत.

गोत्रें, कुळें वगैरे

ज्या जातींत गोत्रें नसतात त्या जातींत गोत्रांबद्दल कुळें असतात, म्हणजे ज्यांच्या कुळाचें नांव एकच असेल त्यांच्यांत शरीरसंबंध होत नाहीं. बऱ्याच जातींत हीं कुळें आडनांवांनीं दर्शविलीं जातात. कांहीं थोड्या जातींत कुळेंही नाहींत व आडनांवेंही नाहींत. अशा जातींत साधारणतः अमुक पिढ्यांच्या आंत लग्नसंबंध करूं नये अशा तऱ्हेचा प्रतिबंध असतो.

कानडा जिल्ह्यांतील कांहीं जातींत 'बळी' ह्या नांवाचे विभाग आढळून आले आहेत. बळींचीं नांवें बहुधा झाडें, पशु, पक्षी वगैरेवरून पडलेलीं असतात. ज्या वृक्षादिकावरून बळीचें नांव पडलेलें असतें, त्यास त्या बळीचे लोक पूज्य मानितात. ते त्याची पूजा करतात, कोणत्याच प्रकारें त्यास इजा करीत नाहींत, अथवा त्याचा कोणत्याच प्रकारें उपयोगही

बळी व देवकें

करीत नाहींत. एकाच बळीच्या लोकांत लग्नव्यवहार होत नाहीं. बळींशीं सदृश असे विभाग इतर बऱ्याच देशांतील मूळ रहिवाशांत आढळून आले आहेत, व त्यावरून, असे विभाग ज्या लोकांत आढळतात ते तेथील मूळ रहिवासी होत, असा सिद्धांत करण्यांत आलेला आहे. ह्यावरून कानडा जिल्ह्यांतील ज्या जातींत बळी आढळतात ते तेथील मूळ रहिवासी असले पाहिजेत हें उघड आहे. बळींशीं कांहींशीं सदृश अशीं देवकें महाराष्ट्रांतील कांहीं जातींत आढळत असल्यामुळें, व मराठ्यांतही देवकें आढळत असल्यामुळें, मराठेसुद्धां ह्या जाती महाराष्ट्रांतील मूळ रहिवासी आहेत, असें कित्येक मानितात. पण तें सर्वांशीं खरें असावें असें दिसत नाहीं. कारण, बळींइतकीं देवकें पूज्य मानण्यांत येत नाहींत; तसेंच पुष्कळ जातींत देवक एकच असलें तरी लग्नव्यवहार होऊं शकतो. दुसरी गोष्ट, बळी पूर्वीं मातृवंशाकडून गणला जात असे, व अजूनही कांहीं जातींत तो मातृवंशाकडूनच गणला जातो. देवकांची स्थिति तशी नाहीं.

**विवाह**

शिक्षणप्रसारामुळें व आर्थिक परिस्थिति बदलल्यामुळें, उच्चवर्णीय लोकांत विवाहाची वयोमर्यादा जरी बरीच वाढली आहे, तरी बहुजनसमूहांत अजून बालविवाहच रूढ आहे, इतकेंच नव्हे, तर कांहीं जातींत पाळण्यांतील मुलांचीं व कांहींत तर गर्भांतील मुलांचींही लग्नें लावण्यांत येतात! बहुपत्नीकत्वास शास्त्राची आडकाठी नाहीं. तथापि या सवलतीचा फायदा फक्त खालच्या जातींतील फारच थोडे लोक घेतात, असें दिसून येतें. ब्राह्मण, प्रभू, वाणी, अस्सल मराठे इत्यादि थोड्या जाती शिवाय करून इतर सर्व जातींत विधवाविवाह रूढ आहे. अलीकडे मात्र कांहीं जाती उच्च जातींत प्रवेश करण्याच्या इच्छेनें विधवाविवाहास प्रतिबंध करूं लागल्या आहेत. त्यामुळें एकीकडे ब्राह्मणादि

जाती विधवाविवाहास असलेले प्रतिबंध दूर करण्याची खटपट करीत असलेले दिसत असतां, दुसरीकडे ज्यांच्यांत विधवाविवाह पूर्वींच रूढ आहे, ते लोक ती रूढि बंद पाडण्याची खटपट करीत आहेत, असा विलक्षण देखावा दिसूं लागला आहे !

ज्या जातींत विधवाविवाह रूढ आहे, त्या जातींत सुद्धां विधवा-विवाह गौणच समजला जातो. हे विवाह बहुधा अंधाऱ्या रात्रीं अगदीं एकांत स्थळीं लावण्यांत येतात. त्यांचा विधीही अगदीं अल्प असतो. विवाहित विधवेस कोणत्याही धार्मिक कृत्यांत भाग घेतां येत नाहीं. अविवाहित पुरुषास विधवेशीं लग्न लावावयाचें असल्यास, त्यास प्रथम रुईशीं, शमीशीं, आंगठीशीं वगैरे लग्न लावावें लागतें.

गुजराथेंतील पुष्कळ जातींत विधवेनें मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न केलें पाहिजे असा सक्त नियम आहे. ही चाल प्राचीन काळच्या नियोगाचा अवशेष असावा असें दिसतें.

ज्या जातींत विधवाविवाहास मोकळीक आहे त्या जातींत सोडचिठ्ठी देण्याचा प्रघातही रूढ आहे. सोडचिठ्ठी देण्यास बायकोपेक्षां नवऱ्यास

**सोडचिठ्ठी.**

जास्त सवलत असते. नवराबायकोचें न पटणें, बायकोचें दुर्वर्तन वगैरे कारण सोडचिठ्ठीस लागतें. कांहीं जातींत सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रीस विधवा-विवाहविधीनें दुसरें लग्न करतां येतें, तर कांहीं जातींत नवरा जिवंत असेपर्यंत तिला दुसरें लग्न करतां येत नाहीं.

प्रत्येक जातीचीं कुलदैवतें जरी बहुधा भिन्न भिन्न असतात, तरी वास्तविक ईश्वर एकच आहे, ही समजूत अगदीं रानटी जाती शिवाय

**धर्म**

करून बाकी सर्व जातींत आढळते. तसेंच आपल्या कुलदेवतेस जरी जातीचे लोक विशेष भजतात, तरी इतरांच्या कुलदेवतांस ते भजत नाहींत असें नाहीं

मुसलमानांच्या पिरांसही अनेक जातींचे लोक भजतात. तीर्थयात्रा व देवतांचीं पवित्र स्थानें सर्वांस सारखींच पूज्य असतात. तसेंच पुनर्जन्म व कर्मवाद हे जे हिंदुधर्माचे विशेष, त्यांचें ज्ञान सर्व जातींच्या लोकांस असतें. सारांश, धर्माच्या बहिरंगांत जरी बराच फरक दिसतो, तरी सर्व हिंदूंच्या धार्मिक भावना एकाच स्वरूपाच्या असून, त्यामुळेंच सर्व हिंदु परस्परांशीं निगडित झालेले आहेत.

धर्मविधींच्या बाबतींत निरनिराळ्या जातींत निरनिराळे प्रकार आढळतात, तरी त्यांतील केवळ धार्मिक भागांत फारसा फरक नसतो.

बहुतेक सर्व जातींचे पुरोहित ब्राह्मण असतात. कांहीं खालच्या जातींत पुरोहिताचें काम जातींतील जाणते करितात. अलीकडे कांहीं जाती, समाजांत उच्च स्थान मिळविण्याच्या इच्छेनें, स्वज्ञातीचे पुरोहित तयार करूं लागल्या आहेत. ही प्रवृत्ति दिवसेंदिवस वाढत जाईल अशीं चिन्हें दिसत आहेत.

सर्व द्राविड ब्राह्मण, गुजराथेंतील कोळी, भिल्ल, धेड, भंगी, वाघ्री वगैरे शिवाय करून इतर सर्व जाती, तसेंच लिंगायत व जैन हे शाकाहारी आहेत. इतर सर्व जाती मत्स्य अथवा मांस भक्षण करितात. उच्च जातींशिवाय इतर सर्व जातींच्या लोकांस दारू पिण्यास प्रतिबंध नाहीं.

**आहार**

वरील विवेचनावरून जातिभेदाच्या उत्पत्तीची व सामाजिक चालीरीतींची स्थूल कल्पना होईल. जाति एकच असली म्हणजे सामाजिक चालीरीतींतही एकरूपता असते व समाज बळकट होतो. हिंदु समाजांत उत्पन्न झालेल्या हजारों जातींमुळें तो समाज किती विस्कलित व बलहीन झाला आहे, हें सांगण्याची गरज नाहीं. अर्थात् समाज

**जातिभेदाची अनिष्टता**

बळकट करावयाचा असेल तर, जातिभेद नष्ट केला पाहिजे हें उघड आहे.

**जातिभेद नष्ट करण्याचे प्रयत्न**

जातीभेद नष्ट करण्याचा प्रयत्न लिंगायत धर्मानें अकराव्या शतकांत केला. लिंग धारण करणारे सर्व मनुष्य समान आहेत, हें त्या धर्माचें एक मुख्य तत्त्व आहे. आरंभीं आरंभीं हें तत्त्व पाळण्यांत येत असे. पण पुढें जसजसा त्या धर्माचा जास्त प्रसार होऊं लागला, तसतसें हें तत्त्व बाजूस पडून जाति मोडण्याऐवजीं त्यानें शेंकडों नवीन जाति मात्र निर्माण केल्या ! हिंदूंच्या जातिभेदकल्पनेचा प्रभाव इतका कांहीं विलक्षण आहे कीं, केवळ लिंगायतांतच नव्हे, तर ख्रिश्चन व मुसलमानी धर्माच्या अनुयायांतही तिनें जाति उत्पन्न केल्या आहेत; इतकेंच नव्हे तर त्यांच्यांत अस्पृश्य जातीही उत्पन्न केल्या आहेत. दक्षिण हिंदुस्थानांत बाटून ख्रिश्चन झालेल्या लोकांत त्यांच्या मूळ जाति कायम राहून त्यांच्यांत रोटीबेटीव्यवहार होत नाहीं, व बाटलेल्या अस्पृश्यांची अस्पृश्यता ह्या बाटलेल्या खिस्ती समाजांत कायमच रहाते. उत्तर हिंदुस्थानांतील मुसलमान लोकांतही एक बराच मोठा अस्पृश्य वर्ग असून ह्या वर्गांतील लोकांस मशिदींत जाऊं देत नाहींत.

जातिभेद नष्ट करण्याचे आजपर्यंत जे प्रयत्न झाले, त्यामुळें जातिभेद नष्ट न होतां उलट नवीन जाति मात्र निर्माण झाल्या. असें होण्याचें कारण, ज्या दिशेनें प्रयत्न व्हावयास पाहिजेत त्या दिशेनें ते झाले नाहींत हें होय. हे प्रयत्न कसे करावयाचे हा विषय ह्या ग्रंथांतील प्रतिपाद्य विषयाच्या कक्षेंत येत नाहीं. तरी सामान्यत: असें म्हणतां येईल कीं, कोणतीही सामाजिक अनिष्ट चाल अथवा संस्था जर मोडावयाची असेल, तर ज्या क्रमानें ती अस्तित्वांत आली त्याच्या उलट क्रमानें हळूहळू

ती मोडीत गेलें पाहिजे. ह्या दृष्टीनें पाहिल्यास, जातिभेद नष्ट करावयाचा असेल, तर जातिभेद कसा उत्पन्न झाला त्याचें सूक्ष्म निरीक्षण करणें आवश्यक आहे असें दिसून येईल.

प्रस्तुत पुस्तकांत महाराष्ट्रांतील ब्राह्मणांच्या पोटजातींसंबंधींची माहिती श्री. महादेव शास्त्री दिवेकर यांच्या 'ब्राह्मणांतील पोटजातींचें एकीकरण' ह्या पुस्तकांतून घेतली आहे. त्यांनीं तिचा उपयोग करूं दिला याबद्दल ग्रंथकर्ता त्यांचा फार आभारी आहे.

गो. मं. का.

३०-८-२७



# जातींच्या नांवांची सूची.*



* मोठ्या टाईपांत दिलेलीं नांवें जातींचीं मुख्य नांवें असून त्या नांवांखालीं जातींचीं वर्णनें दिलीं आहेत. लहान टाईपांत छापलेलीं नांवें ज्या जातींचीं तीं नांवें आहेत त्या जातींच्या वर्णनांत दिलीं असून अकार विल्हेवारीप्रमाणें त्या त्या स्थळीं दिलीं आहेत.


PROF. ARTE'S PRIVATE LIBRARY. BARODA.

# मुंबई इलाख्यांतील जाती

**अकसाळी**—सोनारांस कानडा जिल्ह्यांत ' अकसाळी ' म्हणतात.

**अगसा**—सर्व कानडी जिल्ह्यांत व दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानांत आढळतात. ह्या जातीस असगा आणि मडिवाळ अशीं दुसरीं नांवें आहेत. अगसा आणि मडिवाळ या शब्दांचा अर्थ कपडे धुणारा असा असून ते धोबी व परीट या शब्दांशीं समानार्थक आहेत.

म्हैसूर संस्थानांत अगसांची वस्ती मोठी आहे. तेथील अगसांप्रमाणेंच मुंबई इलाख्यांतील अगसाही आपण 'वीरघटे मडिवाळ एश्वरम्' नांवाच्या पुरुषापासून उत्पन्न झालों आहों असें सांगतात. ते ख्रिश्चन, मुसलमान व अस्पृश्यांशिवाय इतर सर्व जातींच्या लोकांचे कपडे धुतात. त्यांच्यांत पुष्कळ बेडगू ( कुळें ) आहेत. एकाच बेडगूच्या स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. आतेबहिणीशीं व मामेबहिणीशीं लग्न करतां येतें. भावाभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करतां येतें. मुलींचीं लग्नें दहा वर्षांच्या पुढें व मुलांचीं लग्नें अठरा वर्षांच्या पुढें करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. जातीचे पंच व नातलग यांच्या अनुमतीनें सोडचिठ्ठी देतां येते. अगसा मुख्यत्वेंकरून शिव, केदारलिंग, सिधाई, यल्लम्मा, भवानी आणि मारुती यांस भजतात. त्यांचे उपाध्ये स्थानिक ब्राह्मण असतात. त्यांचे अंत्यविधि आणि विधवाविवाहविधि लिंगायत अगसांप्रमाणें असतात. पितरांच्या तृप्त्यर्थ ते महालय करितात.

अगसा मांस खातात व दारू पितात. त्यांचा दर्जा शेतकरीवर्गाखालीं व अस्पृश्यांवर असा आहे.

**अगसाळी**—पहा—सोनार.

**अट्ट वक्कल**—कानडा जिल्ह्यांतील अंकोला आणि यल्लापूर तालुक्यांतील दाट जंगलांत आढळतात. त्यांचे रीतिरिवाज, धर्मसमजुती, जातिपंचायत वगैरे सर्व कांहीं हलवक्की वक्कलांप्रमाणें आहे. पण हलवक्की वक्कलांप्रमाणें ते पाळींव जनावरांचें मांस खात नाहींत. त्यांचा परंपरागत धंदा कुरमी शेती करण्याचा व वेतकाम करण्याचा आहे. कुरमी शेतीस प्रतिबंध झाल्यापासून ते सुपारीच्या व लवंगांच्या बागांतून मजुरी करितात. जो हा धंदा सोडील त्याला जातिबहिष्कृत करण्यांत येतें. त्याला पुन: जातींत यावयाचें असल्यास जातींतील लोकांस जेवण द्यावें लागतें.

**अडवी चिंचर**—पारधी जातीचें दुसरें नांव.

**अतिशूद्र**—महार जातीचें दुसरें नांव.

**अलिटकर**—ह्यांस परदेशी अलिटकर किंवा सुलतानकर असेंही म्हणतात. ते अहमदनगर, खानदेश, नाशिक आणि पुणें जिल्ह्यांत व मुंबई शैहरांत आढळतात. ते अलियानें बकऱ्यांचीं कातडीं रंगविण्याचा धंदा करीत असल्यामुळें त्यांना अलिटकर हें नांव पडलेलें आहे. ते इकडील मूळचे रहिवासी नसून मारवाडांतून आलेल्या एकदोन कुटुंबांचे वंशज असावे असें दिसतें. तथापि इकडे त्यांच्या बऱ्याच पिढया गेलेल्या असल्यामुळें आजूबाजूच्या जातींतील लोकांच्या चालीरीतींचा त्यांच्यावर बराच परिणाम झालेला दिसतो.

**असगा**—अगसा ह्या जातीचें दुसरें नांव.

**अहिर**—ह्यांस आहिर असेंही म्हणतात. ह्यांची वस्ती मुख्यत्वेंकरून खानदेश, नाशिक, कच्छ, काठेवाड आणि पालनपूर येथें आहे. अहिर हें नांव संस्कृत आभिर ह्या शब्दाचा अपभ्रंश आहे. अहिर लोक, कृष्णाचे गोप व आपण एकच असून, आपलें मूलस्थान मथुरा व तिच्या आजूबाजूचा प्रदेश येथें आहे असें सांगतात. परंतु ते मुळांत मेंढपाळांची एक जात असून, कदाचित् अनार्य नसले तरी अहिंदु होते असें आतां बहुतांशीं सिद्ध झालेलें आहे. कालेंकरून त्यांचा हिंदूंत अंतर्भाव झाला आणि ते कृष्णोपासक बनले. ज्या जातींचा धर्म व धंदा एकच असतो, त्या मूळ एकच असल्या पाहिजेत अशी

समजूत प्रायः असल्यामुळें, अहिरांनीं जेव्हां गुरें पाळण्याचा आणि दूधदुभतें विकण्याचा धंदा स्वीकारला आणि ते कृष्णभक्त बनले, तेव्हां स्वाभाविकपणेंच ते आणि गोप हे एकच आहेत अशी समजूत होऊन ते गोपांत मिसळून गेले. इसवी सनाच्या चौथ्या शतकांत अहिरांचा खानदेश, नाशिक, काठेवाड, पालनपूर आणि कच्छ यांवर अंमल होता असा पुरावा उपलब्ध झाला आहे. आठव्या शतकांत काठी लोक जेव्हां गुजराथेंत आले, तेव्हां गुजराथचा बहुतेक प्रदेश अहिरांच्या ताब्यांत आहे असें त्यांस आढळून आलें. खानदेशांत तर अहिरांचें वर्चस्व बरेंच वाढलें होतें असें दिसतें. खानदेशांत असिरगड नांवाचा एक प्रसिद्ध किल्ला आहे. त्याचें हें नांव, असा अहिर म्हणजे अहिर राजपुत्र असा, ह्या नांवावरून पडलें आहे, असें फेरिस्ताचें म्हणणें आहे. ह्याच राजपुत्रानें तो किल्ला बांधला होता. तसेंच खानदेशांतील कांहीं खेड्यांतून मूळ समाजाशीं समान असा नवीनच अहिर समाज उत्पन्न झाला होता. आणखी, खानदेशांतील पुष्कळ कारागिरांच्या जातींत दोन पोटभेद आढळतात. मूळ जात हा एक पोटभेद आणि अहिर हा दुसरा पोटभेद. याप्रमाणें अहिर आणि अहिर ब्राह्मणांशिवाय तेथें अहिर सोनार, अहिर सुतार, अहिर लोहार, अहिर शिंपी, अहिर साळी, अहिर गुरव, अहिर कोळी इत्यादि पोटभेद आहेत. ह्यांपैकीं सुतार, सोनार, लोहार वगैरे कांहीं जातींत अहिरांचा पोटभेद अगदीं पृथक् राहिलेला आहे. अहिर सुतार आणि अहिर लोहार यांचा परस्पर बेटीव्यवहार होतो, परंतु त्यांचा सुतारांच्या आणि लोहारांच्या इतर पोटभेदांशीं बेटीव्यवहार होत नाहीं. दुसऱ्या जातींत अहिर त्यांच्याशीं पूर्णपणें मिसळून गेले आहेत व अहिर हें केवळ आडनांवच होऊन राहिलें आहे.

अहिरांमध्यें प्रांतिक स्वरूपाचे दोन पोटभेद आहेत. ( १ ) कच्छ व काठेवाडांत राहाणारे आणि (२) दक्षिण महाराष्ट्रांत राहाणारे. यांतील पहिल्या विभागानें गोपालांचा धंदा बहुतेक सोडून दिला असून ते हल्लीं बहुधा सुतारकाम व शेती करितात. कित्येकांकडे लहान लहान जमिनींची मालकीही आहे. त्यांच्यांत बोरिचा, चोरिडा, मछुआ, प्रांथलिया आणि सोरठिया असे प्रांतिक स्वरूपाचे पोटभेद आहेत. यांशिवाय काठेवाडांत आणखी दोन पोटभेद

आढळतात. त्यांतील एक गुजर अहिर या नांवानें ओळखला जातो. हे शहरांत राहातात. दुसऱ्यांस नेसाक अहिर असें म्हणतात. हे नेस म्हणजे लहान लहान वाड्यांतून राहातात.एकत्र आडनांव असलेल्या कुटुंबांत शरीरसंबंध होत नाहीं. मुलांमुलींचीं लग्नें बारा ते पंधरा वर्षांच्या दरम्यान होतात. अहिरांचीं लग्नें प्रत्येक वर्षी एका ठराविक दिवशीं होतात. विधवेस मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न करावें लागतें. ते गीरमधील तुळशीश्यामास (लक्ष्मी आणि कृष्ण) आणि देवीस भजतात. स्थानिक देवतांमध्यें ते हब्बा टेंकडीवरील हब्बेस आणि वाचरा नांवाच्या रजपूत साधूस भजतात. लग्नविधि चालविण्याच्या कामीं ते पराजिया ब्राह्मणांची योजना करितात. हे ब्राह्मण अहिरांच्या हातचें अन्न खातात. त्यांस पतित मानण्यांत येतें.

कच्छ व काठेवाडांतील अहिर मांस खातात व दारू पितात.

महाराष्ट्रांतील अहिर बहुतांशीं आपला मूळ धंदाच करितात. त्यांच्यांत (१) भरवथिया, (२) धिडामवर, (३) घोसी, (४) गोआलबन, (५) गुजर आणि (६) रोमाबन या नांवाचे सहा पोटभेद आहेत. खानदेशांतील अहिरांत देवकांचे अवशेष आढळतात. दोम पिढ्यांच्या आंत शरीरसंबंध होत नाहीं. भावाभावांस बहिणीबहिणींशीं लग्न करतां येतें. मुलांचीं लग्नें बहुधा बारा ते वीस वर्षांच्या दरम्यान करितात. मुलींचीं लग्नें लहानपणीं अथवा वयांत आल्यानंतरही करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. विधवेस मृत पतीच्या धाकट्या भावाशीं अथवा चुलत भावाशीं लग्न करावें लागतें. सोडचिठ्ठी देतां येत नाहीं. कच्छ व काठेवाडांतील अहिरांप्रमाणेंच महाराष्ट्रांतील अहिरही कृष्ण आणि लक्ष्मी यांसच मुख्यत्वेंकरून भजतात. ते आपले धर्मविधि चालविण्याच्या कामीं हिंदुस्थानी ब्राह्मणांची योजना करितात. हिंदुस्थानी ब्राह्मण नच मिळाल्यास स्थानिक ब्राह्मणास बोलावितात.

ते मांस खातात व दारू पितात.

**अंत्यज**—महार जातीचें दुसरें नांव.

**अंबिग**—कब्बलिगर जातीचें दुसरें नांव.

**अंबी**—कब्बलिगर जातीचें दुसरें नांव.

**अंबेकर**—कव्वलिगर जातीचें दुसरें नांव.

**आगले**—आग्री ह्या जातीचें दुसरें नांव.

**आग्री**—ह्यांस आगले किंवा खारपाटील असेंही म्हणतात. हे मुख्यत्वें-करून ठाणें व कुलाबा जिल्ह्यांत व जंजिरा संस्थानांत आढळतात. आग्री नांव आगर ह्या शब्दावरून पडलेलें आहे. खारपाटील हें नांवही त्यांच्या मीठ तयार करण्याच्या धंद्यावरूनच पडलेलें आहे. आग्री आपणास क्षत्रिय किंवा खत्री म्हणवितात. आपण मूळचे मुंगी पैठणचे राहाणारे असून, बिंब राजानें आपणांस कोंकणांत आणलें, अशी दंतकथा त्यांच्यांत प्रचलित आहे. बिंब राजानें आपणांपैकीं कित्येकांस सनदाही दिल्या होत्या असें ते सांगतात. पण ह्या सनदा अजून उपलब्ध झालेल्या नाहींत. त्यांच्या बांध्याची ठेवण, त्यांचा कृष्णवर्ण, त्यांची दारूची अत्यंत आवड व अब्राह्मण देवतांवरील त्यांची निष्ठा यांवरून ते अनार्य असावे असें दिसतें. मॅकिंटॉश आणि विल्सन हे दोघेही त्यांस कोळ्यांच्या बरोबरीनें लेखितात.

ह्या जातींत ( १ ) शुद्ध आग्री, ( २ ) दस आग्री आणि ( ३ ) उरप अथवा वरप आग्री असे तीन पोटभेद आहेत. शुद्ध आग्र्यांस मीठ आग्री ( मीठ करणारे ), जस आग्री ( ताडी काढणारे ), ढोल आग्री ( ढोल वाज-विणारे ) सोन आगले आणि पाण आगले असेंही म्हणतात. उरप अथवा वरप आग्र्यांस नवा मराठा असेंही म्हणतात. हें नांव पडण्याचें कारण त्यांस पोर्तुगीजांनीं बाटवून ख्रिश्चन केल्यानंतर ते पावन होऊन पुनः हिंदु धर्मांत आले हें होय.

एकच आडनांव असलेल्या स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. पांच पिढ्यांच्या आंत लग्नें होत नाहींत. लग्नें लहानपणीं व वयांत आल्यानंतरही होतात. विधवाविवाहास मोकळीक आहे. स्त्रीस कोड उद्भवल्यास किंवा ती दुराचारी निपजल्यास तिला सोडचिठ्ठी देतां येते. आग्री लोक मुख्यत्वेंकरून खंडोबा आणि बहिरोबा ह्या देवांस भजतात. त्यांच्या अंत्यविधींतील कांहीं प्रकार आणि इतर रीतिभाती यांवरून एके काळीं लिंगायत धर्माचा पगडा त्यांवर बसला होता असें दिसतें. लग्नविधि व अंत्यविधि चालविण्याच्या कामीं

ते कोंकणस्थ किंवा देशस्थ ब्राह्मणांची योजना करितात. कित्येक ठिकाणीं त्यांचे अंत्यविधि लिंगायत चालवितात. मृतांस जाळण्यांत व पुरण्यांतही येतें. ते श्राद्धें करितात.

ह्या जातीचा मूळ धंदा मीठ करण्याचा होता असें कित्येकांचें म्हणणें आहे, व कित्येक ते मूळचे शेतकरी होते असें सांगतात. त्यांच्यांतील कांहीं लोक सुतारकाम, गवंडी काम, वगैरे धंदे करितात, पण त्यांच्यांतील बहुजनसमाज शेतीचाच धंदा करितो.

ते मांस खातात व दारू पितात.

**आगेर**—मुख्यत्वेंकरून कानडा जिल्ह्यांत आढळतात. त्यांच्यांत सहा बळी आहेत. ते असे:—

| | |
|---|---|
| १ अज्जन बळी ... ... | अग्गा=एका झाडाचें फळ |
| २ अने बळी... ... ... | अने=हत्ती |
| ३ कडविन बळी ... ... | कडवे=सांबर |
| ४ यावन बळी... ... ... | याव=कांसव |
| ५ शिरिन बळी ... ... | शिरे=एक प्रकारचें झाड |
| ६ गुरविन बळी ... ... | गुरुव=एक कांटेरी झाड |

अने बळीचे लोक हत्तीची पूजा करितात आणि हस्तिदंताचे दागिने वापरीत नाहींत. कडविन बळीचे लोक सांबराची शिकार करीत नाहींत व त्याचें मांसही खात नाहींत. यावन बळीचे लोक कांसव खात नाहींत. इतर बळींचे लोक, ज्या झाडांवरून त्यांचीं नांवें पडलेलीं आहेत तीं झाडें तोडीत नाहींत, अथवा त्यांस इजाही करीत नाहींत. ह्या प्रमाणांवरून आगेर लोक हे शुद्ध द्रविड वंशांतील आहेत असें अनुमान होतें. बळी पितृवंशाकडून गणला जातो.

एकाच बळीच्या स्त्रीपुरुषांचीं लग्नें होत नाहींत. मामेबहिणीशीं लग्न करितां येतें. आतेबहिणीशीं अथवा मावसबहिणीशीं लग्न करितां येत नाहीं. भावाभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करितां येतें. मुलींचीं लग्नें सहा ते अकरा वर्षांच्या दरम्यान व मुलांचीं सहा ते पंचवीस वर्षांच्या दरम्यान करितात. विधवा-विवाहास मोकळीक आहे. अविवाहितास विधवेबरोबर लग्न करतां येत नाहीं.

स्त्री दुराचारी निघाल्यास तिला सोडचिठ्ठी देतां येते. आगेर मुख्यत्वेंकरून कृष्णास भजतात. ते धर्मविधींच्या कामीं ब्राह्मणांची योजना करीत नाहींत. त्यांचे सर्व धर्मविधि जातींतील बुधवंत ( जाणते ) चालवितात. मृतांस जाळण्यांत अथवा पुरण्यांतही येतें. मृतांच्या तृप्त्यर्थ दर अमावास्येस आणि सणाच्या दिवशीं त्यांस भात आणि मासे केळीच्या पानावर ठेवून अर्पण करण्यांत येतात. आगेरांचा वंशपरंपरागत धंदा मीठ करण्याचा आहे. ते शेतावर मजुरीही करितात.

ते मांस खातात व दारू पितात.

**आराधी**—ह्यांची संख्या फार लहान असून ते मुख्यत्वेंकरून पुणें, खानदेश व सातारा जिल्ह्यांत आढळतात. ह्या पंथांत ब्राह्मणांपासून महारमांगांपर्यंत सर्व जातींच्या हिंदूंस आणि मुसलमानांसही घेण्यांत येतें. एखाद्यास मूल होत नसलें, म्हणजे तो मूल झाल्यास तुला अर्पण करीन, असा भवानीस नवस करतो. कोड, रक्तपिती, क्षय वगैरे रोगांनीं पीडलेले कांहीं लोकही, रोगमुक्त झाल्यास आराधी होऊन तुझी सेवा करूं, असा भवानीस नवस करतात. अशी प्रकारच्या स्त्रीपुरुषांचा या पंथांत समावेश होतो. आराधी पुरुष आपल्या जातीच्या स्त्रियांशीं लग्न करितात. आराधिणींस लग्न करतां येत नाहीं. आराधी "यमाई तुकाईचा जोगवा" असें म्हणत दारोदार भिक्षा मागून उदरनिर्वाह करितात. त्यांच्या रीतिभाती ज्यांच्या त्यांच्या मूळ जातींप्रमाणेंच असतात.

**आलकरी**—मुख्यत्वेंकरून खानदेश जिल्ह्यांत आढळतात. ते आपणास रजपूत म्हणवितात, आणि मुसलमानांनीं जेव्हां चितोड जिंकलें तेव्हां आपण त्यांचा छळ चुकविण्यासाठीं दक्षिणेंत आलों असें सांगतात. लग्नाच्या वेळीं रजपुतांप्रमाणें ते माणकस्तंभ रोवून त्याची पूजा करितात आणि त्यांची कुलदेवी चितोडची भवानी आहे, एवढेच रजपुतांच्या चालीरीतींचें अवशेष त्यांच्यांत सांपडतात. दक्षिणेंत येऊन स्थाईक झाल्यानंतर ते अलित्याचा रंग करून उपजीविका करूं लागल्यामुळें त्यांस आलकरी असें नांव पडलें. त्यांस गोलालारे आणि श्रावगी असेंही म्हणतात.

आलकऱ्यांत खारोबाबा, मिठाबा, कच्छवासी, मालाबंजारी आणि उयाफ-लोंद असे पांच पोटभेद आहेत. त्यांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. एकाच कुळांतील स्त्रीपुरुषांत आणि चारपांच पिढ्यांच्या आंत शरीरसंबंध होत नाहीं. आतेबहिणीशीं, मामेबहिणीशीं किंवा मावसबहिणीशीं लग्न करतां येत नाहीं. भावाभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करतां येतें. लग्नें लहानपणीं अथवा वयांत आल्यानंतरही होतात. विधवाविवाहास मोकळीक आहे. अविवाहितास विधवेशीं लग्न करावयाचें असल्यास त्यास प्रथम आंगठीशीं लग्न करावें लागतें. सोडचिठ्ठी देतां येते. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रीस विधवाविवाहविधीनें दुसरें लग्न करतां येतें.

आलकरी शिवोपासक आहेत. कांहीं वारकरी व रामदासी पंथाचे अनुयायी आहेत असें सांगतात. ह्या जातींतील बहुजनसमाज आपणास उपाध्ये नाहींत असें सांगतो, तर कांहीं धर्मविधि चालविण्यास आपण ब्राह्मणांस बोलावितों असें सांगतात. विवाहित मृतांस जाळण्यांत येतें. अविवाहितांस पुरतात. मृतांच्या शांत्यर्थ श्राद्धें करण्यांत येतात.

ह्या जातीचा मूळ धंदा अलिऱ्यापासून लाल रंग तयार करण्याचा होता. परदेशांतून ॲनिलाइन रंग येऊं लागल्यापासून यांचा धंदा बसला असून, तेव्हांपासून पुष्कळ लोक शेतकी व मजुरी करूं लागले आहेत. कांहीं सरकारी नोकरींत आहेत.

आलकरी मांस खातात व दारू पितात.

**आर्य दक्षिणी वैश्य**–कुडाळे वाण्यांचें दुसरें नांव.

**आर्य वैश्य**–कुडाळे वाण्यांचें दुसरें नांव.

**आहिर**–अहिर जातीचें दुसरें नांव.

**इलिगेर**—हे मुख्यत्वेंकरून धारवाड, विजापूर आणि बेळगांव जिल्ह्यांत आढळतात. ह्यांस कलाल आणि शिंदीगार असेंही म्हणतात. ते ताडी काढण्याचा धंदा करितात. त्यांच्यांत कौडण्य, कारुण्य, कातुण्य आणि वाच्छल्य असे चार पोटभेद आहेत. यांतील पहिले दोन परस्परांशीं रोटीबेटीव्यवहार करतात, पण ते तिसऱ्या व चौथ्या पोटभेदाशीं रोटीबेटीव्यवहार करीत

नाहींत.* त्यांच्या कुलदेवता बसव, तुळजाभवानी, हनुमान, यल्लम्मा आणि रतनराय ह्या होत. त्यांचा धर्मगुरु अजय्या नांवाचा लिंगायत असतो. धर्मविधि चालविण्याच्या कामीं ते ब्राह्मण आणि जंगम ह्या दोघांचीही योजना करितात. ते लिंगायतांप्रमाणें मृतांस पुरतात. त्यांचे इतर विधि कब्बलिगरां-प्रमाणें असतात. ते मांस खातात. विजापुराबाहेरील इलिगेर दारू पीत नाहींत. ताडास ते आपली बहीण मानतात, म्हणून ते ताडी केव्हांही पीत नाहींत.

**उचल्या**—भामटा ह्या जातीचें दुसरें नांव.

**उप्पार**—मुख्यत्वेंकरून बेळगांव, विजापूर आणि कानडा जिल्ह्यांत आढळतात. ह्या जातीचा मूळ धंदा मीठ करण्याचा होता. त्यावरूनच त्यांस उप्पार (उप्पू=मीठ) हें नांव पडलेलें आहे. हल्लीं तें गवंडीकाम व पाथरवटाचें काम करून उपजीविका करितात.

उप्पारांत नामद, कतनी किंवा कोळी आणि लिंगायत असे तीन पोटभेद आहेत. त्यांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. नामद उप्पार जानवें घालतात व मांस खात नाहींत. उप्पारांतील बहुजनसमाज कतनी आहेत. लिंगायत धर्माचा स्वीकार केलेल्या उप्पारांस लिंगायत उप्पार म्हणतात.

बेळगांव व विजापूर जिल्ह्यांतील उप्पारांत नऊ बेडगू आहेत. ह्या जातीचा मूळ पुरुष नामगोपाळ म्हणून कोणी होता. त्याच्या नऊ मुलांपासून हे नऊ बेडगू झालेले आहेत. एकाच बेडगूंतील स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. कानडा जिल्ह्यांतील उप्पारांत सात वळी आहेत. ते असेः—

| | | | |
|---|---|---|---|
| १ यावन | ... | ... | कांसव |
| २ गंगा | ... | ... | गंगावळी नदी |
| ३ होले | ... | ... | एक प्रकारचें झाड |
| ४ शेट्टी | ... | ... | मासा |
| ५ तोळण | ... | ... | लांडगा |
| ६ नाग | ... | ... | चांफा |
| ७ अम्मना | ... | ... | अम्मादेवी |

आतेबहिणीशीं, मामेबहिणीशीं किंवा मावसबहिणीशीं लग्न करतां येत नाहीं. भावाभावांस बहिणीबहिणींशीं लग्न करतां येतें. मुलींचीं लग्नें वयांत येण्यापूर्वी करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. अविवाहितास विधवेशीं लग्न करतां येत नाहीं. सोडचिठ्ठी देतां येते.

उप्पार विशेषेंकरून यल्लमा, हुलिदेव, हनुमान, व्यंकटरमण आणि वीरभद्र यांस भजतात. त्यांचे उपाध्ये देशस्थ किंवा कर्नाटकी ब्राह्मण असतात. नामद उप्पार मृतांस जाळतात, कतनी उप्पार पुरतात. मृतांचें चांदीचे मुखवटे करून त्यांची घरांतील देवांत स्थापना करतात. त्यांच्या शांत्यर्थ वैशाख महिन्याच्या शुद्ध तृतीयेपासून आश्विन महिन्याच्या शुद्ध नवमीपर्यंत कोणत्या तरी एका दिवशीं या मुखवट्यांची पूजा करून त्यांस वस्त्रें अर्पण करण्यांत येतात.

कतनी उप्पार मांस खातात व दारू पितात.

**ओड**—सर्व इलाखाभर आढळतात. त्यांस बेलदार, ओड्डे, वोड्डे, वड्डर वडार आणि ओड्डे असेंही म्हणतात. ओड देश किंवा ओरिसा याच्याशीं त्यांचा कांहीं तरी संबंध असावा असें दिसतें. दगडमातींत काम करणारी ही जात सर्व हिंदुस्थान देशभर पसरलेली आहे. ओड किंवा वड्डा हा शब्द कानडी भाषेंतील ओड्डू म्हणजे सांधणें ह्या शब्दावरून निघाला आहे असें सर्वसाधारण मत आहे. बेलदार हा शब्द फारसी बेल म्हणजे पिकांव ह्या शब्दावरून निघाला आहे. कानडी जिल्ह्यांतील ह्या जातीच्या लोकांची भाषा आणि चाली-रीति यांवरून ही जात मूळची द्रविड असावी असें दिसतें. परंतु जेथें जेथें ह्या लोकांच्या कामाची जरूर असते, तेथें तेथें ती आढळत असल्यामुळें, तिच्यांत दुसऱ्या पुष्कळ जातींच्या लोकांची भरती झाली आहे ह्यांत शंका नाहीं. इतर पुष्कळ जातींप्रमाणें ते आपण क्षत्रियोत्पन्न आहों असें म्हणतात. परंतु त्यांची जात उद्योगप्रधान आहे हें अगदीं स्पष्ट असून, त्यांची वस्ती अत्यंत दूरदूरच्या प्रदेशांत असल्यामुळें, त्यांची उत्पत्ति भिन्न भिन्न प्रकारांनीं झाली आहे हें निःसंशय आहे. कानडा जिल्ह्यांतील वड्डर अजूनही कुरुबा, कम्मार इत्यादि आपल्यापेक्षां श्रेष्ठ जातींच्या लोकांस आपणांत घेतात, यावरून हेंच सिद्ध होतें.

मुंबई इलाख्यांतील ओडांत (१) मराठा आणि कानडी, (२) गुजराथी आणि (३) परदेशी असे प्रांतिक स्वरूपांचे तीन पोटभेद आहेत.

मराठा आणि कानडी ओडांत चार पोटभेद आहेत. त्यांचीं मराठी नांवें (१) भोज किंवा उरू, (२) माती (३) दगड किंवा पाथरट आणि (४) गाडी, जात किंवा जांतीं अशीं आहेत; आणि कानडी नांवें (१) भोज किंवा उरू, (२) मन्नू, (३) कल्लू, (४) भंडी किंवा बैल अशीं आहेत. उरू ओड कोळसे आणि सिमिट करून विकतात. माती किंवा मन्नू ओड मातीचें काम करितात. दगड किंवा कल्लू ओड पाथरवटाचें काम करितात. गाडी किंवा भंडी ओड खटारे हांकतात आणि जांतीं करितात. भोज ओड इतर तीनही पोटभेदांतील लोकांशीं रोटीबेटीव्यवहार करीत नाहींत. बाकीचे तीनही पोटभेद परस्परांशीं रोटीव्यवहार करतात, पण बेटीव्यवहार करीत नाहींत. कानडी जिल्ह्यांतील ओडांत बेडगू आणि मराठी जिल्ह्यांतील ओडांत कुळें आहेत. एकच बेडगू अथवा कूळ असलेल्या स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं आतेबहिणीबरोबर व मामेबहिणीबरोबर लग्न करतां येतें. भावाभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करतां येतें. विधवाविवाहास मोकळीक आहे. सोडचिठ्ठी देतां येते.

मराठा आणि कानडी ओड सर्व हिंदु देवतांस भजतात. त्यांचीं कुलदैवतें व्यंकटरमण, नरसोबा, महादेव, मारुती, जनाई, सटवाई, मुरगव्वा, नागम्मा आणि यल्लम्मा हीं आहेत. त्यांचे सर्व धर्मविधि जातींतील जाणते चालवितात. मृतांस कित्येक जाळतात, कित्येक पुरतात. मृतांच्या तृप्त्यर्थ त्यांस वर्षप्रतिपदेच्या दिवशीं, नवरात्रांतील एखाद्या दिवशीं किंवा दुसऱ्या कोणत्याही शुभ दिवशीं, वस्त्रें व बकरें आणि कोंबडीं अर्पण करण्यांत येतात.

मराठा आणि कानडी ओड गोमांसाशिवाय बाकी सर्व प्रकारचें मांस खातात. ते दारू पितात.

गुजराथी ओड आपण महाराष्ट्रांतून गुजराथेंत आलों असें सांगतात. त्यांच्यांत रामदासी पंथाचे कांहीं लोक आहेत, यावरून हें म्हणणें खरें दिसतें. त्यांच्यांत ओड व नवाभाई म्हणजे नवीन आलेले असे दोन पोटभेद

आहेत. त्यांचा परस्परांशीं रोटीव्यवहार होतो, पण बेटीव्यवहार होत नाहीं. नवाभाई आपल्या जातींत कोळ्यांस व त्याच दर्जाच्या इतर जातींतील लोकांस घेतात. गुजराथी ओडांत रजपुतांतील कुळांप्रमाणें कांहीं कुळें आहेत. आते-बहिणीशीं, मामेबहिणीशीं किंवा मावसबहिणीशीं लग्न करितां येत नाहीं. मुलींचीं लग्नें बहुदा चौदा ते अठरा व मुलांचीं वीस ते पंचवीस वर्षांच्या दरम्यान करितात. त्यांच्यांत हुंड्याची ( देस ) रक्कम १२० रुपये ठरलेली आहे. विधवाविवाहास मोकळीक आहे. काठेवाडांत विधवेनें मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न केलेंच पाहिजे असा नियम आहे. इतरत्र नाहीं. ते मुख्यत्वेंकरून शिवास भजतात. त्यांचे धर्मविधि स्थानिक ब्राह्मण चालवितात. मृतांस पुरण्यांत येतें.

ते मांस खातात व दारू पितात.

**ओड्डे**—ओड ह्या जातीचें दुसरें नांव.

**ओतारी**—सर्व महाराष्ट्रांत थोडथोडे आढळतात. ओतारी हें नांव ओत म्हणजे ओतणें ह्या शब्दावरून पडलें आहे. ते धातूंचें ओतींव काम करितात म्हणून त्यांस हें नांव पडलेलें आहे हें उघड आहे. एकच आडनांव अस-लेल्या स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. आतेबहिणीशीं किंवा मावसबहिणीशीं लग्न करतां येत नाहीं. मामेबहिणीशीं लग्न करतां येतें. मुलींचीं लग्नें बहुधा पांच ते बारा व मुलांचीं पंधरा ते वीस वर्षांच्या दरम्यान करितात. विधवा-विवाहास मोकळीक आहे. अविवाहितास विधवेशीं लग्न करितां येत नाहीं. जातीच्या परवानगीनें सोडचिठ्ठी देतां येते.

ओताऱ्यांचीं कुलदैवतें पैठणची कालिकादेवी, औंधची अंबाबाई, रत्ना-गिरीचा जोतिबा, जेजुरीचा खंडोबा आणि म्हसवडचा सिधोबा हीं आहेत. त्यांचे उपाध्ये देशस्थ ब्राह्मण असतात. मृतांस जाळण्यांत अथवा पुरण्यांतही येतें. ते वार्षिक श्राद्धें करितात.

त्यांचा मुख्य धंदा धातूंचें ओतकाम करणें हा होय. ते देवांच्या मूर्ति, वाळ्या, घागऱ्या, जोडवीं वगैरे ओतकाम करितात.

ते मांस खातात व दारू पितात.

**ओंड**—ओड ह्या जातीचें दुसरें नांव.

**ओळगाणा**—भंगी ह्या जातीचें दुसरें नांव.

**कटबू**—किलिकेट जातीचें दुसरें नांव.

**कट्टई**—ही लहानशी जात मुख्यत्वेंकरून नाशिक व अहमदनगर ह्या जिल्ह्यांत आढळते. ह्या जातीस परदेशी मोची व परदेशी चांभार अशींही नांवें आहेत. त्यांपैकीं पुष्कळ लोक आपणास चांभारही म्हणवितात. ह्या जातीचे बरेच लोक मुंबई, पुणें, सातारा इत्यादि ठिकाणींही आहेत. उत्तर हिंदुस्थानांतून औरंगजेब बादशहाच्या फौजेबरोबर आपण दक्षिणेंत आलों, अशी दंतकथा ह्या लोकांत प्रचलित आहे; ती बहुतांशीं खरी असावी असें दिसतें.

कट्टई जातींत अहिरवारे, जातवे, दोरवरे, जांगडे, कुरुले, डोहोर, मलाई, नाकशे, ढुसे इत्यादि पोटभेद आहेत. ह्यांचा परस्परांशीं अन्नव्यवहार होतो, पण शरीरसंबंध होत नाहीं.

एकच आडनांव असलेल्या कुटुंबांत लग्नसंबंध होत नाहीं. अशीं आडनांवें बरींच आहेत. मुलांचीं लग्नें पंधरा ते पंचवीस वर्षांच्या दरम्यान होतात. मुलींचीं लग्नें बहुधा त्या वयांत येण्यापूर्वींच होतात. विधवाविवाह होतो.

ह्यांचा धर्म हिंदु असून ते नाथपंथाचे अनुयायी आहेत. त्यांचीं कुलदैवतें तिरुपतीचा बालाजी, तुळजापूरची भवानी, त्रिंबकेश्वरचा महादेव व पंढरपूरचा विठोबा हीं होत. त्यांचे उपाध्ये उत्तर हिंदुस्थानांतील ब्राह्मण असतात.

ह्या जातीचा पिढीजात धंदा जोडे व खोगिरें करणें हा होय. ह्या धंद्यांत कमाई चांगली असल्यामुळें त्यांनीं तो सोडलेला नाहीं.

कट्टई लोक मांस खातात. ह्यांच्यांत अहिरवारे म्हणून जो पोटभेद आहे त्यांतील लोक मेलेल्या गाईबैलांचेंही मांस खातात. ते दारू पितात. ते चांभारांच्या हातचें अन्न खातात. ही जात चांभारांपेक्षां हलकी व महारांपेक्षां श्रेष्ठ आहे असें मानितात.

**कडिया**—पहा—गवंडी.

**कणबी**—पहा—कुणबी.

**कब्बलिगर**—ह्या जातीची वस्ती मुख्यत्वेंकरून कर्नाटकांत भीमा व कृष्णा आणि कारवार जिल्ह्यांत गंगावळी नदी ह्यांच्या कांठीं आहे. त्यांना अंबी, अंबिग, अंबेकर, बारकर, बारेकरी, भिल्ल कब्बेरू, कब्बेर, कभेर, गंगीमक्कलू, जाड, सनगर आणि सुन्नकल्लू बेष्टा अशीं दुसरीं नांवें आहेत. अंबी आणि अंबिग हीं नांवें 'अम्बु' ह्या संस्कृत शब्दावरून पडलेलीं आहेत. गंगीमक्कलू ह्या शब्दाचा अर्थ नदीचीं मुलें असा असून, तो नदींत मासे मारणाऱ्या पुष्कळ जातींस लावण्यांत येतो परंतु ह्या जातीचे लोक आपण श्रेष्ठ आहों असें दर्शविण्यासाठीं पवित्र गंगा नदीशीं ह्या शब्दाचा संबंध जोडितात. ह्या जातीचे लोक म्हैसूर संस्थानांत पुष्कळ आहेत. तेथें ते बेष्टा ह्या नांवानें संबोधिले जातात. ह्या जातीचें मूळ स्थान मद्रास इलाख्यांतील बेल्लारी जिल्ह्यांत आहे असें सांगतात. ह्यांच्या एका पोटभेदाची मातृभाषा तेलगू आहे. तसेंच पुष्कळ द्रविड जातींत आढळून येणारे 'धारे' आणि 'हालगंब' हे विधि ह्यांच्यांत लग्नसमयीं केले जातात. कारवार जिल्ह्यांतील अंबी लोकांत बळींवरून झालेल्या कुळांचे अवशेषही सांपडतात. ह्या प्रमाणांवरून ही जात दक्षिणेंतून आली आहे ह्या विधानास बळकटी येते. कांहीं कांहीं ठिकाणीं ह्या जातीचे लोक आपलीं मूळचीं कुळें टाकून त्यांबद्दल ब्राह्मणांतील गोत्रें प्रचारांत आणीत आहेत. ह्या जातींतील पुष्कळ मुली अविवाहित राहून वेश्यावृत्तीनें राहातात. मासे मारणें, नदींतून नावा चालविणें आणि पालख्या वाहणें हा ह्या जातीचा पिढीजात धंदा आहे. त्यांच्यांत प्रांतिक स्वरूपाचे कर्नाटकी व कानडी असे दोन मुख्य पोटभेद आहेत.

कर्नाटकांतील कब्बलिगरांत अकरा पोटभेद आहेत. त्यांचीं नांवें:—अंबिग, बैलगम्मार, बिलूगर, भोई, बोवर, दुर्गामुर्गी, हैग, कब्बेर, लोहगार, मोसले, गार आणि मोसाळ अशीं आहेत. त्यांच्यांत १०१ बेडगू अथवा कुळें आहेत. एकाच बेडगूंतील स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. बहिणीच्या मुलीशीं, आतेच्या मुलीशीं व मावशीच्या मुलीशीं लग्न करितां येतें. तसेंच भावजईच्या बहिणीशींही लग्न करण्यास हरकत नाहीं. मुलींचीं लग्नें उपवर होण्यापूर्वींच केलीं पाहिजेत असा नियम नाहीं. मुलाच्या बापानें मुलीच्या बापास

चारांपासून शंभरपर्यंत रुपये द्यावे लागतात. ह्या कन्यामूल्यास 'तेर' असें म्हणतात. लग्नांतील ' धारे ' हा विधि झाला म्हणजे लग्न पक्कें झालें असें समजतात. ह्या विधींत मुलीचा मामा, नवरा व नवरी ह्यांचे हात एकत्र जोडून त्यांवर पाण्याची धार सोडतो. विधवाविवाह रूढ आहे. सोडचिठ्ठी देतां येते. ह्या जातीच्या कुलदेवता भर्मप्पा, ओपलीपरमानंद, मैलारलिंग, बसवण्णा, वीरभद्र, यामव्वा, दुर्गव्वा, हलगव्वा आणि भवानी ह्या होत. त्यांचा लग्नविधि ब्राह्मण चालवितात व अंत्यविधि जंगम अथवा जातींतील जाणते पुरुष चालवितात. मृत्यूनंतर पांचव्या अथवा दुसऱ्या कोणत्याही विषम महिन्यांत, मृत पुरुष असेल तर मुखवटा, व स्त्री असेल तर एक शंखाकृति भांडें, सोनाराकडून करवून आणून घरांतील देवांत ठेवितात. दोन, तीन, चार अथवा पांच वर्षांनीं एकदा मृताच्या प्रीत्यर्थ जातींतील लोकांस जेवण देतात. ह्या प्रसंगीं मृतांच्या मुखवटयांची पूजा करून त्यांस वस्त्रें अर्पण करण्यांत येतात.

हे लोक मांस खातात व दारू पितात.

कानडी अंबींत अनेबळी, गंगाबळी वगैरे बळी आहेत. अनेबळी हें नांव हत्तीवरून पडलें आहे (कानडी अने = हत्ती). गंगाबळी हें नांव गंगाबळी नदीवरून पडलें आहे. अनेबळीचे लोक हस्तिदंताचे दागिने घालीत नाहींत. ते हत्तीची पूजा करितात. गंगाबळी बळीचे लोक गंगाबळी नदीची पूजा करितात. ज्यांचा बळी एकच आहे अशा कुटुंबांत शरीरसंबंध होत नाहीं. कानडी अंबी सर्व लिंगायत सण पाळतात. बसव आणि नदीदेवता गंगाबळी हीं त्यांचीं विशिष्ट दैवतें होत. त्यांचे उपाध्ये हविक अथवा कर्नाटक ब्राह्मण असतात. अविवाहित मृत मनुष्यांस ते पुरतात व विवाहित मृतांचें दहन करितात. मृतांच्या तृप्त्यर्थ ते महालय करितात. इतर बाबतींत त्यांच्यांत आणि कर्नाटकी कब्बलिगरांत भेद नाहीं.

**कब्बेर**—कब्बलिगर ह्या जातीचें दुसरें नांव.

**कभेर**—कब्बलिगर ह्या जातीचें दुसरें नांव.

**कंब रजपूत**—कामळी जातीचें दुसरें नांव.

**कम्मार**—पहा—लोहार.

**करे वक्कल**—अथवा काळे वक्कल हे कानडा जिल्ह्यांतील अंकोला तालुक्यांत दूरच्या खेडेगांवांत व जंगली भागांत वस्ती करून राहातात. ते वक्कलांच्या इतर जातींपेक्षां काळे असल्यामुळें त्यांस करे अथवा काळे हें नांव प्राप्त झालें आहे. त्यांच्यामध्यें पुष्कळ बळी आहेत. त्यांपैकीं ज्यांची माहिती मिळाली ते पुढें दिले आहेत:—

| | |
|---|---|
| अरशिन बळी ... ... ... | असिंना = हळद |
| चेंडी बळी ... ... ... | चेंडी = एक प्रकारचें झाड |
| होन्ने बळी ... ... ... | होन्ने = एक प्रकारचें झाड |
| शेट्टी बळी ... ... ... | शेट्टी = मासा |
| मिगन बळी ... ... ... | मिगा = चितळ |
| शिरे बळी ... ... ... | शिरे = एक प्रकारचें झाड |

ज्या झाडांवरून व प्राण्यांवरून हीं बळींचीं नांवें पडलेलीं आहेत त्या झाडांस आणि प्राण्यांस त्या त्या बळींचे लोक पूज्य मानितात. ते तीं झाडें तोडीत नाहींत अथवा त्या प्राण्यांस कोणत्याही प्रकारें इजा करीत नाहींत.

करे वक्कलांचे धर्मविधि बहुतांशीं हालक्की वक्कलांच्या धर्मविधींसारखेच आहेत. विधवाविवाह रूढ आहे. तिरुपतीचा व्यंकटरमण, जतगा, हुलीदेव अथवा वाघदेव, अकोल्यांतील शिवेगुलीचा करिदेव आणि स्थानिक अम्मा अथवा शक्ति हीं त्यांचीं कुलदैवतें होत. ते मृतांस पुरतात अथवा त्यांचें दहन करतात.

ते शेती व शेतांवर मजुरी करून उदरनिर्वाह करितात. दारू पिणें जरी त्यांच्यांत निषिद्ध मानलें आहे तरी ते दारू पितात.

**कलवडर**—भामटा ह्या जातीचें दुसरें नांव.

**कलाल** अथवा **कालण**—हे लोक इलाख्यांतील सर्व ठिकाणीं थोडथोडे आढळतात. ते उत्तर हिंदुस्थानांत कलाल नांवाची जी मोठी जात आहे त्या जातीचे असून, दारू गाळणें व विकणेचा धंदा करितात.

**कलाल**—इलिगेर ह्या जातीचें दुसरें नांव.

**कलावंतीण**—ही जात मुख्यत्वेंकरून कानडा व रत्नागिरी जिल्ह्यांत आढळते. कलावंतीण हा शब्द संस्कृत ‘ कला ’ ह्या शब्दावरून निघालेला आहे. गाणें व नाचणें ह्या त्यांच्या धंद्याचा तो द्योतक असावा. कलावंतीण हें स्त्रीवाचक नांव असून ह्या जातींतील पुरुषांस गाण ह्या नांवानें संबोधितात. आपली उत्पत्ति अप्सरा व गंधर्व यांजपासून झाली आहे असें कलावंतिणी मानितात. त्यांच्यामध्यें कोंकणी, मराठा, कर्नाटक, लिंगायत व तेलंग असे पांच पोटभेद आहेत. ह्यांत कोंकणी कलावंतिणीच प्रमुख असल्यामुळें प्रस्तुत वर्णन त्यांसंबंधींच आहे. ह्यांच्यामध्यें बांदोडकार, बोरीकार, जोटकार, कक्कोडकार, नावेकार, पर्वतावैले, फातरपेकार आणि शिरोडेकार अशीं स्थानिक स्वरूपाचीं कुळें आहेत. एकाच कुळांतील स्त्रीपुरुषांत शरीरसंबंध होत नाहीं.

ह्या जातींतील मुलींचीं लग्नें करीत नाहींत. पूर्वी मुलगी आठ नऊ वर्षांची झाली म्हणजे ‘शेस’ म्हणून एक विधि करीत असत. ह्या विधींत एका मुलीस पुरुषाचा पोषाख करून त्यांचा कुलस्वामी कार्तिकेय याची निशाणी म्हणून एक कट्यार त्या मुलीच्या हातांत देत असत. मग तिची योजना नवऱ्याच्यां स्थानीं करून जिचा शेस केला असेल तिचें तिजबरोबर लग्न लावीत असत. त्याच प्रसंगीं, नाचते वेळीं पायांत घालावयाच्या घागऱ्या, व अंगावर घ्यावयाचा शेला, वापरण्यास सुरवात करण्याचा विधि होत असे. हा समारंभ पूर्वी मोठ्या थाटानें करण्यांत येत असे; परंतु हायकोर्टानें अशा प्रकारचीं लग्नें फौजदारी गुन्हे होत असें ठरविल्यापासून, आतां तो विधि मुलगी वयांत आल्यावर विशेष थाटमाट न करितां उरकून घेण्यांत येतो.

सर्व कलावंतिणी वेश्यावृत्तीनें राहात असल्यामुळें गाणांस लग्नें करावयाचीं असल्यास, त्यासाठीं वाळींत टाकलेल्या लोकांच्या मुली विकत घ्याव्या लागतात. ह्यास पैसा फार लागत असल्यामुळें बहुतेक गाण अविवाहित राहातात.

पूर्वी वारसा हक्क मुलींसच असे. परंतु स्त्री व पुरुष ह्यांमध्यें मिळकतीची वांटणी समसमान व्हावी असा निवाडा अलीकडे हायकोर्टानें दिला आहे. कलावंतिणींस मुली न झाल्यास त्या बहिष्कृत लोकांच्या मुली विकत घेतात. वयांत आलेल्या मुलीस दत्तक घेतां येत नाहीं.

कलावंतिणींच्या कुलदेवता गोवें प्रांतांतील म्हाळसा, कांत्रा, शीतादुर्गा आणि सातेरी कामाक्षी ह्या होत. त्यांचें मुख्य उपास्यदैवत कार्तिकस्वामी. त्यांचे उपाध्ये चित्पावन, कऱ्हाडे व हविक जातीचे ब्राह्मण असतात.

कलावंतिणींचा पिढीजाद धंदा नाचणें व गाणें हा होय. ह्या कामीं त्यांची हिंदु देवळांत योजना करितात व त्याबद्दल त्यांस जमिनी तोडून दिलेल्या असतात. गाणं नाचतांगातांना कलावंतिणींना साथ करितात.

**कसाई**—ह्यांस खाटिक व खाटकी असेंही म्हणतात. ते सर्वत्र थोडथोडे आढळतात. धनगर, मराठा व कुणबी ह्या जातींपैकीं जे लोक बकरीं व मेंढरें मारण्याचा धंदा करीत, त्यांतून ह्या जातीची उत्पत्ति झाली असावी असें दिसतें. त्यांचे रीतिरिवाज व विधि कुणब्यांप्रमाणें असतात.

**कहार**—अथवा बुंदेली भोई मुख्यत्वेंकरून दक्षिण महाराष्ट्रांत सांपडतात. अवरंगजेबाच्या कारकीर्दींत आपण बुंदेलखंडांतून दक्षिणेंत आलों असें ते सांगतात. हें त्यांचें म्हणणें खरें दिसतें. कारण संयुक्त प्रांतांत त्यांची वस्ती २००००० वर आहे. अवरंगजेबाच्या लवाजम्यांतून ते भोई म्हणून आले असावे. त्यांचा पिढीजात धंदा पाल[illegible]ग, मासे मारणें व विकणें हा आहे. त्यांपैकीं कित्येक लोक भाजीपाला व तंबाखूची लागवड करितात.

**कंजारी**—ही एक भटकणारी जात असून भिक्षा मागून व कोष्टी लोकांस लागणारे कुंचे करून ते आपला उदरनिर्वाह करितात. कित्येक ठिकाणीं ते अट्टल चोर म्हणूनही प्रसिद्ध आहेत. ते मुख्यत्वेंकरून दक्षिण महाराष्ट्रांत सांपडतात. त्यांच्यांत कुंचे बांधणारे व जात लोग असे दोन पोटभेद असून त्यांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. ते आपण हिंदूही नाहीं व मुसलमानही नाहीं असें सांगतात. त्यांच्यांत उपाध्येही नाहींत आणि धर्मगुरूही नाहींत. ते मुख्यत्वेंकरून मरीआई व मुसलमानांचे पीर यांस भजतात. ते मुसलमानांच्या हातचें अन्न खातात. महार व मांग खेरीजकरून दुसरे कोणीही त्यांच्या हातचें अन्न खात नाहींत.

**कंसारा**—ह्यांची वस्ती मुख्यत्वेंकरून गुजराथ, काठेवाड व कच्छमधील मोठमोठ्या शहरांत आहे. कंसारा हा शब्द ‘ कांसूं ’ म्हणजे कांसें ह्या गुज-

राथी शब्दावरून निघाला आहे. ते आपल्या जातीच्या उत्पत्तीची हकीगत पुढीलप्रमाणें सांगतात. पूर्वी एके काळीं पावागड येथें पांच बंधू राहात असत. हे कालिकामातेचे मोठे भक्त होते. ते नित्य कांशाचे टाळ वाजवून तिचें भजन करीत. त्यांच्या भक्तीनें ती देवी संतुष्ट होऊन तिनें त्यांस तुम्ही धातूंचीं भांडीं करून उपजीविका करा असें सांगितलें. तेव्हांपासून ते तांबें, पितळ, कांसें वगैरे धातूंचीं भांडीं करूं लागले. हल्लींचे कंसारा हे ह्या पांच बंधूंचे वंशज होत.

ह्या जातींत प्रांतिक स्वरूपाचे चार पोटभेद आहेत, ते असे:—चांपानेरी, मारू, सिद्दोरा आणि विसनगरा. हे एकमेकांशीं रोटीबेटीव्यवहार करीत नाहींत.

जवळच्या आप्तांशीं शरीरसंबंध होत नाहीं. विसनगर पोटभेद शिवाय करून इतरांत विधवाविवाहास मोकळीक आहे. कधीं कधीं विधवा आपल्या मृत पतीच्या लहान भावाशीं लग्न करते. दक्षिण गुजराथेंत मात्र सोडचिठ्ठीचा प्रघात आहे.

कंसारा हे रामानंद, शैव व वल्लभाचार्य पंथाचे अनुयायी आहेत. त्यांची कुलदेवता कालिकामाता होय. त्यांचा मुख्य सण आश्विन महिन्यांतील शुद्ध नवमीस असतो. त्यांचे उपाध्ये [illegible] मेवाडा, श्रीगौड व श्रीमाळी ब्राह्मण असतात.

कंसारा शाकाहारी आहेत. फक्त कच्छमधील कांहीं लोक मासे व बकऱ्याचें मांस खातात आणि दारू पितात.

**काचारी**—हे मुख्यत्वेंकरून अहमदनगर, पुणें, सातारा, नाशिक हे जिल्हे व अक्कलकोट संस्थान यांत आढळतात. यांत मराठी व लिंगायत असे दोन पोटभेद असून त्यांचा रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. कांचेच्या काळ्या व हिरव्या बांगडया करून ते आपला उपरनिर्वाह करितात.

**काची**—मुख्यत्वेंकरून पुणें जिल्ह्यांत सांपडतात. नाशिक, सातारा, बेळगांव वगैरे जिल्ह्यांतही त्यांची थोडथोडी वस्ती आहे. आपले पूर्वज अवरंगजेबाच्या फौजेबरोबर दक्षिणेंत आले असें ते सांगतात. त्यांना नियमितपणें पगार मिळत नसल्यामुळें, अवरंगजेबाच्या मृत्यूनंतर ते औरंगाबाद येथें स्थायिक होऊन फळें विकून उदरनिर्वाह करूं लागले. तेथून ते हळू हळू शेजा-

रील महाराष्ट्राच्या भागांत पसरले. संयुक्त प्रांतांत ह्यांच्या मूळ जातीची मोठी वस्ती असून त्यांत अनेक पोटभेद आहेत.

ह्या जातींत मारवाडी व परदेशी ह्या नांवाचे दोन मुख्य पोटभेद आहेत; त्यांचा परस्परांशीं रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. ह्या पोटभेदांत प्रत्येकीं आणखी पुढें दिल्याप्रमाणें पोटभेद आहेतः—

१ बुंदेले-ग्वाल्हेरे अथवा बुंदेलखंड व ग्वाल्हेर येथें राहाणारे.

२ नरभरी अथवा नर्मदेच्या तीरावर राहाणारे.

३ कारभोई अथवा धीमार. हे पालख्या वाहणें व मासे मारण्याचा धंदा करितात.

४ मलाव. हे फळबागाइती करितात.

हे पोटभेद परस्परांशीं रोटीबेटीव्यवहार करीत नाहींत.

एकाच कुळांतील मुलामुलींचीं लग्नें होत नाहींत. भावाभावांस बहिणी-बहिणींबरोबर लग्न करितां येतें. विधवाविवाहास मोकळीक आहे. सोडचिठ्ठी देतां येते.

काची लो[illegible] मु[illegible] दैवत बालाजी. ते तुळजापुर, चतरशिंगी, सप्तशृंग आणि महूरगड येथें यात्रेस जातात. त्यांचे उपाध्ये उत्तर हिंदुस्थानांतील ब्राह्मण असतात.

ह्या जातीचा मुख्य धंदा फळफळावळ विकणें हा होय.

ते मांस खातात व दारू पितात.

**काच्छिया**—हे लोक सर्व गुजराथभर सांपडतात. त्यांना पस्तागिया म्हणजे फळें विकणारे आणि कुंजरू अशीं दुसरीं नांवें आहेत. ही जात कणबी आणि कोळी शेतकऱ्यांतून जे लोक भाजीपाला करून विकूं लागले त्यांतून निर्माण झाली आहे असें म्हणतात. ह्यांच्यांत नऊ पोटभेद आहेत, ते असेः— अजबाळिया, अंधारिया, खंभातिया, अहमदाबादी, खमार, खत्री, कोळी, माळी आणि संगरिया. ह्यांपैकीं पहिले तीन उत्तर गुजराथ व सिंध प्रांतांत आढळतात.

गुजराथेंतील पुष्कळ जातींप्रमाणें यांनीं गोल स्थापिले असून एका गोलांतील मुलांमुलींचीं दुसऱ्या गोलांतील मुलांमुलींशीं लग्नें होत नाहींत. सात पिढ्यांपर्यंत लग्न करण्यास प्रतिबंध आहे. भावाभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करितां येतें. लग्नें बहुधा अगदीं लहान वयांतच होतात. मुलाच्या बापास मुलीस दागिने व वस्त्रें मिळून १२५ रुपयांचें पल्लू द्यावें लागतें. विधवाविवाह रूढ असून मृत पतीपेक्षां वयानें लहान असलेल्या दीराशीं लग्न लावितां येतें. सोडचिठ्ठी देतां येते.

काच्छियांपैकीं अंधारिया व खत्री हे पोटभेद मातिया कणब्यांप्रमाणें इमामशहाचे अनुयायी असून ते अर्धवट हिंदु व अर्धवट मुसलमान रीतरिवाज पाळतात. बाकीचे सर्व बिजपंथी, शैव, वल्लभाचारी, स्वामिनारायणी आणि कबिरपंथी आहेत. त्यांचे उपाध्ये ब्राह्मण असतात. त्यांचा मुख्य धंदा भाजीपाल्याची लागवड व विक्री करणें हा होय.

ते मांस खात नाहींत व दारू पीत नाहींत.

**काठी**—ही जात मख्यत्वेंकरून काठेवाडांत व अहमदाबाद जिल्ह्यांत आढळते. ते आपली उत्पत्ति [illegible] त. [illegible]त अशीही दंतकथा प्रचलित आहे कीं, ते सूर्यवंशी असून त्यांची उत्पत्ति महाभारतांतील प्रसिद्ध वीर कर्ण याच्या द्वारें प्रत्यक्ष सूर्यापासून झालेली आहे. इ. स. १८०८ पर्यंत हे लोक दरोडे घालणें व चोऱ्यामाऱ्या करण्याचा धंदा करीत असत. तेव्हांपासून त्यांच्या ह्या धंद्यास इंग्रज सरकारानें कडक उपाय योजून आळा घातला आहे.

ही जात मध्य आशियांतून मुसलमानांनीं हांकून लाविल्यामुळें इकडे आली असें समजण्यांत येतें. ते प्रथम सिंधमध्यें स्थायिक झाले. तेथून त्यांस सुम्रा राजानें हद्दपार केल्यामुळें इ. स. १४०० मध्यें ते सोरठ प्रांतीं आले. तेथील रजपूत राजा धान ह्यानें त्यांस आश्रय दिला. हा राजा काठींपासून निघालेल्या वाला वंशांतील होता ह्याबद्दल वाद नाहीं.

काठीमध्यें साखायात आणि अवर्तिया असे दोन मुख्य भेद आहेत. साखायतांत वाला, कुमाव आणि काचर ह्या तीन शाखांचा अंतर्भाव होतो.

अवर्तिया हे मूळ काठींचे वंशज होत. वालांमध्यें वीस पोटभेद आहेत, कुमावांत दहा आहेत आणि काचरांत सात आहेत. अवर्तिया काठींत ९३ पोटभेद आहेत. साखायत अवर्तिया, अहिर आणि बाब्रिया यांच्या मुलींशीं लग्नें करितात, परंतु आपल्या विभागांत निरनिराळ्या पोटभेदांतही लग्नें करीत नाहींत. अवर्तिया, अहिर आणि बाब्रिया साखायतांच्या मुलींशीं लग्नें करितात. भावाभावांचें बहिणीबहिणींशीं लग्न होऊं शकतें. विधवाविवाहास मोकळीक आहे; परंतु असे विवाह क्वचितच होतात. मात्र विधवेनें मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न केलेंच पाहिजे असा सक्त नियम आहे. सोडचिठ्ठी देतां येते. काठींचें मुख्य उपास्य सूर्य होय. त्यांचे उपाध्ये मोध ब्राह्मण असतात. काठी मांसाहार करितात व दारू पितात. ते खांट, सगर अहिर, बाब्रिया, कुंभार, रबारी, भावसार, हाती, महिया, रजपूत, वालंद, आणि खबास ह्यांच्या हातचें अन्न खातात. ह्या सर्व जाती काठींच्या व परस्परांच्या हातचें अन्न खातात.

काठींपैकीं बहुतेक लोक तालुकदार असून कांहीं लहान जमीनदार आहेत. कांहीं नोकर असून कित्येक तर रोज[illegible] उदरनिर्वाह करितात.

**काठीवाले**—महार जातीचें दुसरें नांव.

**काठोडी**—कातकरी जातीचें दुसरें नांव.

**काठोडिया**—कातकरी जातीचें दुसरें नांव.

**कातकरी**—ह्या जातीचे लोक मुख्यत्वेंकरून ठाणें व कुलाबा जिल्ह्यांतील पश्चिमेकडील घाटांत आढळतात. त्यांना काठोडी असें दुसरें नांव असून गुजराथेंत त्यांस काठोडिया असें म्हणतात. कातकरी हा शब्द 'काथ' ह्या शब्दावरून निघाला असून त्याचा अर्थ 'काथ करणारे' असा आहे. हे लोक काथ करितात म्हणून त्यांस हें नांव पडलें असावें. ते उत्तरेकडून येऊन प्रथम गुजराथेंतील अठाविसी ( ज्यास हल्लीं सुरत जिल्हा असें म्हणतात ) प्रांतांत राहिले असें मानण्यांत येतें. ह्या प्रांतावरून पडलेला अठावर नांवाचा पोटविभाग अद्यापही त्यांच्यांत आढळतो. राम रावणास जिंकण्यासाठीं ज्या वानरांस घेऊन लंकेस गेला त्यांपासून आपल्या जातीची उत्पत्ति झाली आहे असें हे लोक सांगतात. त्यांचें

स्वरूप, रीतिभाती व धर्म यांवरून ते ह्या प्रांतांतील मूळ जातींपैकींच असावे असें दिसतें. ब्राह्मणी धर्माचा त्यांच्यावर म्हणण्यासारखा परिणाम झालेला नाहीं. ते जी भाषा बोलतात तींत भिल्लांच्या भाषेंतील बरेच शब्द सांपडतात. ह्यावरून व त्यांच्या रीतिरिवाजांवरून त्यांची उत्पत्ति भिल्लांपासून झाली असावी असें वाटतें.

ह्या जातीचा मूळ धंदा काथ करण्याचा असून अजूनही ह्यांच्यांतील कांहीं हा धंदा करितात; परंतु ह्यांच्यापैकीं बरेचसे लोक वर्षांतून दोनतीन महिने शेतावर मजुरी करितात. कांहीं वरकस जमिनीची लागवड करितात. त्यांचा धान्याचा सांठा संपला म्हणजे जळाऊ लांकडें व मध गोळा करून विकतात, आणि धनुष्यबाणांनीं हरिण, ससे व वानर यांची शिकार करितात. हें करूनही उपजीविका होईनाशी झाली म्हणजे ते शेतांतील उंदीर मारून खातात, व त्यांनीं सांठविलेलें धान्यही उपयोगांत आणितात. ह्या जातींतील पुरुष अट्टल चोर असतात.

कातकऱ्यांत पांच पोटभेद आहेत:—अठावर, धेड किंवा ढोर, सिद्दी, सोन किंवा मराठे [illegible] अथवा मराठे गोमांस खात नाहींत. त्यांना खेड्यांतील विहिरींतून पाणी काढूं देतात. आणि [illegible] घरांत व देवळांत जाण्याची त्यांस मोकळीक असते. सिद्दींची उत्पत्ति आफ्रिकेंतून इकडे आलेल्या सिद्यांपासून झाली असावी. ह्यांच्यापैकीं बाटून ख्रिस्ती अथवा मुसलमान झालेल्यांतून जे लोक पुनः शुद्ध होऊन जातींत परत आले त्यांस वरप असें म्हणतात. ढोर अथवा धेड हे गोमांस खात असून हा पोटभेद सर्वांत हलका गणला जातो. महारांप्रमाणें त्यांस अस्पृश्य मानण्यांत येतें.

एकच आडनांव असलेल्या कुटुंबांत शरीरसंबंध होत नाहीं. ढोरांस मात्र हा नियम लागू नाहीं. भावाभावांचें बहिणीबहिणींशीं लग्न होतें. मुलींचीं लग्नें बारापासून पंधरा वर्षांच्या दरम्यान व मुलांचीं बारा ते पंचविसांच्या दरम्यान करितात. एखादी मुलगी लग्न होण्यापूर्वीं गरोदर राहिल्यास लग्न केल्यानें ती ह्या दोषापासून मुक्त होते. मात्र हें लग्न पाटाच्या विधीनें लावण्यांत येतें. पाट लावण्यास मोकळीक आहे. जातीच्या प्रमुखाच्या अनुमतीनें सोडचिठ्ठी देतां येते.

कातकरी मुख्यत्वेंकरून वाघदेवास भजतात. ह्या देवाची स्थापना रानांत अथवा गांवाच्या सीमेवर केलेली असते. ते मावल्या, म्हशा, वेताळ, जरीमरी, हिरवा व चेडा अशा क्षुद्र देवतांचीही पूजा करितात. त्यांना उपाध्ये अथवा धर्मगुरु नाहींत. त्यांचे सर्व विधि जातींतील जाणत्यांकडून केले जातात. मृतांस जाळतात, पण त्यांच्या तृप्त्यर्थ कोणतेही वार्षिक विधि केले जात नाहींत.

कातकरी लोक उंदीर, पाली, साप, वानर, हरिण, जंगली डुकर, पारवे, खबूतर वगैरेचें मांस खातात. ढोर गाईचेंही मांस खातात. ते दारू पितात.

पूर्वी कातकरिणी इतर जातींच्या पुरुषांस पळवून नेत असत असें सांगतात. असे पुरुष जातीस मुकून कातकऱ्यांतीलच कोणातरी स्त्रीच्या संगतीनें राहात असत. ही रीत आतां सर्वस्वीं लोपली आहे. परंतु ठाणें जिल्ह्यांतील कांहीं भागांत वारली, कोळी, ठाकूर आणि कुणबी ह्या जातींतील लोकांस पांच रुपये घेऊन ह्या जातींत घेण्यांत येतें. हे रुपये जातींतील लोकांस दारू पाजण्यांत खर्च करितात.

**कातारी**:—ह्यांस खराडी असेंही नांव आहे. हे लांकूड कांतण्याचा धंदा करितात. ही जात अगदीं लहान असून [illegible] मुख्यत्वेंकरून काठेवाडांत व गुजराथेंतील कांहीं [illegible] आढळते.

**कापडी**:—हे मुख्यत्वेंकरून कच्छ व पालनपूर संस्थानांत आढळतात. कापडी हा एक धार्मिक पंथ असून ह्यांतील लोक लग्नें करीत नाहींत. इतर जातींतील लोकांस पंथांत घेण्यांत येऊन पंथ कायम राखण्यांत येतो. यांचे शिष्य बहुधा लोहाणा जातीचे असतात. परंतु अस्पृश्यांशिवाय वाटेल त्या जातीच्या लोकांस शिष्य करून घेण्यास हरकत नाहीं. भूजच्या ईशान्येस सरासरी पन्नास मैलांवर असलेल्या माठ येथील आशापुरामातेचे ते उपासक आहेत. ते भिक्षा मागून व देवीच्या जमिनीच्या उत्पन्नावर उपजीविका करितात.

**कामळी**:—हे लोक ठाणे जिल्ह्यांत आढळतात. ते आपणास कंब रजपूत म्हणवितात व पांचसहाशें वर्षांपूर्वी काठेवाडांतून आपण इकडे आलों असें सांगतात. ते शेती करून व ताडी काढून उदरनिर्वाह करितात. त्यांचे उपाध्ये गुजराथी ब्राह्मण असतात. विधवाविवाहास मोकळीक आहे.

ते मांस खातात व दारू पितात.

**कामाटी:**—भामटा जातीचें दुसरें नांव.

**कामाठी:**—ह्यांना तेलगू असेंही म्हणतात. हे मुख्यत्वेंकरून मुंबई शहर, दक्षिण महाराष्ट्र, कर्नाटक व ठाणें जिल्हा येथें आढळतात. कामाठी लोकांत मुनुवार, गोलेवार, गुल्लोंडा, मुंगल्लोला, आणि साल्लोडा इतक्या जातींचा अंतर्भाव होतो. हे लोक कांहीं शतकांपूर्वी दक्षिण हैदराबाद व मद्रास येथून इकडे आले. ते आपसांत तेलगू भाषा बोलतात. ते आपला दर्जा मराठ्यांच्या बरोबरीचा समजतात. ते तेलगू रीतिरिवाज पाळतात.

**कायस्थ**—ह्या जातीचे लोक गुजराथच्या सर्व भागांत आढळतात. ते उत्तर हिंदुस्थानांतील कायस्थांपैकींच असून, सोळाव्या शतकाच्या अखेरीस गुजराथ प्रांत मुसलमानी अमलाखालीं गेला त्या वेळीं त्यांस मुसलमान बादशहानें गुजराथेंत पाठविलें असावें असें दिसतें. त्यांजकडे जमीनमहसूल गोळा करण्याचें काम दिलेलें असे. ब्रिटिश अंमल सुरू झाल्यानंतरही बरींच वर्षें हें काम त्यांच्याकडेच असे. अजून देखील कच्छ संस्थानांत बहुतेक अंमलदार कायस्थच आहेत.

कायस्थ लोक आपली उत्पत्ति चित्रगुप्तापासून झाली आहे असें सांगतात. चित्रगुप्त ब्रह्मदेवाच्या कायेपासून ( शरीरापासून ) उत्पन्न झालेला असल्यामुळें आपणास कायस्थ हें नांव पडलें असें ते सांगतात. कायस्थ हा शब्द संस्कृत वाङ्मयांत, शिलालेखांत व ताम्रपटांत लेखक ह्या अर्थी पुष्कळ ठिकाणीं आढळतो. परंतु त्यावरून त्यांच्या उत्पत्तीविषयीं कांहीं माहिती मिळत नाहीं. प्राचीन क्षत्रिय घराण्यांशीं संबंध जोडणाऱ्या अनेक दंतकथा त्यांच्यांत प्रचलित आहेत; त्यांपैकीं एकींत ते चंद्रसेनाचे वंशज आहेत असें सांगण्यांत येतें. महाराष्ट्रांतील कायस्थ प्रभूही आपण त्याच राजाचे वंशज आहों असें सांगतात. ह्या दोन्ही जातींचें नांव व धंदा एकच असल्यामुळें मुळांत ती एकच जात असावी असें कित्येकांचें म्हणणें आहे.

उत्तर हिंदुस्थानांतील कायस्थांत बारा पोटभेद आहेत. त्यांपैकीं भटनगरा, माथुर व वाल्मिक हे तीन पोटभेद गुजराथेंतील कायस्थांत आढळतात. ह्यांचा

परस्परांशीं रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. भटनगरांत दसा व विसा असे आणखी दोन पोटभेद आहेत. विसा दसांच्या मुली करतात, पण आपल्या मुली त्यांस देत नाहींत.

कायस्थांत, ब्राह्मणांत ज्याप्रमाणें गोत्रें असतात त्याप्रमाणें, ' नुख ' नांवाचे विभाग असतात. ह्या नुखांच्या नांवांवरून ते सिंध प्रांतांतून आले असावे असें दिसतें. कारण सिंध प्रांतांतील नुखांप्रमाणें ह्या नुखांतील बहुतेक नांवांचा शेवट ' आनी ' ह्या अक्षरांनीं होतो.

एकाच नुखांतील स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. भावाभावांचें बहिणी-बहिणींबरोबर लग्न होऊं शकतें. विधवाविवाह व सोडचिठ्ठी यांस प्रतिबंध आहे.

उत्तर हिंदुस्थानांतील आपल्या मूळ जातीप्रमाणें कायस्थ प्रथम देवीउपासक होते. परंतु गुजराथेंत आल्यानंतर लवकरच वैष्णवी मतांचा पगडा त्यांच्यावर बसला, व ते वल्लभाचार्य व रामानुज पंथाचे अनुयायी बनले. कच्छमध्यें कांहीं कायस्थ राधावल्लभी व पर्णामी पंथाचे अनुयायी आहेत. माथुरांपैकीं कांहीं शैव आहेत. प्रत्येक कुलाची निरनिराळी कुलदेवी [redacted] दुर्गा, अंबा. [redacted] नाथ, श्रीमाळी, पराशर आणि साचोरा ब्राह्मण असतात. भटनगरा व माथुर पूर्ण ब्राह्मण विधीनें मुलांची मुंज करितात.

ह्या जातीचा पिढीजात धंदा कारकुनी करण्याचा आहे. हल्लींही ते हाच धंदा करितात.

कायस्थ लोक शाकाहारी आहेत. ते दारू पीत नाहींत. क्षत्री, लोहाणा, भंसाळी, कंसारा, देपला आणि पाटणी सोनार यांच्या हातचें अन्न ते खातात. ह्या जातींचे लोक व गुजराथी सारस्वत ब्राह्मण कायस्थांच्या हातचें अन्न खातात.

**कारंजकर**—जिनगर ह्या जातीचें दुसरें नांव.

**कालण**—पहा-कलाल किंवा कालण.

**काशी कापडी**—तिर्माळी ह्या जातीचें दुसरें नांव.

**कांसार**--तांबट ह्या जातीचें दुसरें नांव.

**कांचगार**—मुख्यत्वेंकरून कारवार जिल्ह्यांत आढळतात. त्यांचीं आडनांवें गोव्यांतील गांवांवरून पडलेलीं आहेत व त्यांचा कुलदेव कासारपाल ह्याचें देवस्थान गोव्यांतच आहे. ह्यावरून ते मूळचे गोव्यांचे असावे असें दिसतें. ह्यांच्यांत मुलांच्या मुंजी करितात व विधवाविवाहास प्रतिबंध आहे. त्यांचे उपाध्ये हविक ब्राह्मण असतात. ते तांब्यापितळेचीं भांडीं करण्याचा धंदा करितात.

**किराड**—हे संयुक्त प्रांतांतून आलेले असून ह्यांची वस्ती फक्त पुण्यांतच आहे. ते लहानसहान व्यापार करून उदरनिर्वाह करितात.

**किलिकेट**—ह्या जातीस कटबू आणि छत्री अशींही नांवें आहेत. ही जात गांवोगांव भटकणारी असून बागडी, बुडबुडकी, गोंधळी वगैरे अनेक जातींच्या संमिश्रणानें ती बनली आहे. ते आपण क्षत्रिय आहों असें सांगतात. परंतु त्यांच्या रीतिरिवाजांवरून तसें दिसत नाहीं. बहुतेक भटकणाऱ्या जातींप्रमाणें त्यांचे उपाध्ये ब्राह्मण नसतात. ते आपलें वसतिस्थान वारंवार बदलतात. ते डुकराचें मांस खातात व कोरव जातींच्या स्त्रियांप्रमाणें त्यांच्या स्त्रिया गोंदण्याच्या कामांत तरबेज असतात. त्यांचा समाजांतील दर्जा अगदीं हलका आहे.

ह्या जातींत मिनाहिडियो व गोंबियाडिसो असे दोन पोटभेद आहेत. त्यांच्यांत रोटीबेटीव्यवहार होतो. मिनाहिडियो ( कानडी मिने=मासे आणि हिडियो=पकडणारा ) मासे मारून व विकून उपजीविका करितात, आणि गोंबियाडिसो ( गोंबी=बाहुली आणि आडिसो=दाखविणारा ) कातड्यांच्या बाहुल्या दाखवून पोट भरतात. त्यांच्यांत एकंदर तेरा कुळें आहेत. मुलींच्या लग्नास वयाची मर्यादा नाहीं. विधवाविवाहास मोकळीक आहे.

किलिकेट मुख्यत्वेंकरून महादेव व दुर्गव्वा ह्यांस भजतात. ते बेळगांव जिल्ह्यांतील पारसगडास व पंढरपुरास यात्रेस जातात. त्यांचे उपाध्ये त्यांच्याच जातींतील गणाचारी नांवाच्या कुळाचे असतात, व गणाचाऱ्यांचा प्रमुख पुरुष त्यांचा धर्मगुरू असतो. मृतांस लिंगायतांप्रमाणें पुरण्यांत येतें.

ते मांस खातात व दारू पितात.

**कुंजरू**—काच्छिया जातीचें दुसरें नांव.

**कुडबुडे**—जोशी ह्या जातीचें दुसरें नांव.

**कुडवक्कल**—ह्या जातीचे लोक मुख्यत्वेंकरून बेळगांव, विजापूर, धारवाड आणि सोलापूर ह्या जिल्ह्यांत व दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानांत आढळतात. कुडवक्कल हा शब्द कानडी कुडव म्हणजे कुदळ व वक्कल म्हणजे शेतकरी ह्या शब्दांवरून निघालेला आहे, व तो त्यांच्या धंद्याचा द्योतक आहे. ते आपल्या जातीचा संस्थापक कुडवक्कल नांवाचा पुरुष असून आपण कुर्ग देशांतून इकडे आलों असें सांगतात. पण ह्या त्यांच्या म्हणण्यास ऐतिहासिक पुरावा सांपडत नाहीं.

कुडवक्कलांमध्यें हिंदु व लिंगायत असे दोन पोटभेद आहेत. लिंगायत कुडवक्कलांच्या रीतिभाती व धर्म पंचमसाळी लिंगाइतांप्रमाणें आहेत. परंतु ते शेंडी ठेवितात व त्यांचीं लग्नें ब्राह्मण चालवितात. हिंदु कुडवक्कलांवरही लिंगायत धर्माचा बराच पगडा बसलेला दिसतो. ते जन्म व मृत्यूच्या प्रसंगीं विटाळ मानीत नाहींत व रजस्वला स्त्रियांचाही विटाळ मानीत नाहींत. ते मृतांस पुरतात. मांस खात नाहींत व दारू पीत नाहींत. त्यांच्यांत चार पोटभेद आहेत. ते असे:—

१ दंडावती म्हणजे दंड देणार.

२ मिनिगडिक म्हणजे ठिगळें लावलेले जोडे वापरणारे.

३ तड्डोडी म्हणजे मूर्ख.

४ यट्टिरक

वरील भेदांत परस्पर अन्नव्यवहार होतो, पण शरीरसंबंध होत नाहीं.

तड्डोडींत हुगिय्या, बेल्यागा आणि नवल्यागा असे आणखी तीन भेद आहेत.

एकाच वंशांतील स्त्रीपुरुषांत शरीरसंबंध होत नाहीं. भावाभावांचें बहिणी-बहिणींशीं लग्न होऊं शकतें. विधवाविवाह व सोडचिठ्ठी यांस प्रतिबंध आहे. मात्र नवलागयांत विधवाविवाह रूढ आहे. लग्नाचा मुहूर्त जंगम ठरवितात व लग्न ब्राह्मण चालवितात.

कुडवक्कलांच्या कुलदेवता बसवण्णा, वीरभद्र आणि यल्लव्वा ह्या होत. ते तुळजापूर व विजापूर जिल्ह्यांतील गोलागिरिलिंग येथें यात्रेस जातात. ते मृतांस

लिंगायतांप्रमाणें पुरतात. अंत्यविधि जंगम चालवितात. मृताच्या बाराव्या दिवशीं जंगमांना जेवूं घालतात.

कुडवक्कलांचा मुख्य धंदा शेतकी करणें हा होय. कांहींच्या स्वतःच्या जमिनी असतात, कांहीं खंडानें घेतात. कांहीं शेतावर मजुरी करतात. त्यांच्या बायका दूध, दहीं व लोणी विकतात.

**कुणबी**—हें जातिवाचक नांव दिसत नाहीं. हें शेतकी करणाऱ्या बहुतेक सर्व ज्ञातींच्या लोकांस लावण्यांत येतें. अर्थात् हें धंदेवाचक नांव आहे. रत्नागिरी जिल्ह्यांतील दक्षिण भागांत शेतकी करणाऱ्या सर्व जातींस कुळवाडी असें म्हणतात. ह्यांत मराठे, भंडारी वगैरे जातींचा समावेश होतो. दक्षिण महाराष्ट्रांतील कुणब्यांचे रीतिरिवाज बहुतांशीं एकसारखे असण्याचें कारण ते मराठे आहेत हें होय; कुणबी म्हणून नव्हे.

गुजराथेंतील शेतकऱ्यांस कणबी असें म्हणतात. पण तेथेंही हा शब्द धंदेवाचकच आहे.

मुंबई इलाख्यांतील कुणब्यांशीं समानार्थक कुरमी ह्या नांवाची जात संयुक्त प्रांतांत आहे. त्यांना कु[illegible] असेंही दुसरें नांव आहे. ह्या दोहोंचाही धंदा जरी एक आहे तरी त्यांचा इतर प्रकारें परस्पराशीं काहीं संबंध आहे असें दिसत नाहीं.

कुणबी अथवा कणबी हा शब्द कुळंबी अथवा कुटुंबिक ह्या शब्दावरून निघाला आहे, असें पुष्कळांचें मत आहे. पंडित भगवानलाल ह्या शब्दाची उत्पत्ति संस्कृत कुटुंबिन् म्हणजे 'कुटुंब असलेला' ह्या शब्दापासून झाली आहे असें म्हणतात. त्यांच्या मताप्रमाणें "प्राचीन काळापासून कुटुम्बिन् हें उपपद शेतकऱ्यांच्या नांवामागें लावण्याचा प्रघात आहे. हा प्रघात अजूनही संयुक्त प्रांतांत दृष्टीस पडतो. तेथें स्वतःची जमीन असलेल्या शेतकऱ्यांस गृहस्थ असें संबोधण्यांत येतें. उत्तर हिंदुस्थानांतील बहुतेक गुजर लोकांचा मूळ धंदा शेतकीचा नसून गुरांची पैदास्त करण्याचा होता. अजूनही त्यांच्यांतील पुष्कळ लोक हाच धंदा करितात. ह्यांच्यापैकीं जे लोक शेतीचा धंदा स्वीकारून स्थायिक झाले तेच विशेषेंकरून कुटुम्बिन् ह्या नांवानें ओळखले-

जाऊं लागले. तसेंच दक्षिण महाराष्ट्रांत प्रचलित असलेल्या आडनांवांवरून असें दिसतें कीं, गुरांची पैदास्त करणाऱ्या पुष्कळ भटकणाऱ्या जाती शेतीचा अवलंब करून स्थायिक झाल्यानंतर त्याही कुणबी ह्याच नांवानें ओळखल्या जाऊं लागल्या. गेल्या वीस वर्षांत, भटकणाऱ्या वंजारी जातीचे जे लोक खानदेशांत शेतीचा धंदा स्वीकारून स्थायिक झाले, त्याचप्रमाणें गुजराथेंतील कणबी व दक्षिण महाराष्ट्रांतील कुणबी स्थायिक झालेले आहेत. ''

कुणब्यांची वस्ती इलाखाभर सर्वत्र पसरलेली आहे. त्यांपैकीं महाराष्ट्रांतील कुणब्यांचें वर्णन प्रथम देऊन त्यापुढें गुजराथेंतील कुणब्यांचें वर्णन खालीं दिलें आहे.

महाराष्ट्रांतील कुणब्यांत ठोकळ मानानें प्रांतिक स्वरूपाचे चार पोटभेद आहेत. मराठा, कोंकणी, खानदेशी आणि ठाणें जिल्ह्यांतील तल्हेरी कुणबी. ह्यांशिवाय कारवार जिल्ह्यांतील काळे कुणब्यांचाही यांत अंतर्भाव करतां येईल. ह्या सर्व पोटभागांत कडू किंवा अक्करमासे म्हणून एक पोटभेद आहे. त्यांत त्यांच्या अनौरस संततीचा समावेश होतो. मल्हारी कोळी शेतीचा धंदा करूं लागून कांहीं काळ लोटला म्हणजे ते आपण [illegible] आहों असा हक्क सांगतात व त्यांस मराठा कुणब्यांत सामील करून घेण्यांत येतें असें सांगतात.

कुणब्यांचा मुख्य धंदा शेतीचा. मराठा कुणब्यांतील कांहीं देशमूख व पाटीलही आहेत. कित्येकांच्या मालकीच्या जमिनी असतात व कित्येक खंडानें जमिनी घेतात. पुष्कळसे शेतावर मजुरी करितात. शेतावर काम नसतें तेव्हां ते इतरत्र रोजमजुरीवर काम करितात. ते आपल्या परसांत फळफळावळ व भाजीपाला लावितात व तो नजीकच्या बाजारांत नेऊन विकतात. शहरांतून ते दहींदूध विकतात व घरकामावरही राहातात. त्यांच्यांतील बरेच लोक मुंबईस गिरणींत व इतर कारखान्यांत काम करून बराच पैसा मिळवितात.

**मराठा कुणबी**—हे आणि मराठे मूळचे एकच आहेत असें मानण्यांत येतें. त्यांच्या जातीची संघटना व देवकें एकच असल्यामुळें ह्या म्हणण्यास बळकटी येते. मराठे आणि मराठे कुणबी हे केव्हांही अगदीं पृथक् जाती होत्या असें म्हणतां येत नाहीं. सध्यां तर मराठा आणि कुणबी हे दोन्ही शब्द

पुष्कळ अंशीं समानार्थक समजण्यांत येतात. यांच्यांत निश्चित भेद कोठें आहे हें दाखवितां येणें कठीण आहे. तरीही मराठे व मराठे कुणबी लग्नाच्या बाबतींत मात्र होतां होईलतों एकमेकांपासून अलग राहातात. पुण्यास व त्याच्या आजूबाजूंतील प्रदेशांत ह्या दोन जातींचें एकीकरण अत्यंत दृढ झालेलें दिसतें. पुण्यांतील एखाद्या ब्राह्मणास जर मराठा आणि कुणबी यांच्यांत भेद काय असें विचारलें, तर तो "कुणबी माजला म्हणजे मराठा होतो" असें उत्तर देईल. याचा अर्थ असा कीं, जेव्हां एखाद्या कुणब्याची भरभराट होते तेव्हां तो आपल्या कुटुंबांत पाट लावण्याचा प्रघात बंद करितो, जानवीं घालण्याचा प्रघात सुरू करितो व बायकांस पडद्यांत ठेवितो. भरभराटींत आलेल्या बऱ्याच कुणब्यांचे संबंध मराठ्यांशीं होऊन शेवटीं ते त्यांत सामील झाल्याचीं उदाहरणें कांहीं थोडींथोडकीं नाहींत.

मराठ्यांप्रमाणेंच मराठा कुणब्यांत कुळें व देवकें आहेत. ज्यांचें कूळ व देवक एकच आहे अशा कुटुंबांत शरीरसंबंध होत नाहीं. कांहीं ठिकाणीं देवक एक असलें तरी कूळ भिन्न असलें म्हणजे शरीरसंबंध होतो. आतेबहिणीशीं व मामेबहिणीशीं लग्न लाव[illegible] भावांचें बहिणीबहिणींशीं लग्न होऊं शकतें. मुलींचीं लग्नें वयांत आल्यानंतरही करण्यास हरकत नाहीं. परंतु बहुधा दोन वर्षांपासून दहाबारा वर्षांच्या वयापर्यंत त्यांचीं लग्नें करण्यांत येतात. मुलांचीं लग्नें बहुधा सोळा ते पंचविसांच्या दरम्यान करितात. विधवांस लग्न करितां येतें. परंतु कांहीं कुळांत पाट लावणें कमीपणाचें मानतात व पाट लावीत नाहींत. विधवांचीं लग्नें विधुरांबरोबरच झालीं पाहिजेत असा नियम आहे. अशा लग्नांपासून झालेल्या संततीस प्रथमविवाहापासून झालेल्या संततीइतका मिळकतीचा हिस्सा मिळत नाहीं. सोडचिठ्ठी देतां येते. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रियांस पाटाच्या विधीनें दुसरें लग्न लावितां येतें.

मराठा कुणब्यांपैकीं पुष्कळ लोक वारकरी पंथाचे आहेत. त्यांस माळकरी असेंही म्हणतात. ते हिंदूंच्या सर्व देवतांस भजतात; पण विशेषेंकरून भैरव, भवानी, बिरोबा, जाखाई, जनाई, जोखाई, काळकाई, खंडोबा, मारुती, म्हसोबा, मुकाई, नवलाई, फिरंगाई, सटवाई, तुकाई, वाघोबा आणि वेताळ यांस विशेष

भजतात. ते हिंदूंच्या सर्व यात्रांस जातात. भुतें, जादू, दृष्ट वगैरे गोष्टींवर त्यांचा दृढ विश्वास आहे. त्यांचे उपाध्ये देशस्थ ब्राह्मण असतात. ते गोसाव्यांपासून उपदेश घेतात.

मराठे कुणबी बकरे, मेंढे, हरिण, रानडुकर, कोंबडीं वगैरेचें मांस व मासे खातात. ते दारू पितात.

**कोंकणी कुणबी**—मुख्यत्वेंकरून रत्नागिरी जिल्ह्याच्या उत्तर भागांत व कुलाबा जिल्ह्याच्या दक्षिण भागांत सांपडतात. त्यांना लोक तिलोरी कुणबी म्हणतात; परंतु ठाणें जिल्ह्यांतील तल्हेरी कुणब्यांशीं त्यांचा कोणत्याही प्रकारें संबंध नाहीं. ते आपण मराठे अथवा क्षत्रिय आहोंत असें म्हणत नाहींत, तर आपण शूद्र असल्याचें सांगतात. त्यांच्यांत मराठा कुणब्यांप्रमाणें कुळें नाहींत. एकच आडनांव असलेल्या लोकांत शरीरसंबंध होत नाहीं. पाट लावणें कमीपणाचें समजलें जात नाहीं; पण सोडचिठ्ठीस प्रतिबंध आहे. त्यांच्या मुख्य देवता बहिरी, झुगाई, नवलाई, पवनाई आणि भगवती ह्या होत. त्यांचे उपाध्ये चित्पावन व कऱ्हाडे ब्राह्मण असतात. क्वचित् देवरुखेही असतात. ते मराठा कुणब्यांप्रमाणेंच मांस खातात व दारू पितात.

**तल्हेरी कुणबी**—[illegible] जिल्ह्यांतील मध्य प्रदेशांत आढळतात. त्यांच्यांत तेथील मूळचे व बाहेरून आलेले असे दोन प्रकारचे लोक आहेत. मूळचे लोक सोनकोळ्यांहून फारसे भिन्न नाहींत. बाहेरून आलेले लोक मुख्यत्वेंकरून मराठे असावे. कारण त्यांच्यांत मराठ्यांसारखींच देवकें व कुळें असून त्यांच्या रीतिभातींतही बरेंच साम्य आहे. तल्हेरी कुणबी व मराठे यांचा संबंध मराठा कुणबी व मराठे यांच्या संबंधाप्रमाणेंच आहे. मराठ्यांबरोबर आणि मराठा कुणब्यांबरोबर त्यांचा अन्नव्यवहार होतो व क्वचित् शरीरसंबंधही होतो.

**खानदेशी कुणबी**—ह्यांत सात पोटभेद आहेत, (१) घाटोळे, (२) कुंभार, (३) मद्राज, (४) लोणी, (५) पांजणा, (६) तिडोले किंवा तिरोळे, (७) वंजारी. घाटोळे घांटावरून आले आहेत असें सांगतात. ते तिरोळ्यांच्या हातचें अन्न खातात, पण त्यांच्याशीं शरीरसंबंध करीत नाहींत.

लोण्यांस तेथील मूळ रहिवाशी मानण्यांत येतें. ते गिरणा व तापी नदीच्या किनाऱ्यावरील लहान खेड्यांतून राहातात. तिरोळे व पांजणा यांजबरोबर त्यांचा अन्नव्यवहार होतो, परंतु ते लग्नें मात्र आपसांतच करितात. कुंभारांची संख्या अगदीं लहान असून ते फार गरीब आहेत. वंजारी हे वाहतुकीचा धंदा करणाऱ्या वंजाऱ्यांपैकीं असून, शेतकी करूं लागल्यापासून कुणब्यांच्या रीतिरिवाजांचें अनुकरण करून त्यांनीं आपली एक स्वतंत्र जातच बनविली आहे. पांजणांमध्यें चार पोटभेद आहेत. कंदारकर, नवघरी, रेवा आणि थोरगव्हाणा. त्यांत रेवांचा भरणा मोठा असून बाकीचे भेद तंट्याभांडणावरून पडलेले आहेत. थोरगव्हाणा आणि कंदारकर हीं नांवें गांवांवरून पडलेलीं आहेत. नवघरी हे मूळ जातीस सोडून निघालेल्या नऊ कुटुंबांचे वंशज असावे असें दिसतें. हे सर्व पोटभेद परस्परांशीं अन्नव्यवहार करितात, परंतु जो तो आपणासच इतरांपेक्षां श्रेष्ठ मानीत असल्यामुळें ते एकमेकांशीं शरीरसंबंध करीत नाहींत. तिरोळे हे उत्तर हिंदुस्थानांतून आलेले असून ते दादर पवारांपैकीं आहेत असें सांगतात.

[illegible] व्वेंकरून बेळगांव जिल्ह्यांतील खानापूर तालुक्यांत आणि कारवार जिल्ह्यांतील सुपें पट्या [illegible] ळतात. त्यांना कोंकणी कुणबी असेंही म्हणतात. गोव्यांतील नैऋत्येकडील कुणबी आणि हे कुणबी एकच आहेत. सोळाव्या शतकांत पोर्तुगीज लोकांकडून हिंदु लोकांचा जो छळ झाला, त्या वेळीं त्यांचे पूर्वज इकडे येऊन राहिले असें सांगतात. ते कोंकणी भाषा बोलतात.

काळे कुणब्यांत पुष्कळ कुळें आहेत. प्रत्येक कुळाचें एक एक दैवत असतें. ज्यांचें कुळ व दैवत एक असतें त्यांच्यांत शरीरसंबंध होत नाहीं.

काळे कुणब्यांचीं लग्नें ब्राह्मण अथवा लिंगाइत उपाध्ये चालवितात. त्यांतील ' धारे ' हा विधि झाला म्हणजे लग्न पक्कें झालें असें समजतात. ह्या विधींत नवरानवरीचे हात एकत्र जोडून त्यावर पाणी ओततात. मुलींचीं लग्नें वयांत येण्यापूर्वीं अथवा नंतरही करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. सोडचिठ्ठी देतां येत नाहीं.

काळे कुणब्यांस स्वर्ग, नरक अथवा हिंदूंच्या निरनिराळ्या देवता यांची विशेषसी माहिती नाहीं. ते मुख्यत्वेंकरून भुताखेतांचीच पूजा करितात. प्रत्येक मनुष्य मेल्यानंतर त्याच्या बऱ्यावाईट कर्मांप्रमाणें बरें अथवा वाईट भूत होतो अशी त्यांची समजूत आहे. मृत्यु झाल्यानंतर घाड्यास बोलावून मृत कोणत्या प्रकारचें भूत होण्याचा संभव आहे तें त्यास विचारतात. तो चांगलें भूत होणार असल्यास, कुटुंबाच्या कल्याणासाठीं, कुटुंबाच्या घरांत राहाण्याविषयीं त्याचें मन वळविण्यास सांगतात. चांगल्या भुतांस मिराशांमार्फत नारळ व अन्न अर्पण करून त्यांची मर्जी संपादन करितात. वाईट भुतांस घाड्यामार्फत बकरीं व कोंबड्यांचे बळी देतात. हिंदु सणांपैकीं ते गणेशचतुर्थी, शिमगा, दसरा, दिवाळी व आषाढी-कार्तिकी एकादशी पाळतात. कांहीं बसव व नंदी यांस भजतात व जंगमांची उपाध्यांच्या कामीं योजना करितात.

मृतांस बहुतकरून पुरण्यांत येतें. मृताच्या चवथ्या दिवशीं पंचगव्य घेतलें म्हणजे सुतक फिटतें.

काळे कुणबी मासे व जंगली जनावरांचें मांस खातात. ते बकरे, मेंढे, कोंबडीं वगैरे पाळींव जनावरांचें व पक्षांचें मांस खात नाहींत. कोंबडें [illegible] निषिद्ध मानण्यांत येतें कीं [illegible]

तल्हेरी कुणबी [illegible] तील मध्य प्रदेशांत आढळतात. त्यांच्यांत तेथील मूळचे व बाहेरून आलेले असे दोन प्रकारचे लोक आहेत. मूळचे लोक सोनकोळ्यांहून फारसे भिन्न नाहींत. बाहेरून आलेले लोक मुख्यत्वेंकरून मराठे असावे. कारण त्यांच्यांत मराठ्यांसारखींच देवकें व कुळें असून त्यांच्या रीतिभातींतही बरेंच साम्य आहे. तल्हेरी कुणबी व मराठे यांचा संबंध मराठा कुणबी व मराठे यांच्या संबंधाप्रमाणेंच आहे. मराठ्यांबरोबर आणि मराठा कुणब्यांबरोबर त्यांचा अन्नव्यवहार होतो व क्वचित् शरीरसंबंधही होतो.

**खानदेशी कुणबी**—ह्यांत सात पोटभेद आहेत, (१) घाटोळे, (२) कुंभार, (३) मद्राज, (४) लोणी, (५) पांजणा, (६) तिडोले किंवा तिरोळे, (७) वंजारी. घाटोळे घाटांवरून आले आहेत असें सांगतात. ते तिरोळ्यांच्या हातचें अन्न खातात, पण त्यांच्याशीं शरीरसंबंध करीत नाहींत.

अन्नव्यवहार अथवा शरीरसंबंध करीत नाहींत. पट्टणी, लेवा व कडवा यांजबरोबर अन्नव्यवहार करितात, पण शरीरसंबंध करीत नाहींत. लेवा आणि कडवा हे मतिया, आंजणा, मोम्ना आणि डांगी यांच्याशीं अन्नोदकव्यवहार करीत नाहींत. आंजणा आणि डांगी यांचा परस्परांशीं अन्नव्यवहार होतो.

लेवा, कडवा, आंजणा, डांगी, उदा आणि पट्टणी यांच्या रीतिरिवाजांत व धर्मसमजुतींत फारसा फरक नाहीं. मतिया आणि मोम्ना अर्धवट हिंदु अर्धवट मुसलमान असे आहेत. मतिया व मोम्ना शिवाय करून इतर कुणब्यांच्या चालीरीति पुढें वर्णन केल्याप्रमाणें आहेत. त्यांच्यांत जे विशेष आहेत ते प्रत्येक पोटभेदाखालीं पुढें निरनिराळे दिले आहेत. मतिया आणि मोम्ना यांचें वर्णन अगदीं स्वतंत्रपणें केलें आहे.

एकाच कुळांतील स्त्रीपुरुषांत शरीरसंबंध होत नाहीं. आतेबहिणीशीं, मावसबहिणीशीं अथवा मामेबहिणीशीं लग्न करतां येत नाहीं. भावाभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न लावितां येतें. लग्नें बहुधा अगदीं अल्प वयांतच होतात. विधवाविवाहास मोकळीक आहे. नवराबायकोचें पटत नसल्यास सोडचिठ्ठी घेतां [illegible] बायकोस सोडचिठ्ठी दिली तर त्यास तिला [illegible]

आणि कारवार जिल्ह्यांतील सुपें पेट्यां [illegible] ळतात. त्यांना कोंकणी कुणबी असेंही म्हणतात. गोव्यांतील नैर्ऋत्येकडील कुणबी आणि हे कुणबी एकच आहेत. सोळाव्या शतकांत पोर्तुगीज लोकांकडून हिंदु लोकांचा जो छळ झाला, त्या वेळीं त्यांचे पूर्वज इकडे येऊन राहिले असें सांगतात. ते कोंकणी भाषा बोलतात.

काळे कुणब्यांत पुष्कळ कुळें आहेत. प्रत्येक कुळाचें एक एक दैवत असतें. ज्यांचें कुळ व दैवत एक असतें त्यांच्यांत शरीरसंबंध होत नाहीं.

काळे कुणब्यांचीं लग्नें ब्राह्मण अथवा लिंगाइत उपाध्ये चालवितात. त्यांतील 'धारे' हा विधि झाला म्हणजे लग्न पक्कें झालें असें समजतात. ह्या विधींत नवरानवरीचे हात एकत्र जोडून त्यावर पाणी ओततात. मुलींचीं लग्नें वयांत येण्यापूर्वीं अथवा नंतरही करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. सोडचिठ्ठी देतां येत नाहीं.

आंजणांशिवाय कोणतेही कणबी मांस खात नाहींत व दारू पीत नाहींत.

कणब्यांतील बहुतेक सर्व शेतकी करितात. त्यांपैकीं पुष्कळ मुखी म्हणजे पोलीसपाटील आहेत. कणबी लष्करांत नोकरी धरीत नाहींत. ते ( विशेषेंकरून लेवा व कडवा ) शेतीच्या कामांत फार वाकबगार असतात. शहरांत राहणारे पुष्कळ कणबी रेशीम व सूत यांचें कापड विणण्यांत फार कुशल असतात. कित्येक कपड्यांचा व धान्याचा व्यापार करितात. कित्येक सरकारी नोकरींत बरेच वरिष्ठ दर्जापर्यंत चढलेले आहेत. त्यांजपैकीं कित्येकजण व्याजबट्टयाचा धंदा करूनही बराच पैसा कमवितात.

**आंजणा कणबी**—मुख्यत्वेंकरून उत्तर गुजराथेंत आढळतात. दिसण्यांत कणब्यांपेक्षां कोळ्यांशीं त्यांचें साम्य अधिक आहे. त्यांच्या कांहीं नांवांचा शेवट रजपुतांच्या नांवांप्रमाणें ‘ सिंग ’ या शब्दांत होतो. जसें, दानसिंग, हरिसिंग, राजसिंग, उमसिंग. त्यांच्यांत तेवीस शाखा आहेत. कच्छमधील कांहीं आंजणा जैनधर्मी आहेत.

**डांगी कणबी**—महीकांठयांत आढळतात. ते मूळचे आंजणा. पण भिल्ल लोकांचा पोशाख व भाषा यांचा स्वीकार [illegible] निराळे बनले. पुष्कळ डांगी मेवाड[illegible]. त्यांचा आणि महीकांठयांतील डांग्यांचा शरीरसंबंध होतो.

**गुजर कणबी**—पूर्व व पश्चिम खानदेशांत आढळतात. त्यांच्यांत आठ पोटभेद आहेत. ( १ ) अनाळा, ( २ ) दाले, ( ३ ) दोरे, ( ४ ) गरी, ( ५ ) कडवा, ( ६ ) खापरा, ( ७ ) लोंढारी किंवा बाड, ( ८ ) रेवा किंवा लेवा. दाले शहादें व तळोदें तालुक्यांत तापी नदीच्या कांठीं व बऱ्हाणपुराजवळ रावेर येथें राहतात. जामनेरचे देशमूख गरी गुजर आहेत असें सांगतात. पण ते आपणास रेवा गुजर म्हणवितात. रेवा किंवा लेवा हे गुजराथेंतील लेवांचीच एक शाखा आहे असें दिसतें. कडवा, अनाळा आणि दाले यांची संख्या फारच लहान आहे. लोंढारी हे कापूस पिंजण्याचेंच काम करीत असल्यामुळें त्यांस हें नांव पडलें आहे. खापरा हे अनेक जातींच्या मिश्रणापासून झालेले आहेत. त्यांचा दर्जा फार हलका आहे.

**कडवा कणबी**—मुख्यत्वेंकरून अहमदाबाद जिल्ह्यांत व बडोदें संस्थानांतील कडी तालुक्यांत आढळतात. त्यांच्यांतील कित्येक लोक आपण राम व सीता यांचा मुलगा कुश याचे वंशज अथवा अनुयायी आहों असें सांगतात. त्यांच्या उत्पत्तीविषयीं पुढील दंतकथाही प्रचलित आहे. एकदा शिवाची पत्नी उमा हिनें चिखलाच्या कांहीं मूर्ती केल्या व त्यांस जिवंत करण्याविषयीं शिवास विनंती केली. शिवानें त्यांस जिवंत करून अहमदाबादेच्या उत्तरेस सरासरी चाळीस मैलांवर त्यांना राहाण्याकरितां उंझा नांवाच्या खेड्याची स्थापना केली. या ठिकाणीं उमेचें मंदिर बांधण्यांत आलें आहे. हें खेडें व मंदिर आपल्या जातीचें मुख्य स्थान आहे असें कडवा कणबी मानितात व नवस फेडण्यासाठीं तेथें दूरदूरच्या ठिकाणाहून येतात. कडवा कणबी हे काबुलाहून पंजाबांतून गुजराथेंत आले असें कित्येकांचें मत आहे. त्यांच्या बहुतेक शाखांचीं नांवें पंजाबांतील खेड्यांवरून पडलेलीं असल्यामुळें ह्या म्हणण्यास बळकटी येते.

सुरत येथील कडवा कणब्यांत तीन पोटभेद आहेत. त्यांचीं नांवें लालचुडावाला, काळाचुडावाला व अहमदाबादी अशीं आहेत. ज्यांच्या बायका लाल बांगड्या घालतात ते लालचुड[illegible] व ज्यांच्या बायका काळ्या बांगड्या घालतात ते काळाचुडावाला. अहमदाबादेहून [illegible]दाबादी. ह्या तिन्ही पोटभेदांचा परस्परांशीं अन्नव्यवहार होतो, पण गेलीं तीस चाळीस वर्षें त्यांनीं परस्परांशीं शरीरसंबंध करण्याचें सोडिलें आहे. दक्षिण गुजराथेंत लेवा कुणब्यांप्रमाणें त्यांच्यांत कुलिया व अकुलिया असे दोन भेद आहेत. त्यांचा परस्पर व्यवहार लेवा कणब्यांतील त्या भेदांतील व्यवहाराप्रमाणें होतो. कडवा कणब्यास आपल्या बायकोस वाटेल तेव्हां सोडचिठ्ठी देतां येते. परंतु उत्तर गुजराथेंत कडवा स्त्रीस नवऱ्याच्या संमतीवांचून त्यास सोडचिठ्ठी देतां येत नाहीं; तसेंच मूल झाल्यानंतरही देतां येत नाहीं. कडवा कणब्यांचीं लग्नें दर नऊ, दहा अगर अकरा वर्षांनीं एकदा होतात. अलीकडे ही मर्यादा पांच ते एक वर्षांवर आणण्याचे प्रयत्न कित्येकांनीं चालविले आहेत व त्याप्रमाणें थोडे लग्नसमारंभ घडवूनही आणले आहेत. तथापि ही सुधारणा सर्व जातीस अजून मान्य झालेली नाहीं.

कडव्यांत मूळच्या एकंदर बावन शाखा आहेत. त्यांतील बहुतेकांचीं नांवें पंजाबांतील खेड्यांवरून पडलेलीं आहेत. सध्यां कडवा, ज्या खेड्यांत [illegible] ते राहात असतील, त्या खेड्याचें नांव आपल्या शाखेस देतात. जसें नरोड्यांत राहाणारे ते नरोडिया. एकाच खेड्यांत राहणारे लोक शरीरसंबंध करीत नाहींत. याप्रमाणें मूळच्या शाखांत दिवसेंदिवस भर पडत चालली आहे.

कडव्यांमध्यें अनेक सामाजिक दर्जे आहेत. त्यांत अहमदाबाद शहरांतील कडवे सर्वांत श्रेष्ठ गणले जातात. कांहीं वर्षांपूर्वीं महिन्याच्या मुलांचीं लग्नें लावण्यांत येत असत. इतकेंच नव्हे, तर गर्भांतील मुलांचींही लग्नें तीं ठरवल्याप्रमाणें मुली अथवा मुलगे निपजतील अशा अनुमानावर लावण्यांत येत असत. हीं लग्नें शास्त्रसिद्ध ठरविण्यासाठीं अशा मुलांच्या आया लग्नमंडपांत अग्नीसभोंवतीं प्रदक्षिणाही घालीत असत. पण ही चाल आतां बंद पडली आहे.

कडव्यांचीं लग्नें नियमित वर्षांच्या अंतरानें एकदा लावावयाचीं असल्यामुळें मुलीस योग्य वर मिळण्याची अडचण पडते. ही [illegible] ते निराळे बनले. पुष्कळ डांगी [illegible] त्यांचा आणि महीकांठ्यांतील डांग्यांचा शरीरसंबंध होतो.

**गुजर कणबी**—पूर्व व पश्चिम खानदेशांत आढळतात. त्यांच्यांत आठ पोटभेद आहेत. (१) अनाळा, (२) दाले, (३) दोरे, (४) गरी, (५) कडवा, (६) खापरा, (७) लोंढारी किंवा बाड, (८) रेवा किंवा लेवा. दाले शहादें व तळोदें तालुक्यांत तापी नदीच्या कांठीं व बऱ्हाणपुराजवळ रावेर येथें राहतात. जामनेरचे देशमूख गरी गुजर आहेत असें सांगतात. पण ते आपणास रेवा गुजर म्हणवितात. रेवा किंवा लेवा हे गुजराथेंतील लेवांचीच एक शाखा आहे असें दिसतें. कडवा, अनाळा आणि दाले यांची संख्या फारच लहान आहे. लोंढारी हे कापूस पिंजण्याचेंच काम करीत असल्यामुळें त्यांस हें नांव पडलें आहे. खापरा हे अनेक जातींच्या मिश्रणापासून झालेले आहेत. त्यांचा दर्जा फार हलका आहे.

पाटीदारांस अकुलिया म्हणतात. कुलिया लोक अकुलियांस आपल्या मुली देत नाहींत. कुलियांमध्यें विहिरीचें पाणी काढणें व इतर घरकामें नोकरांकडून करविलीं जातात. त्यांच्या बायका पडद्यांत राहतात व विधवाविवाह त्यांच्यांत रूढ नाहीं. वाण्यांप्रमाणें लेवा कणब्यांतही खेड्यांचे निरनिराळे संघ अथवा गोल केलेले असून एका गोलांतील मुलांमुलींचीं दुसऱ्या गोलांतील मुलांमुलींबरोबर लग्नें केलीं जात नाहींत. परंतु या गोलांच्या मर्यादा निश्चित स्वरूपाच्या नसतात. त्यांत वारंवार बदल केला जातो.

ब्रिटिश सत्ता स्थापन होण्यापूर्वीं कुलिया पाटीदारांकडे शेतकऱ्यांकडून शेतसारा वसूल करण्याचें काम असे. ते जुलूम जबरदस्ती करून भारी कर वसूल करीत असत. सर्वे सेट्लमेंट झाल्यापासून त्यांच्या हातची ही सत्ता गेली आहे. तरीही त्यांचें वजन मोठें असून साधारण शेतकऱ्यांपेक्षां त्यांचा दर्जा श्रेष्ठ समजला जातो.

[illegible] कणबी — हे फक्त सुरत जिल्ह्यांतील जलालपूर आणि बार्डोली [illegible] बांगड्या घालतात ते लालचुडावाला [illegible] हिंदु अर्धवट मुसलमानी असा घालतात ते काळाचुडावाला. अहमदाबादेहून आलेले [illegible]दावादी. ह्या तिन्ही पोटभेदांचा परस्परांशीं अन्नव्यवहार होतो, पण गेलीं तीस चाळीस वर्षें त्यांनीं परस्परांशीं शरीरसंबंध करण्याचें सोडिलें आहे. दक्षिण गुजराथेंत लेवा कुणब्यांप्रमाणें त्यांच्यांत कुलिया व अकुलिया असे दोन भेद आहेत. त्यांचा परस्पर व्यवहार लेवा कणब्यांतील त्या भेदांतील व्यवहाराप्रमाणें होतो. कडवा कणब्यास आपल्या बायकोस वाटेल तेव्हां सोडचिठ्ठी देतां येते. परंतु उत्तर गुजराथेंत कडवा स्त्रीस नवऱ्याच्या संमतीवांचून त्यास सोडचिठ्ठी देतां येत नाहीं; तसेंच मूल झाल्यानंतरही देतां येत नाहीं. कडवा कणब्यांचीं लग्नें दर नऊ, दहा अगर अकरा वर्षांनीं एकदा होतात. अलीकडे ही मर्यादा पांच ते एक वर्षावर आणण्याचे प्रयत्न कित्येकांनीं चालविले आहेत व त्याप्रमाणें थोडे लग्नसमारंभ घडवूनही आणले आहेत. तथापि ही सुधारणा सर्व जातीस अजून मान्य झालेली नाहीं.

इ० स० १८८० पर्यंत मतियांमध्यें पोटभेद नव्हते. ह्या वर्षी सुरतेच्या निर्मलदास नांवाच्या एका साधूनें त्यांस ते पूर्वी लेवा कणबी असल्याचें सांगून उपदेश केला. त्याचा उपदेश ऐकून त्यांपैकीं कित्येकांस आपल्या अर्धवट हिंदु अर्धवट मुसलमान चालीरीतींबद्दल तिरस्कार उत्पन्न होऊन ते काशीयात्रेस निघाले. तेव्हां त्यांस जातिबहिष्कृत करण्यांत आलें. त्यांचा वैष्णव मतिया या नांवाचा स्वतंत्र पोटभेद बनला. ते रामानंद व दादू पंथाचे अनुयायी झाले. त्यांनीं आपल्या मुसलमान चालीरीतींचा त्याग केला असून सर्व प्रकारें लेवा कणब्यांच्या चालीरीतींचा स्वीकार केला आहे. तथापि लेवा कणबी त्यांच्याशीं अन्नव्यवहार अथवा शरीरसंबंध करीत नाहींत; तसेंच वैष्णव मतिया व मूळचे म्हणजे पिराणा मतिया यांचाही परस्पर अन्नव्यवहार अथवा शरीरसंबंध होत नाहीं.

पिराणा मतियांत मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न करण्याची चाल आहे. प्रथमवरास विधवेशीं अथवा सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रीशीं लग्न करावयाचें असल्यास अगोदर शमीबरोबर लग्न करावें लागतें. त्यांचे लग्नविधि लेवा कणब्यांच्या लग्नविधींप्रमाणेंच असतात. [illegible] बांधून तो पुष्पगुच्छ नदींत अथवा विहिरींत फेंकून देतात. असें केल्यानें विवाहित मुलगी विधवा होते व मग तिचें लग्न कोणत्याही योग्य दिवशीं नात्राच्या ( विधवाविवाहाच्या ) विधीनें करतां येतें.

**लेवा कणबी**—गुजराथेंतील सर्व कणब्यांत ह्यांची संख्या मोठी आहे. हे सर्व गुजराथभर पसरलेले आहेत. परंतु त्यांच्या वस्तीचीं मुख्य ठिकाणें खेडा जिल्ह्यांतील आनंद, नडियाद आणि बोर्साद तालुके होत. ते कच्छमध्येंही आढळतात. तेथें त्यांच्यांत हलाई आणि वाघडिया असे दोन पोटभेद आहेत. ह्या पोटभेदांचा परस्पर अन्नव्यवहार होतो, पण शरीरसंबंध होत नाहीं. गुजराथेंतील लेवांत पाटीदार आणि कणबी असे दोन पोटभेद आहेत. पाटीदार आपल्या मुली कणब्यांच्या मुलांस देत नाहींत, पण कणब्यांच्या मुली, त्यांनीं मोठा हुंडा दिल्यास, करितात. शिवाय खेडा जिल्ह्यांतील चरोतर मधील तेरा खेड्यांतील पाटीदारांस कुलिया म्हणतात आणि इतर खेड्यांतील

बळेव व दिवाळी हे सण पाळतात. त्यांच्या यात्रेचीं मुख्य ठिकाणें नवसरी, पिराणा, बऱ्हाणपूर व वेमाळ हीं होत. ते जेव्हां यात्रेस जातात तेव्हां त्यांच्याबरोबर काका असतो. बऱ्हाणपूर येथें ते आपल्या गुरूच्या पायाच्या आंगठयाची पूजा करितात. यात्रेकरू शंभर रुपये वर्गणीनें जमवून त्यांची रास गुरूच्या पुढें करितात. ह्या राशीवर गुरू आपला उजवा पाय ठेवतो. यात्रेकरू तो धुतात, त्यास अत्तर चोळतात व एकामागून एक याप्रमाणें त्याचें चुंबन घेतात. त्यांच्याबरोबर जो काका असतो त्याजकडे, गुरू त्याच्याकरितां व त्याच्या बायकोकरितां वस्त्रें व अलंकार देतो.

पिराणा मतिया मृतांस पुरतात. अंत्यविधि काका चालवितो. प्रेत पुरल्यावर दोन अर्धवट हिंदु अर्धवट मुसलमान प्रार्थना म्हणण्यांत येतात. गुजराथेंतील हिंदूप्रमाणें मृताकरितां मतिया स्त्रिया दहा दिवस छाती बडवून शोक करितात. मृत्यूनंतर दहाव्या आणि अकराव्या दिवशीं जातींतील लोकांस जेवण देण्यांत येतें. अकराव्या दिवशीं ब्राह्मणांस कांहीं देणग्या दिल्या जातात. अहमदाबाद [illegible] नवसरी अथवा वेमाळ येथील पिरास १५ ते १०० रुपयेपर्यंत तालुक्यांत आढळतात. त्यांचा [illegible] आहे. ते मूळचे लेव कणबी. सुमारें तीनशें वर्षोपूर्वी कांहीं लेवा कणबी काशीच्या यात्रेस निघाले. एके दिवशीं रात्रीं त्यांचा मुक्काम अहमदाबादेपासून दहा मैलांच्या अंतरावर गरमाठ नांवाच्या गांवीं पडला. त्या वेळीं तेथें इमामशहा नांवाचा मुसलमान साधू राहात असे. त्यानें त्या यात्रेकरूंस सांगितलें कीं, जर तुम्ही माझें ऐकाल तर काशीला जाण्याचे श्रम न घेतांच तुमचा हेतु येथल्या येथेंच तडीस जाईल. कित्येकांनीं त्याच्या म्हणण्याकडे लक्ष न देतां ते काशीस चालते झाले. दुसरे कित्येक त्याच्यावर विश्वास ठेवून तेथेंच राहिले. त्यांस काशीचें दर्शन, गंगेंत स्नान व ब्राह्मणभोजनाचें श्रेय तेथल्या तेथेंच लाभलें. ह्या चमत्काराचा त्यांच्यावर परिणाम होऊन त्यांनीं इमामशहास आपला गुरू केलें. ह्यासंबंधानें दुसरी अशी हकीगत सांगतात कीं, त्यांच्यावर जबरीनें मुसलमान होण्याचें संकट आलें होतें तें टाळण्याकरितां त्यांनीं इमामशहास आपला गुरू केलें.

मोम्ना कणबी शेंड्या ठेवितात. ते आपसांत एकमेकांचें श्रावकांप्रमाणें 'जोहार' 'जोहार' या शब्दांनी स्वागत करितात आणि इतरांस रामराम करितात. अलीकडे त्यांच्यापैकीं पुष्कळ लोक स्वामीनारायण पंथाचा स्वीकार करून हिंदु झाले आहेत. ह्याप्रमाणें हिंदु झालेल्या मोम्नांची एक स्वतंत्र पोटजातच झाली आहे. ते मूळच्या मोम्नांशीं अन्नव्यवहार करितात. आपल्या नवीन धर्मास संमत नसलेल्या तेवढयाच चालीरीती त्यांनीं सोडलेल्या आहेत. ते मूळ मोम्नांस स्वामीनारायण पंथाचा स्वीकार करण्याच्या अटीवर आपल्या पोटजातींत घेतात.

मोम्ना कणब्यांतील लग्न करण्याच्या मर्यादा लेवा कणब्यांप्रमाणेंच आहेत. त्यांचे लग्नविधि मात्र कांहीं बाबतींत निराळे आहेत. त्यांच्यांत बहुलें घालीत नाहींत व होमही करीत नाहींत. दुवा नांवाचा एक विधि करण्यांत येतो. तो केल्यानंतर लग्न पक्कें झालें असें समजतात. एका पाटावर तीन दिवे पेटवून ठेवितात. हे दिवे ब्रह्मा, विष्णु व महेश ह्यांचे द्योतक आहेत असें सांगण्यांत येतें. ह्या दिव्यांसमोर नवरानवरीस बसवितात आणि [illegible] उपाध्ये मोध अथवा औदिच ब्राह्मण चालवितात. ते आपणास सत्पंथी म्हणजे सत्यास अनुसरणारे असें म्हणवितात. पिराणा, अहमदाबाद, नवसरी व बऱ्हाणपूर येथील मुसलमान पिरांस ते भजतात. इमामशहाचीं धर्ममतें ज्यांत ग्रथित केलीं आहेत असा 'शिक्षापत्री' नांवाचा एक ग्रंथ आहे तो त्यांचा पवित्र ग्रंथ होय. त्यांच्यापैकीं कांहीं हा ग्रंथ मुखोद्गत करितात. त्यांस 'काका' असें म्हणतात. ह्या काकांपैकीं एका विशिष्ट शाखेचे पुरुष त्यांचे कांहीं धर्मविधि चालवितात. ह्याच काकांच्यामार्फत अहमदाबाद, नवसरी व बऱ्हाणपूर येथील इमामशहाच्या वंशजांस देणग्या दिल्या जातात.

पिराणा मतिया प्रत्येक महिन्याच्या शुद्ध द्वितीयेस पवित्र दिवस मानतात. ही द्वितीया शुक्रवारीं आल्यास ते सर्व दिवस उपोषण करितात आणि रात्रीं चंद्रदर्शन होईपर्यंत अन्न ग्रहण करीत नाहींत. ते रमजानचा उपवास पाळतात, तसेंच ते उरूसही पाळतात. हिंदुसणांपैकीं ते होळी, आखात्रिज, दिवासो,

मृतांस पुरण्यांत येतें. मृत्यूनंतर तिसऱ्या अथवा दुसऱ्या कोणत्याही सोईवार दिवशीं जातीस जेवण देण्यांत येतें. दर वर्षी पितृपक्षांत मृततिथीच्या दिवशीं, खान्यांत मुलांस आणि तेथें हजर असलेल्या इतर लोकांस कंसार वांटतात.

मोम्ना पक्के शाकाहारी आहेत. ते मुसलमानांच्या हातचें अन्न खात नाहींत. रजपूत, दर्जी, लोहार, वालंद इत्यादि जातींचे लोक मोम्नांच्या हातचें अन्न खातात.

**उदा कणबी**—हा मूळ लेवा कणब्यांचाच एक पोटभेद असून आतां त्यांची स्वतंत्र जात बनलेली आहे. ते उदा नांवाच्या एका भगताचे अनुयायी आहेत. ते इतर जातींपासून अगदीं अलग राहतात. तांब्याच्या अगर पितळेच्या भांड्यास ब्राह्मणाचा जरी स्पर्श झाला तरी त्यांतील पाणी ते पीत नाहींत. ते कबीरपंथी आहेत.

**कुलमा**—ह्या जातीचे लोक फक्त बेळगांव जिल्ह्यांतच आढळतात. कुलमा हें नांव कानडी कुलमा म्हणजे 'भट्टी' या शब्दावरून पडलें आहे. ह्यांचे रीतिरिवाज कणब्यांपासून फारसे भिन्न नाहींत. त्यांची कुलदेवता यल्लम्मादेवी किंमतीच्या देणग्या पाठविण्यांत [illegible] करीत नाहींत व यात्रेस जात नाहींत

पिराणा मतिया पक्के शाकाहारी आहेत. ते दारू पीत नाहींत.

**मोम्ना कणबी**—कच्छबाहेर फारसे आढळत नाहींत. कच्छमधील दोन तृतीयांश कुणबी मोम्ना जातीचे आहेत. ते अर्धवट हिंदु अर्धवट मुसलमान आहेत. परंतु अलीकडे त्यांस नांवानेंही मुसलमान म्हटलेलें आवडत नाहीं. ते आपणास लेवा पाटीदार अथवा लेवा कणबी म्हणवितात, आणि ते पाळीत असलेले थोडेसे मुसलमानी धर्मांचे रिवाज सोडून दिले तर ते सर्वस्वी हिंदूच आहेत. ते आपणास लेवा कणब्यांचे वंशज म्हणवितात आणि पाटण येथें एका मुसलमान सय्यदानें आपल्या पूर्वजांस बाटविलें असें सांगतात. हा सय्यद मतिया कणब्यांस मुसलमानी धर्माची दीक्षा देणारा इमामशहाच असावा असें दिसतें. कित्येकांच्या मतें पीर सदरउद्दीन यानें त्यांस बाटविलें आणि मोम्ना अथवा मोमोन म्हणजे श्रद्धावंत असें नांव त्यांस ठेविलें.

पण हें मतही पुराव्यानें सिद्ध झालेलें नाहीं. तथापि धनगरांतील ह[illegible]र व खिल्लारी हे दोन पोटभेद त्यांच्यांत सांपडतात.

कुरुबांचा वंशपरंपरागत चालत आलेला धंदा म्हणजे मेंढयाबकऱ्यांचे कळप पाळणें व घोंगडया विणणें. पुष्कळ कुरुबा शेतकी करितात व थोडेसे व्याजबट्ट्याचाही धंदा करितात. त्यांच्यांत हत्तिकंकण आणि उन्निकंकण असे दोन मुख्य पोटभेद आहेत. हत्तिकंकण म्हणजे कापसाचीं कंकणें विणणारे आणि उन्निकंकण म्हणजे लोंकरीचीं कंकणें विणणारे. ह्या दोन्ही पोटभेदांचा परस्परांशीं अन्नव्यवहार होतो, पण शरीरसंबंध होत नाहीं. ह्या दोहोंशिवाय हंडे कुरुबा किंवा हंडेवझिर म्हणून तिसरा एक भेद आहे. त्यांनीं लिंगायत धर्माचा स्वीकार केलेला असून मांस खाणें टाकलें आहे. त्यांनीं मेंढ्या पाळणें व घोंगड्या विणणें हा धंदाही सोडून दिलेला आहे. ते हत्तिकंकणांच्या मुलींस लिंगायत धर्माची दीक्षा देऊन त्यांच्याशीं लग्न करितात. पण एकदा लग्न केल्यावर त्यांस माहेरीं पाठवीत नाहींत. हत्तिकंकणांत खिल्लारी, सनगर आणि हटकर असे आणखी तीन पोटभेद आहेत. ह्या तिन्ही पोटभेदांचा परस्परांशीं रोटीबेटीव्यवहार होतो. कुरुबांत अनेक बेडग [illegible] बेडगू असलेल्या मुलांमुलींचा [illegible] जातबहिणीशीं, मामेबहिणीशीं, मावसबहिणीशीं व बहिणीच्या मुलीशींही लग्न लावितां येतें. लग्नें लहानपणीं अथवा वयांत आल्यावरही होतात. कारवार जिल्ह्यांत व्यभिचारी स्त्रिया, विधवा आणि ज्यांस नवरे मिळत नाहींत अशा मुली, अस्पृश्य शिवाय करून इतर कोणत्याही जातीच्या पुरुषांशीं वेश्यावृत्तीनें राहूं शकतात. त्यांना कट्टिगरू म्हणजे वेश्या असें म्हणतात. विवाहित स्त्रिया जरी त्यांचा तिरस्कार करितात, तरी त्यांस जातीबाहेर टाकण्यांत येत नाहीं. त्यांच्या मुलांबरोबर शुद्ध कुरुबांच्या मुलींचीं लग्नें होतात. विधवाविवाहास मोकळीक आहे. सोडचिठ्ठी देतां येते. त्यांचा मुख्य देव बिराप्पा. त्याचे पुजारी कुरुबाच असतात. त्यांस वाडेर म्हणतात. ते कुरुबांचे गुरू होत. मृतांस पुरतात. अंत्यविधि लिंगाइतांप्रमाणें चालवितात. मृतांच्या तृप्त्यर्थ दरवर्षीं भाद्रपदांत जातीच्या लोकांस जेवण देतात.

कुरुबा मांस खातात व दारू पितात.

**कुंचवक्कल**—यांना मरेनवा असें दुसरें नांव आहे. ही एक गांवोगांव भटकणारी जात असून म्हशींची पैदास्त करणें हा त्यांचा धंदा आहे. ते मुख्यत्वें-करून धारवाड जिल्ह्यांत आढळतात. ते म्हैसुर संस्थान व मद्रास इलाखा येथून आलेले असावे असें दिसतें. द्रविड जातींत आढळणारे बळी व धारे विधि त्यांच्यांत आहेत, त्यावरून ते मूळचे द्रविड असावे असें दिसतें. एकाच बळीच्या मुलांमुलींचीं लग्नें होत नाहींत. मुलींचीं लग्नें वयांत आल्यानंतरही करण्यास हरकत नाहीं. मात्र तसें झाल्यास तिला हसगे नांवाचें प्रायश्चित घ्यावें लागतें. ह्या प्रायश्चित्तांत मुलीस दोन अथवा चार दिवस एक वेळ उपोषण करावें लागतें. यांच्यांत बहुपत्निकत्वाची चाल नाहीं. विधवांस लग्न करतां येत नाहीं. बायको व्यभिचारी आहे असें सिद्ध झाल्यास तिला सोडचिठ्ठी देतां येते. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रियांस पुन: लग्न करितां येत नाहीं. कुंचवक्क-लांच्या मुख्य देवता बापराया देव व तुप्पद देवी हीं होत. यांशिवाय भूतप्पा, सवडम्मा, बिरू आणि इतर गौण देवतांसही ते भजतात. त्यांचे उपाध्ये ब्राह्मण असतात. भूतप्पा देवाचा पुजारी करेवक्कल जातीचा असतो. त्याला माशागौडा असें म्हणतात...

ज्यांच्या अंगावर पांढरे अथवा काळे ठिपके असतात त्यांशिवाय इतर मृतांस पुरण्यांत येतें. मृतास त्याचा रोजचा पोशाख घालतात, व एक दिवस घरांत बसवून ठेवितात. दुसरे दिवशीं त्याला वाजतगाजत स्मशानांत नेऊन पुरण्यांत येतें. मृतांच्या शांत्यर्थ दर दुसऱ्या अथवा तिसऱ्या वर्षीं जातींतील थोड्या लोकांस जेवण देण्यांत येतें.

कुंचवक्कल मुंबई इलाख्यांतील दक्षिण भागांत, मद्रास इलाख्यांत व म्हैसूर संस्थानांत म्हशी रेडे पैदास करण्याचा व विकण्याचा धंदा करीत दूरवर भटकत असतात.

ते मांस खातात, पण दारू पीत नाहींत.

**कुंभार**—हें नांव संस्कृत कुंभ म्हणजे मातीचा घडा व कार म्हणजे करणारा ह्या शब्दावरून पडलें असून तें ह्या जातीच्या धंद्याचें निदर्शक आहे.

कुंभार सर्व इलाखाभर पसरलेले आहेत. त्यांच्यांत तेवीस पोटजाती आहेत. त्या येणेंप्रमाणें:—

(१) अहिर अथवा लहानचाके, (२) बळदे, (३) भांडू, (४) चगभैसा, (५) गरेटे, (६) गुजर, (७) गोरे मराठा, (८) हातघडे, भोंडे अथवा भोंडकर, (९) हातोडे, (१०) कडू, (११) कानडा, (१२) कर्नाटक, पंचम किंवा लिंगायत, (१३) खंभाती, (१४) कोंकणी (१५) लाड किंवा थोरचाके, (१६) लाडभुजे, (१७) माळवी, (१८) मराठा किंवा घाटी, (१९) परदेशी, (२०) रजपूत, (२१) सोरठिया, (२२) वरिया, (२३) वाटलिया.

वरील पोटजातींचा परस्परांशीं रोटी अथवा बेटीव्यवहार होत नाहीं. मराठा, कोंकणी, कानडा, सोरठिया आणि खंभाती ह्या पोटजाती प्रांतिक स्वरूपाच्या आहेत. परदेशी, रजपूत आणि माळवी हे इलाख्याबाहेरून आलेले आहेत. अहिर हे अहिर नांवाच्या मोठया जातींतून निघालेले आहेत. ते लहान चाकावर काम करितात म्हणून त्यांस लहानचाके म्हणतात. चाकावांचून हातांनीं काम करणारे ते हातघडे. लाड हें नांव, लाड वाणियांप्रमाणें [redacted] जुनें नांव जें [redacted] चाकांवर काम करितात म्हणून त्यांस थोरचाके म्हणतात. लिंगायत धर्माचा स्वीकार केलेले ते लिंगायत. त्यांची मुख्य वस्ती कर्नाटकांत असल्यामुळें त्यांस कर्नाटक म्हणतात. गुजर कुंभार, गुजर वाणिया, गुजर सुतार इत्यादिकांप्रमाणें गुजर जातीचा एक भाग आहेत. वाटलिया म्हणजे बाटलेले. हे ब्राह्मणास कुंभार स्त्रीपासून झालेल्या संततीचे वंशज आहेत असें सांगतात. कडिया म्हणजे गवंड्यांचें काम करणाऱ्या कुंभारांस कडिया कुंभार म्हणतात. इतर पोटजातींच्या उत्पत्तीविषयीं माहिती उपलब्ध नाहीं.

मराठा कुंभारांची वस्ती सर्व दक्षिण महाराष्ट्रांत आहे, कोंकण्यांची कोंकणांत व कारवार जिल्ह्यांत आहे, लिंगाइतांची कर्नाटकांत आहे, अहिर आणि लाड यांची खानदेशांत आहे, कानडांची कारवार जिल्ह्यांत आहे, परदेशांची पुणें, नाशिक, सोलापूर आणि बेळगांव जिल्ह्यांत आहे. गुजर, कडिया, खंभाती,

सोरठिया, वरिया आणि वाटलिया यांची सर्व गुजराथभर आहे, आणि भांडूंची कोल्हापूर संस्थानांत पन्हाळा येथें आहे.

कुंभारांचा मुख्य धंदा विटा, कौलें, मातीचीं भांडीं व मातीचीं चित्रें करणें हा होय. ते खेड्यांतील बलुतेदारांपैकीं असून खेड्यांतील लोकांस मातीचीं भांडीं पुरविण्याबद्दल त्यांस पिकाच्या वेळीं धान्य देण्यांत येतें. गुजराथेंत त्यांस ह्या कामगिरीकरितां जमिनीही तोडून देण्यांत आलेल्या आहेत. कोंकणी आणि कानडा कुंभार एके काळीं उपाध्ये असावे. असें दिसतें. कांहीं स्थानिक देवतांच्या देवळांत अजूनही तेच पुजारी आहेत. ह्याशिवाय अस्पृश्यांखेरीज इतर शूद्रांच्या घरीं तें कुंभारक्रिया नांवाचा प्रेतविधि करितात. हिंदूंमध्यें मुख्य मांत्रिक हेच कुंभार असतात.

मराठा कुंभारांच्या चालीरीती बहुतांशीं मराठ्यांप्रमाणेंच आहेत. त्यांच्यांत देवकें आहेत, पण एकच देवक असलेल्या कुळांत लग्नें होण्यास प्रतिबंध नाहीं. त्यांचीं आडनांवें मराठ्यांच्या आडनांवांसारखींच आहेत. एकच आडनांव असलेल्या कुळांत शरीरसंबंध होत नाहीं. रत्नागिरी जिल्ह्यांतील कोंकणी कुंभारांत एकच गांवांत राहणाऱ्या कुटुंबांत शरीरसंबंध होत नाहीं. खानदेशांतील अहिर कुंभारांत प्रत्येक कुळाचें निरनिराळें देवक असतें. जसें, हिवरकरांचें हिवर, मोऱ्यांचें मोर, इ०

गुजराथी कुंभारांच्या चालीरीती गुजराथी कणब्यांप्रमाणेंच असतात. ते शाकाहारी असून दारू पीत नाहींत.

**कुळवाडी**—पहा–कुणबी.

**कृष्णवंशी**—भाटिया जातीचें एक नांव.

**केळासी**—न्हावी जातीचें दुसरें नांव.

**कैकाडी**—मुख्यत्वेंकरून दक्षिण महाराष्ट्रांत आढळतात. आपण मूळचे तेलंगणांतले असें ते म्हणतात. त्यांची भाषा तेलगू आणि कानडी यांचें मिश्रण आहे, ह्यावरून त्यांचें म्हणणें खरें असावें असें दिसतें. ते गांवोगांव भटकणारे असून पूर्वीं अट्टल चोर म्हणून त्यांची प्रसिद्धि होती; पण हल्लीं घरदार करून स्थायिक राहाण्याकडे त्यांची प्रवृत्ति बरीच झालेली आहे. त्यांच्यांत नऊ पोट

भेद आहेत. ते असेः-( १ ) बोरीवाले, ( २ ) धुंतले किंवा चोर, ( ३ ) कामाठी, कुसुंबतनवाले किंवा लाल बाजारवाले ( ४ ) काइजी, ( ५ ) लमाण, ( ६ ) माकडवाले, कुंचेवाले किंवा खुळखुळेवाले, ( ७ ) उर कैकाडी ( उर = गांव ), ( ८ ) वायबसे, ( ९ ) भामटे किंवा तुलिये. यांपैकीं शेवटच्यांस पक्के कैकाडी समजण्यांत येत नाहीं.

बोरीवाले आणि वायबसे हे घरदार करून स्थायिक झालेले आहेत. ते इतर पोटभेदांहून आपणास श्रेष्ठ समजतात. कामाठी टोपल्या करितात व त्यांच्या बायका वेश्यावृत्तीनें राहतात. माकडवाले माकडांचे खेळ दाखवीत गांवोगांव भटकत असतात. काइजी जादूचे खेळ करितात. लमाण बैलांचीं खोगिरें करतात. उर कैकाडी वाजंत्री असून शिवाय टोपल्याही करतात. भामटे उचलेगिरीचा धंदा करितात.

लग्नें लहानपणीं अथवा वयांत आल्यानंतरही करितात. त्यांच्यांत वैवाहिक नीतीकडे फारसें लक्ष देण्यांत येत नाहीं. एका पोटभेदांतील स्त्रिया तर वेश्यावृत्तीनेंही राहातात हें वर सांगितलेंच आहे. विधवाविवाहास मोकळीक आहे. सोडचिठ्ठी देतां येते.

कैकाडी सर्व ब्राह्मण देवतांस भजतात व मुख्य सण पाळतात. ते घरांत बहिरोबा, भवानी, मरीआई, फिरंगाई, तुकाई आणि यमाई यांच्या प्रतिमा व पूर्वजांचे टांक ठेवून त्यांची पूजा करितात. त्यांचीं कुलदेवतें मारुती, सोलापुराजवळील सोनारीचा बहिरोबा, जेजुरीचा खंडोबा आणि तुळजापुरची भवानी हीं होत. त्यांचे गुरू गोसावी असतात. त्यांचे उपाध्ये देशस्थ ब्राह्मण असतात. पण ब्राह्मणांकडून धर्मविधि चालविण्याची चाल अजून सर्वत्र रूढ झालेली नाहीं.

मृतांस जाळण्यांत अथवा पुरण्यांत येतें. मृत्यूच्या तिसऱ्या, पांचव्या,अथवा तेराव्या दिवशीं बकरा मारून जातींतील लोकांस जेवण देण्यांत येतें. मृताचा टांक करून त्याची घरांतील देवांत स्थापना करतात व दसऱ्यास व दिवाळीस त्याची पूजा करितात. ते श्राद्ध अथवा पक्ष करीत नाहींत.

ते मांस खातात व दारू पितात. त्यांचा दर्जा अस्पृश्यांवर व कुणब्यांखाली समजण्यांत येतो.

**कोंकण मराठा**—गाबीत ह्या जातीचें दुसरें नांव.

**कोंकण वालेगार**—शेरोगार ह्या जातीचें दुसरें नांव.

**कोंकणा**—मुख्यत्वेंकरून सुरत जिल्ह्याच्या दक्षिण भागांत व बांसडा व भरतपूर संस्थानांत आढळतात. ते ठाणें जिल्ह्यांतील बारली लोकांप्रमाणें दिसतात. त्यांच्या नांवावरून ते मूळ कोंकणांतून आले असावे असें दिसतें. त्यांची भाषा मराठी आणि गुजराथी यांचें मिश्रण आहे. यावरून या म्हणण्यास पुष्टि येते. दुर्गादेवीच्या भयंकर दुष्काळाच्या वेळीं ते उत्तरेस आले असें सांगतात.

मुलामुलींचीं लग्नें वयांत आल्यावर होतात. विधवाविवाहास मोकळीक आहे. विवाहित स्त्रीस आपल्या नवऱ्यास सोडून दुसऱ्या पुरुषाशीं लग्न करावयाचें असल्यास, या भावी नवऱ्यास, पहिल्या नवऱ्यानें तिच्याकरितां जी रक्कम तिच्या आईबापांस दिली असेल ती त्यास द्यावी लागते. यांच्यामध्यें खंडालिओची चाल आहे. मुलाजवळ मुलीच्या बापास द्यावयास पैसा नसला, म्हणजे लग्न झाल्यानंतर ठराविक मुदतीपर्यंत तो त्याच्या येथ नोकरी करण्याचा करार करितो, त्यास खंडालिओ म्हणतात.

कोंकणा ब्रम आणि वाघदेव यांस भजतात. ते ब्राह्मणास मानीत नाहींत.

ते मजुरी आणि शेती करून उदरनिर्वाह करितात. त्यांच्याजवळ गुरेंढोरें अगदींच कमी असल्यामुळें ते बहुतेक काम हातांनींच करितात. कांहीं बैलांच्या अभावीं, स्वतांच नांगर ओढतात. त्यांस हातोडिया म्हणतात.

**कोट वक्कल**—ह्यांस कोट्टे वक्कल असेंही म्हणतात. कोंवळ्या सुपाऱ्यांचे घोंस कोट्ट्यांनीं ( पिशव्यांनीं ) झांकण्याच्या कामावर त्यांस लावितात. त्यावरून त्यांस कोट्टे वक्कल हें नांव पडलेलें आहे. ह्यांच्या रीतिभाती हलवक्की वक्कलांप्रमाणेंच आहेत. यांची वस्ती मुख्यत्वेंकरून कानडा जिल्ह्यांतील सिद्धापूर आणि सिर्सी तालुक्यांत आहे.

**कोटेगर**—ह्यांना मेत्री असेंही नांव आहे. ते फक्त कानडा जिल्ह्यांत आढळतात. त्यांच्यांत पुष्कळ कुळें आहेत. त्यांस बेडगू असें म्हणतात. एकच बेडगू असलेल्या स्त्रीपुरुषांचीं लग्नें होत नाहींत. लग्नें बहुधा मोठेपणींच होतात. विधवाविवाह व सोडचिठ्ठी यांस मोकळीक आहे.

कोटेगर मुख्यत्वेंकरून मैला, गुल्यम्मा, येल्लम्मा आणि मरिअम्मा यांस भजतात. ते ब्राह्मणास मान देतात, परंतु त्यांच्याकडून धर्मविधि चालवीत नाहींत. त्यांचे सर्व धर्मविधि जातींतील जाणते चालवितात. मृतास बहुधा पुरण्यांत येतें. जवळ पैसा असल्यास कोणी कोणी जाळतातही.

अनाथांचीं प्रेतें पुरणें, रस्ते झाडणें, मशाली धरणें आणि वाटाड्याचें काम करणें या कामावर कोटेगरांची योजना करितात. त्यांच्यांतील विवाहित आणि अविवाहित स्त्रियांसही वेश्यावृत्तीनें राहण्यास मोकळीक आहे.

कोटेगर मेलेल्या जनावरांचेंही मांस खातात. ते दारू पितात.

**कोट्टे वक्कल**—कोट वक्कल ह्या जातीचें दुसरें नांव.

**कोमारपैक**—फक्त कानडा जिल्ह्यांतच आढळतात. हे लोक पूर्वीं आपणास [redacted] चाळीस पन्नास वर्षांपासून ते आपणास खेत्री कोमारपंथ असें म्हणवूं लागले आहेत. ते आतां आपणास क्षत्रिय म्हणवितात. कोमारपंथ म्हणजे कोमाराचे अनुयायी. हें नांव बहुधा त्यांनीं कलगडगीचा लिंगायत गुरु कोमारस्वामी यावरून घेतलें असावें. खेत्री हा शब्द संस्कृत क्षत्रिय शब्दाचा अपभ्रंश आहे. पैक म्हणजे योद्धा. ह्या शब्दावरून ते पूर्वीं शिपाईगिरी करीत असावे असें दिसतें. आपण निजामाच्या राज्यांतील कलबुर्ग्याहून कानडा जिल्ह्यांत आलों असें त्यांचें म्हणणें आहे. सोंडा येथील राजांच्या लष्करांत ते पूर्वीं नोकरीस असावे असें दिसतें. इ.स.१७६३ मध्यें हैदरअल्लीनें कानडा जिल्हा जिंकल्यानंतर त्यांनीं असा दरोडेखोरपणा चालविला कीं, त्यांचें नांव ऐकतांच लोक भीतीनें कांपत असत. इ. स. १७९९ त कानडा जिल्हा ब्रिटिश अमलाखालीं आला. तेव्हांपासून ते शांततेनें राहूं लागले.

कोमारपैकांत हिंदु आणि लिंगायत असे दोन पोटभेद आहेत. हिंदु घांटाखालील तालुक्यांत राहतात. यांचाच भरणा जातींत विशेष आहे. लिंगायत घांटावरील तालुक्यांत राहतात. हिंदु कोमारपैकांत स्थानिक स्वरूपाचीं अठरा कुळें आहेत. मुलींचीं लग्नें आठ ते बारा वर्षांच्या दरम्यान व मुलांचीं लग्नें चौदा ते वीस वर्षांच्या दरम्यान होतात. विधवाविवाहास मोकळीक आहे. तिसरें लग्नही करतां येतें. पण स्त्रीच्या तिसऱ्या लग्नाच्या वेळीं पहिल्यानें तिचें लग्न कोंबड्याशीं लावतात, व पुरुषाच्या तिसऱ्या लग्नाच्या वेळीं त्याचें लग्न प्रथम केळीशीं लावतात. सोडचिठ्ठी देतां येत नाहीं.

लिंगायत कोमारपैक लिंगायत धर्म पाळतात. हिंदु कोमारपैक मुख्यत्वेंकरून बसव, व्यंकटरमण, काळभैरव, म्हालपुरा म्हणजे कुळांतील पूर्वज व म्हास्ती म्हणजे कुळांतील सती यांस भजतात. ते जंगमांस मान देतात. त्यांचे धर्मविधि कर्नाटक, हविक अथवा गौड सारस्वत ब्राह्मण चालवितात. सुमारें एक शतकापूर्वीं मृतांस लिंगाइतांप्रमाणें पुरीत असत. पण आतां त्यांस जाळतात.

आपला मूळ धंदा शिपाईगिरीचा होता असें कोमारपैक सांगतात. हल्लीं ते मुख्यत्वेंकरून शेतकी करितात व गाड्या हांकतात [illegible]तात.

ते मांस खातात. पूर्वीं ते दारू पीत नसत, पण अलीकडे थोडथोडी पिऊं लागले आहेत.

**कोरमा**—कोरव ह्या जातीचें दुसरें नांव.

**कोरव**—ह्या जातीस कोर्गर, कोरार, कोर्मार (कोरमा) आणि कोर्चर अशीं दुसरीं नांवें आहेत. हे मुख्यत्वेंकरून बेळगांव, धारवाड आणि विजापूर जिल्ह्यांत आढळतात. ते म्हैसुर संस्थान व मद्रास इलाख्यांतील कुर्दूल, सालेम, दक्षिण अर्काट आणि कोइमतूर ह्या तामिल जिल्ह्यांतून आलेले आहेत. ते हिंदुस्थानांतील मूळच्या रहिवाशांपैकीं असून अजूनपर्यंत पूर्णपणें हिंदु झालेले दिसत नाहींत. त्यांचे धर्मविधि ब्राह्मण चालवीत नाहींत. त्यांच्या बायकांस रजस्वलावस्थेंत अस्पृश्य मानण्यांत येत नाहीं. मृतांस पुरण्यात येतें, व हिंदु सणांपैकीं फारच थोडे सण ते पाळतात. ते तामिल, तेलगू आणि कानडी

७१०८८

मिश्रित अशी भाषा बोलतात. त्यांच्यांत नऊ पोटभेद आहेत; ते असे. (१) सनदी, (२) कुंची (३) अडिवी किंवा काल कैकाडी, (४) पात्रद, (५) मोदी, (६) सुली, (७) घंटीचोर, (८) बीड किंवा बीर, आणि (९) डब्बे किंवा उरू. ह्यांपैकीं सनदी हे स्थायिक झालेले असून ते इतरांपेक्षां श्रेष्ठ समजले जातात. ते इतरांशीं रोटीबेटीव्यवहार करीत नाहींत. बीड आणि डब्बे यांचा रोटीव्यवहार होतो. डब्बे बीडांच्या मुली करितात, पण आपल्या मुली त्यांस देत नाहींत. कोरवांत चार कुळें आहेत. एकाच कुळांतील स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. मुलींचीं लग्नें वयांत येण्यापूर्वीं अथवा नंतरही करितात. विधवाविवाहास कांहीं अटींवर मोकळीक आहे. सोडचिठ्ठी देतां येत नाहीं असें म्हणतात. त्यांचीं मुख्य दैवतें मारुती, यल्लमा, मारयम्मा आणि हुलिगेवा हीं होत. त्यांना उपाध्ये नाहींत. मृतांस पुरण्यांत येतें, क्वचित् जाळण्यांतही येतें.

कोरव लोक पारध करणें, भविष्य सांगणें, गुरांची पैदास करणें, वाजंत्रें वाजविणें, टोपल्या विणणें इत्यादि धंदे करितात. ते चोऱ्याही करितात. ते वरील धंदे करीत गांवोगांव भटकत असतात.

ते मांस खातात व दारू पितात. त्यांचा समाजांतील दर्जा जरी अत्यंत हीन आहे तरी त्यांस अस्पृश्य मानलें जात नाहीं.

**कोरार**—कोरव ह्या जातीचें दुसरें नांव.

**कोर्गर**—कोरव ह्या जातीचें दुसरें नांव.

**कोर्चर**–कोरव ह्या जातीचें दुसरें नांव.

**कोर्मार**–कोरव ह्या जातीचें दुसरें नांव.

**कोलघा**—ह्या जातीचे लोक सुरत जिल्ह्यांतील आग्नेयेकडील संस्थानांत आढळतात. त्यांची स्थिति अगदीं हीन असून ते अजून हिंदुधर्माच्या कक्षेंत फारसे आलेले दिसत नाहींत. ते ब्राह्मणांस मानीत नाहींत व त्यांच्यांत त्यांच्या जातीचेही उपाध्ये नाहींत. गौण हिंदु देवतांपैकीं थोड्याशांसच ते भजतात. त्यांचे धर्मविधीही अगदीं प्राथमिक स्वरूपाचे आहेत. ते मुख्यत्वेंकरून हनुमान, भिलदेव व काकाबळिया यांस भजतात. ते मृतांस जाळतात. मृत्यूच्या तिसऱ्या

दिवशीं रक्षा गोळा करितात व तीवर ताडी शिंपडतात. ज्यांना पैशाची सवड असेल तेच मृताप्रीत्यर्थ जातीच्या लोकांस जेवण देतात.

ते मोलमजुरी करून व लांकडें तोडून उपजीविका करितात. त्यांची स्थिति इतकी वाईट आहे कीं, त्यांस पुष्कळ वेळां झाडाचीं मुळें खाऊन राहावें लागतें. कधीं कधीं तर दोनदोन, तीनतीन दिवस सपशेल उपवास घडतो.

**कोल्हाटी**—हे दक्षिण महाराष्ट्र, कर्नाटक, कुलाबा व ठाणें जिल्ह्यांत आढळतात. कर्नाटकांत त्यांस डोंबारी असें म्हणतात. कित्येक ठिकाणीं ते खेळकरी ह्या नांवानेंही ओळखले जातात.

ही जात अनेक जातींच्या मिश्रणापासून बनलेली आहे. अजूनही ते मराठे, सोनार, शिंपी, लोहार, सुतार इत्यादि जातींच्या लोकांस आपल्या जातींत घेतात. त्यांचा योगक्षेम बहुतांशीं त्यांच्या स्त्रियांच्या वेश्यावृत्तीवर चालतो.

कोल्हाट्यांत आठ पोटभेद आहेत, ते असेः—(१) मराठा, (२) गुजराथी, (३) डुकरे किंवा पोटरे, (४) पाल किंवा काने, (५) हरका, (६) वले किंवा वलियार. ह्यांस होलिया किंवा महार डोंबार असेंही म्हणतात. (७) गोपाळगणी, (८) अरे. ह्यांचा परस्परांशीं रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. डुकरे कोल्हाटी गाईचें व डुकराचें मांस खातात, म्हणून त्यांस सर्वांत हीन समजण्यांत येतें.

नाट ऊर्फ कोला नांवाच्या पुरुषापासून आपली उत्पत्ति झाली आहे अशी दंतकथा मराठा कोल्हाट्यांत प्रचलित आहे. ह्या नाटाचा बाप तेली जातीचा असून आई क्षत्रिय होती असें सांगतात. गुजराथी कोल्हाटी आपण रजपूतांचे वंशज आहों असें सांगतात. त्यांचीं नांवें रजपुतांसारखींच असतात.

मुलामुलींचीं लग्नें बहुधा वयांत आल्यावर होतात. मुलीचें लग्न केलेंच पाहिजे असें नाहीं. मुलगी वयांत आल्यावर 'तूं वेश्यावृत्ति स्वीकारणार कीं लग्न करणार' असें तिला विचारतात. जर वडिलांच्या अनुमतीनें तिनें लग्न करावयाचें ठरविलें तर तिची चांगली काळजी घेतात. जर तिनें वेश्यावृत्ति स्वीकारण्याचें ठरविलें, तर जातिसभेची संमति घ्यावी लागते. ती मिळाली म्हणजे जातीस मेजवानी देतात व ती वेश्या झाल्याचें जाहिर करितात.

कित्येक ठिकाणीं अविवाहित स्त्रियांच्या मुलांस जातिबाह्य समजतात. इतर ठिकाणीं त्यांना जातीच्या अनौरस संततीशीं लग्नें करण्यास मोकळीक असते.

विधवाविवाहास प्रतिबंध नाहीं. सोडचिठ्ठी देतां येत नाहीं. नवराबायकोचें पटत नसल्यास बायकोनें त्याला कांहीं ठराविक रकम दिली म्हणजे तो तिच्यावरील आपला हक्क सोडून देतो.

कोल्हाटी महादेव, मारुती, खंडोबा, मरीआई, बहिरोबा, जनाई, जोखाई, म्हसोबा, इत्यादि देवतांस भजतात. ते बहुतेक सर्व सण पाळतात. ते जेजुरी, आळंदी, शिंगणापूर, पंढरपूर, कोल्हापूर, डाकूर वगैरे ठिकाणीं यात्रेस जातात. मृतांस पुरण्यांत येतें.

कोल्हाट्यांचा मुख्य धंदा भोरपें व नाडे भोरपें करणें हा होय. ते भिक्षाही मागतात. त्यांच्यांतील पुष्कळ स्त्रिया वेश्यावृत्तीनें राहतात. वरिष्ठ जातींतील मुलींस फुसलावून नेऊन त्या त्यांस कुमार्गास लावीत असल्यामुळें पोलिसांची त्यांच्यावर नजर असते. कोल्हाटी हांतऱ्या, फण्या व बाहुल्या करूनही विकतात. त्यांच्या बायका गोंदण्यांत मोठ्या पटाईत असतात.

ते मांस खातात व दारू पितात.

**कोळी**—सर्व दक्षिण महाराष्ट्र, गुजराथ, ठाणें व कुलाबा जिल्हा या ठिकाणीं आढळतात. कोळी ह्या नांवाखालीं मोडणाऱ्या सर्व जातींचें बरोबर वर्णन करणें फार कठिण आहे. ह्यांतील बहुतेक जाती निरनिराळ्या जिल्ह्यांत निरनिराळ्या नांवांनीं ओळखल्या जातात व कित्येकांस तर तालुक्या तालुक्यांतूनही निरनिराळें नांव आढळतें. म्हणून पुढील वर्णन केवळ ह्या जातीच्या सामान्य स्वरूपाचें निदर्शक आहे असें समजावें.

कोळी ह्या शब्दाची व्युत्पत्ति अनेक प्रकारें करितात. त्यांतच तो शब्द कुल ह्या शब्दापासून निघाला आहे ही एक होय. तें कसेंही असलें तरी अनेक जातींच्या मिश्रणापासून झालेले मच्छीमार व शेतकरी ह्यांच्या समुदायास हा शब्द लावण्यांत येतो. त्यांस कुणब्यांचा, अथवा ज्या मूळ समाजांतून ते उत्पन्न झाले आहेत त्यांतूनच ज्या दुसऱ्या उद्योगप्रधान जाती निर्माण झाल्य आहेत, त्यांचा दर्जा प्राप्त झालेला नाहीं.

कोळ्यांत गुजराथी कोळी आणि दक्षिण महाराष्ट्रांतील कोळी असे प्रांतिक स्वरूपाचे दोन मुख्य भेद आहेत. गुजराथेंतील कोळ्यांत रजपुतांचें रक्त बरेंच मिश्रित झालेलें आहे. ह्यांशिवाय गुजराथेंत दर्यावर्दीपणा करणारे कोळीही आहेत. त्यांतील कांहीं आपणास माछी अथवा खारवा असेंही म्हणवितात. महाराष्ट्रांतील कोळ्यांत मल्हार किंवा पाणभरी, राज किंवा महादेव, सोन कोळी आणि ढोर कोळी असे मुख्य भेद आहेत. त्यांतील शेवटच्यांस, ते गोमांस व मेलेल्या जनावरांचें मांस खात असल्यामुळें, सर्वांत हीन दर्जाचे समजण्यांत येतें. जव्हार संस्थानचा राजा महादेव कोळी आहे, यावरून अथवा ते आपण रजपूत आहों असें प्रतिपादित असल्यामुळें,महादेव कोळ्यांस राज हें नांव पडलें असावें. ही एक गोष्ट शिवायकरून मल्हार आणि महादेव कोळ्यांचें मराठ्यांशीं निकट साम्य आहे, आणि कित्येक जिल्ह्यांत तर मराठ्यांपासून त्यांस ओळखणेंही कठिण जातें.सोन कोळी मुंबईनजीकच्या समुद्र किनाऱ्यावर आढळतात.

गुजराथेंतील कोळ्यांचे पोटभेद निरनिराळ्या भागांत निरनिराळ्या नांवांनीं ओळखले जात असल्यामुळें त्यांचें वर्गीकरण करणें फार कठिण आहे. समाजांत ज्यांचा दर्जा सर्वांत मोठा आहे. ते रजपुतांचें अनुकरण करून विधवाविवाहास प्रतिबंध करितात. उत्तरेकडील खांट आणि बारिया कोळी आणि पंचमहाल आणि रेवाकांठांतील पटेलिया किंवा पटेलिया कोळीही या बाबतींत रजपुतांचेंच अनुकरण करितात. हे उच्च दर्जाचे कोळी आपल्या मुली रजपुतांस देतात. रजपूत नवरे नच मिळाले तर मोलेसलामांस म्हणजे बाटून मुसलमान झालेल्या रजपुतांस देतात. पण पगी, कोतवाल किंवा पाटणवाडिया यांसारख्या हलक्या कोळ्यांस देत नाहींत. धाराला आणि तळबदा यांसारखीं सर्वसाधारण नांवें कोळी आपणांस लावितात. ह्या नांवांस कांहीं ठिकाणीं विशिष्ट अर्थ असतो, तर कांहीं ठिकाणीं त्यांना मुळींच अर्थ नसून, कांहीं ठिकाणीं तर अगदींच भिन्न अर्थ असतो. जिल्ह्यांत कोळ्यांची वस्ती इतर जिल्ह्यांपेक्षां जास्त आहे. येथील खऱ्या कोळ्यांस पाटणवाडिया असें म्हणतात, व इतर सर्व कोळ्यांस धाराला असें म्हणतात. धारालांत खांट, बारिया आणि तळबदा कोळी यांचा अंतर्भाव होतो. तळबदा कोळ्यांत वाघेला,

पगी, कोतवाल आणि बारिया असे आणखी पोटभेद आहेत. ह्यावरून बारिया कोळी हा तळबदा बारियाहून भिन्न असल्याचें स्पष्ट होतें. तसेंच वाघेला अथवा परमार अशासारखें एखाद्या रजपूत शाखेचें नांवही कोळ्यांचा एखादा स्वतंत्र पोटभेद दर्शवितें असें म्हणतां येत नाहीं. अहमदाबाद जिल्ह्यांत धाराला हें नांव मुळींच प्रचारांत नाहीं. तेथील वरिष्ठ दर्जाच्या कोळ्यांस पटेलिया किंवा तळबदा म्हणतात, व खालच्या दर्जाच्या कोळ्यांस थाकरडा किंवा पगी म्हणतात. ह्या थाकरडा अथवा पगींचीं आणि खेडा जिल्ह्यांतील धारालांचीं परस्परांत लग्नें होतात. सुरत आणि भडोच जिल्ह्यांत वरच्या दर्जाच्या कोळ्यांस तळबदा म्हणतात आणि विरमगांव तालुक्यांतील चुंवाळिया कोळ्यांतील वरच्या दर्जाचीं कुटुंबें आपणांस थाकरडा ही पदवी लावितात, ह्यामुळें तर ह्या गोंधळांत जास्तच भर पडली आहे. कच्छ, पालनपूर आणि महीकांठा येथील कोळी थाकरडा ह्याच नांवानें ओळखले जातात. सामाजिक चालीरीति व धर्मविधि यांवरूनही हा कोळ्यांच्या पोटजातींचा प्रश्न सुटत नाहीं. गुजराथेंतील ज्यां कोळ्यांत विधवाविवाह रूढ आहे त्यांत मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न करण्यास मोकळीक आहे. इतर बाबतींत सर्व कोळी आजूबाजूच्या हिंदूंच्या चालीरीतीचें वेडेंवांकडें अनुकरण करितात. अशी स्थिति असल्यामुळें निरनिराळ्या ठिकाणांहून कोळ्यांच्या पोटभेदांविषयीं जशी माहिती मिळाली तशी ती पुढें दिली आहे, व जेथें जेथें ह्या पोटभेदांचा परस्परसंबंध दाखवितां येण्यासारखा आहे तेथें तेथें तो दाखविला आहे.

**पालनपूर संस्थान**—( १ ) थाकरडा, ( २ ) कोळी.

**महीकांठा**—( १ ) तळबदा, ( २ ) चुंवाळिया, ( ३ ) पाटणवाडिया, ( ४ ) चरोतरिया.

**अहमदाबाद**—( १ ) तळबदा किंवा पटेलिया, ( २ ) थाकरडा किंवा पगी, ( ३ ) चुंवाळिया. थाकरडा आणि चुंवाळिया यांचा परस्पर अन्नव्यवहार होतो. थाकरडांचा खेडा जिल्ह्यांतील हलक्या दर्जाच्या धारालांबरोबर शरीरसंबंध होतो. चुंवाळियांत पुष्कळ तालुकदार आहेत. ते आपणास थाकरडा ही पदवी लावतात.

**खेडा**—( १ ) खांट, ( २ ) बारिया, ( ३ ) तळबदा, ( ४ ) पाटण-वाडिया किंवा कोळी. खांट काठेवाडांतून आलेले असून त्यांचा दर्जा मोठा आहे. त्यांच्यांत दाभी आणि मकवाणा असे दोन पोटभेद आहेत असें सांगतात. बारियासुद्धां उच्च दर्जाचे कोळी आहेत. तळबदांत वाघेला, पगी, कोतवाल आणि बारिया असे चार पोटभेद आहेत. पाटणवाडियांची संख्या फार मोठी आहे. शौर्य आणि दरोडेखोरी याबद्दल त्यांची प्रसिद्धि आहे. ते गोमांस खात असल्यामुळें धाराला त्यांच्याशीं संबंध ठेवीत नाहींत. खेडा जिल्ह्यांत कोळी ह्या नांवानें फक्त पाटणवाडियांचाच निर्देश होत असल्यामुळें धारालांस आपणास कोळी म्हटल्याचें मुळींच खपत नाहीं.

**पंचमहाल**—( १ ) खांट, ( २ ) बारिया, ( ३ ) पटेलिया. हे तीनही उच्च दर्जाचे कोळी आहेत. ह्यांशिवाय येथें धाराला किंवा तळबदाही सांपडतात. ह्यांचा दर्जा खेडा जिल्ह्यांतील धारालांप्रमाणेंच आहे.

**भडोच आणि सुरत**—येथें तळबदांचा भरणा विशेष आहे. दक्षिणेकडील सर्वांत श्रेष्ठ दर्जाच्या कोळ्यांस मांधाता सरोरोरारिया किंवा मान्सोरोरारिया म्हणतात. बारिया कोळीही आढळतात. त्यांचा दर्जा तळबदांच्या बरोबरीचा मानला जातो. त्यांशिवाय सुरतेंत धाराला आढळतात व भडोचमध्यें पाटणवाडिया आढळतात. भडोचमध्यें जहांगडिया आणि काकापुरी असे आणखी दोन पोटभेद असून त्यांस तळबदांहून कमी प्रतीचे समजण्यांत येतें.

कोळ्यांच्या हल्लींच्या स्थितीवरून पाहतां ते अनेक जातींच्या मिश्रणापासून बनलेले आहेत हें स्पष्ट दिसतें. गुजराथेंतील कांहीं कोळ्यांत रजपूत आणि भिल्ल यांच्याशीं त्यांचा झालेला संबंध अगदीं स्पष्टपणें नजरेस येतो, आणि कित्येक ठिकाणीं तर, रजपूत आणि कोळी किंवा भिल्ल आणि कोळी यांच्यांत भेद कोठें आहे तें मुळींच लक्षांत येत नाहीं.

**खत्री**—ह्यांची वस्ती सर्व इलाखाभर आहे. ते आपणास क्षत्री किंवा क्षत्रिय म्हणवितात व आपण क्षत्रिय आहोंत असें सांगतात. ते शरीरानें उंच व गौरवर्ण असतात व मौंजीबंधन करून जानवीं घालतात. ब्रह्मक्षत्र्यांप्रमाणें त्यांच्या मुख्य देवता देवीच आहेत. इलाख्याच्या दक्षिण भागांतही त्यांच्या

भाषेमध्यें बरेच हिंदुस्थानी शब्द आढळतात. या गोष्टींवरून ते मूळचे पंजाबांतील क्षत्री नांवाच्या मोठया जातींतीलच असावे असें दिसतें. परंतु त्यांच्यांत विधवाविवाह रूढ आहे आणि त्यांचे धर्मविधि महाराष्ट्रांत कुणब्यांप्रमाणें आहेत, कर्नाटकांत स्मार्त देशस्थ ब्राह्मणांप्रमाणें आहेत व गुजराथेंत वाणियांप्रमाणें आहेत, या गोष्टीवरून स्थानिक जातींची त्यांच्यांत भेंसळ झाली असावी असें दिसतें. त्यांच्या उत्पत्तीविषयीं अनेक ठिकाणीं अनेक दंतकथा प्रचलित आहेत. त्या सर्वांचा मथितार्थ ते मूळ क्षत्रिय होते असाच आहे.

खत्री लोकांचा पिढीजात धंदा कापसाचीं व रेशमाचीं वस्त्रें विणणें हा होय. ते लुगडीं, साड्या, धोतरें, उपरणीं व खण विणतात. गिरण्यांतील कपड्याचा बाजारांत प्रवेश झाल्यापासून त्यांच्या धंद्यास बराच धोका बसला आहे.

खत्र्यांतील पोटजातींसंबंधाचा प्रश्न बराच गुंतागुंतीचा आहे. तरी स्थूल मानानें त्यांच्यांत पुढील पोटभेद आहेत असें म्हणतां येईलः-( १ ) ब्रह्मक्षत्री, ( २ ) गुजराथी ( ३ ) इस्तारी, ( ४ ) कपूर खत्री, ( ५ ) कर्नाटकी, ( ६ ) कायत, ( ७ ) मराठा, ( ८ ) सहस्रार्जुन, ( ९ ) सुरती, ( १० ) सोमवंशी, ( ११ ) सूर्यवंशी. ह्या पोटभागांत रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. त्यांपैकीं मराठा, गुजराथी, सुरती आणि कर्नाटकी हे भेद प्रांतिक स्वरूपाचे आहेत. सोमवंशी आणि सूर्यवंशी अनुक्रमें आपली उत्पत्ति चंद्रापासून आणि सूर्यापासून झाली आहे असें सांगतात. सहस्रार्जुन, त्या नांवाच्या पौराणिक योद्ध्यापासून आपली उत्पत्ति झाली आहे असें म्हणतात. ब्रह्मक्षत्री हे ब्रह्मक्षत्री जातींतून निघालेले असावे. ते आपणास सर्वांत श्रेष्ठ मानितात.

मराठा खत्र्यांत गोत्रें व कुळें दोन्ही आढळतात. कांहीं ठिकाणीं सगोत्री यांचा विवाह होत नाहीं, कांहीं ठिकाणीं कूळ एक असलें म्हणजे शरीरसंबंध होत नाहीं, व कांहीं ठिकाणीं तर शरीरसंबंध होण्यास गोत्र व कूळ हीं दोन्ही भिन्न असावीं लागतात. विधवाविवाहास मोकळीक आहे. सोडचिठ्ठी देतां येते. खानदेशांत त्यांचे उपाध्ये औदिच ब्राह्मण असतात. अहमदनगर जिल्ह्यांत त्यांचे उपाध्ये त्यांच्याच जातीचे असतात. त्यांस खत्रीभट असें म्हणतात. कांहीं ठिकाणीं अंत्यविधि जातींतील जाणते चालवितात. ते उपनयनविधि

करितात. ह्या इतक्या बाबी शिवाय करून त्यांचे आचारविचार मराठा कुणब्यांप्रमाणेंच असतात. ते मांस खातात व दारू पितात.

गुजराथी खत्री वैष्णव आहेत. तरी पण त्यांच्यांतील पुष्कळ लोक देवीस, विशेषत: सिंधमधील हिंगलाज मातेस भजतात. ते शाकाहारी आहेत. तथापि दक्षिण गुजराथेंतील पुष्कळ खत्री मांस खातात व दारू पितात.

कर्नाटकी खत्र्यांच्या कुलदेवता गणपति, महादेव, तुळजाभवानी आणि यल्लम्मा ह्या आहेत. शंकराचार्यांस ते धर्मगुरु मानितात. ते मांस खातात व दारू पितात.

**खराडी**—कातारी जातीचें दुसरें नांव.

**खरादी**—ह्यांस संघाडिया असें दुसरें नांव आहे. ते मुख्यत्वेंकरून काठेवाडांत आढळतात. ते आपली उत्पत्ति काश्यप ऋषीपासून झाली आहे असें सांगतात. ते अकबराचा प्रधान बिरबल ह्यानें आपल्या जातींत विधवाविवाह रूढ केला असें सांगतात. ते मूळचे खत्री असावे असें दिसतें. त्यांच्यांत भारद्वाज, कौंडिण्य इत्यादि गोत्रें आहेत. पण त्यांचा लग्नव्यवहाराशीं कांहीं संबंध नाहीं. त्यांच्यापैकीं कांहीं जैन आहेत. ते लांकडावर कांतीव काम करण्याचा धंदा करितात.

**खवास**—हे गुजराथ, कच्छ व काठेवाडांतील बहुतेक ठिकाणीं रजपूत संस्थानिक व गिराशिया यांच्या पदरीं असलेले आढळतात. रेवाकांठांत त्यांस हजुरी असें म्हणतात, पालनपुरांत वजीर म्हणतात व इतर ठिकाणीं गोला किंवा लुंडा म्हणजे गुलाम म्हणतात. ही जात रजपूत, कोळी, ढाणका इत्यादि जाती व मुसलमान ह्यांच्या मिश्रणापासून बनलेली आहे. पूर्वीं ते केवळ गुलाम होते. त्यांना एका कुटुंबांतून दुसऱ्या कुटुंबांत पाठविण्यांत किंवा विकण्यांतही येत असे. त्यांच्या स्त्रिया मोठमोठ्या रजपूत स्त्रियांच्या दासी असल्यामुळें पुरुषांपेक्षां त्यांच्यावरच असे प्रसंग फार येत. अजूनही खवासण किंवा गोली यांच्यावर त्यांच्या धन्याचा एकप्रकारें हक्क असतोच. राजकन्येचें लग्न झालें म्हणजे तिच्याबरोबर त्यांस पाठवितां येतें. एखाद्या खवासास नोकरींतून काढून टाकलें तरी त्यास आपल्या बायकोस आपल्याबरोबर नेतां

येत नाहीं. तिला आणि तिच्या मुलांना मालकाच्या इतर नोकरांतच राहावें लागतें. इतकेंच नव्हे, तर मालकास तिला दुसऱ्या खवासासही देतां येतें. त्याच्याशीं मग ती बायकोच्या नात्यानें राहाते. अशी स्थिति असल्यामुळें, खवासण अथवा गोली यांचें पाऊल वारंवार वांकडें पडल्यास त्यांत नवल नाहीं, व ह्याच कारणामुळें त्यांचीं लग्नेंही बहुधा होत नाहींत. एखादी खवासण खुबसूरत असली म्हणजे खुद्द संस्थानिकाचेंही तिच्यावर लक्ष जातें, व तिला झनानखान्यांत सामील करण्यांत येतें. अशीं उदाहरणें बरींच घडलीं आहेत.

खवासांची संख्या जसजशी वाढूं लागली, तसतशी त्या सर्वांचीच संस्थानिकांस गरज नसल्यामुळें, त्यांच्या नोकरींतून कांहीं सुटून ते स्वतंत्र झाले. हे खवास लग्नें करून राहूं लागले व खवास ह्या नांवाची त्यांची एक नवीनच जात निर्माण झाली. ह्यांच्यापैकीं कित्येकांची स्थिति इतकी सुधारली आहे कीं, जर चांगला हुंडा मिळाला तर गिराशियाही त्यांच्या मुली करण्यास तयार असतात. त्यांच्यापैकीं कित्येकांच्या मालकीच्या जमिनी आहेत. पण बाकीचे रजपूत संस्थानिक व गिराशिया यांच्या नोकरींत असतात अथवा शेती किंवा मजुरी करून पोट भरतात. त्यांच्या चालीरीति व धर्म खालच्या दर्जाच्या रजपुतांप्रमाणें आहे.

**खाटकी**—कसाई जातीचें दुसरें नांव.

**खाटिक**—कसाई जातीचें दुसरें नांव.

**खारक**—हे मुख्यत्वेंकरून काठेवाडांत आढळतात. ते आपणास क्षत्रिय म्हणवितात. पण ते मूळचे वाणिया असावे असें दिसतें. ते पूर्वी गाडवांवरून धान्य गांवोगांव नेऊन व्यापार करीत असत. त्यावरूनच त्यांस खारक हें नांव पडलें असावें. खारक हा शब्द खाखाहांका म्हणजे गाढवें हांकणारे ह्या शब्दाचें संक्षिप्त रूप असावें. कालेंकरून ते आपल्या धंद्यामुळें आपल्या मूळ जातींतून वेगळे पडून त्यांची स्वतंत्र जात बनली असावी. हल्लीं ते मुख्यत्वेंकरून शेतीचा धंदा करितात.

खारवे जेव्हां वाणिया होते तेव्हां ते जैनधर्मांचे होते. आतां ते कट्टे वैष्णव बनले आहेत. त्यांचा मुख्य देव ठाकोरजी असून त्यांची कुलदेवता खोडियार आहे. त्यांचीं धर्मकृत्यें तालावदी औदिच्य ब्राह्मण चालवितात.

त्यांच्या चालीरीति कुणब्यांप्रमाणें आहेत. ते मांस खात नाहींत व दारू पीत नाहींत.

**खार पाटील**—आग्री आणि खारवा ह्या जातीचें दुसरें नांव.

**खारवा**—किंवा खारवी, कच्छ, काठेवाड, खंबायत, गुजराथ, कोंकण आणि कानडा जिल्हा येथील बंदरांत व मुंबई शहरांत आढळतात. खारवा हा फारसी शब्द असून त्याचा अर्थ खलासी असा आहे. म्हणून हा शब्द दर्यावर्दीपणा करणाऱ्या सर्व लोकांस लावण्यांत येतो. ह्या शब्दाची व्युत्पत्ति खार म्हणजे खारी जमीन ह्या शब्दावरूनही लावतात. खारवा लोक समुद्र-कांठच्या खाऱ्या जमिनींत शेती करतात, तेव्हां ही व्युत्पत्तीही अन्वर्थक अशीच आहे. खारव्यांस खारपाटील असेंही म्हणतात.

गुजराथेंतील खारवा आपण रजपूत आहों असें सांगतात. मीठ करण्याचा व दर्यावर्दीपणाचा धंदा आपण स्वीकारल्यामुळें आपणास खारवा हें नांव पडलें असें त्यांचें म्हणणें आहे. पण ह्या म्हणण्यास कांहीं पुरावा सांपडत नाहीं.

खारव्यांत सात पोटभेद आहेत, ते असे:-( १ ) रजपूत, ( २ ) कोळी, ( ३ ) खंभाती, (४) हांसोती, ( ५ ) सुरती, ( ६ ) भडोची, ( ७ ) कोंकणी. यांपैकीं रजपूत खारव्यांचा रजपुतांबरोबर रोटीव्यवहार होतो व त्यांच्या रीतिभातीही रजपुतांप्रमाणेंच आहेत. कोळी खारवा हे दक्षिण काठेवाडच्या समुद्रांत चांचेगिरी करणाऱ्यांचे वंशज असून त्यांच्यांत कोळ्यांच्या रक्ताची बरीच भेसळ आहे. त्यांचे रीतरिवाज कोळी लोकांच्या रीतरिवाजाहून फारसे भिन्न नाहींत. खंभाती, भडोची, हांसोती आणि सुरती ह्यांत खंभाती सर्वांत श्रेष्ठ आहेत. ते इतर तिन्ही पोटभेदांतील मुली करितात, पण आपल्या मुली त्यांस देत नाहींत. ह्या तिन्ही पोटभेदांत परस्पर रोटीबेटीव्यवहार होतो.

मुलांमुलींच्या लग्नांस वयाची निश्चित मर्यादा घातलेली नाहीं. तरी पण मुली वयांत येईपर्यंत लग्नाच्या ठेवणें गौण मानतात. विधवाविवाहास मोकळीक आहे. सोडचिठ्ठी देतां येते. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रीस दुसरें लग्न करतां येतें.

कांहीं खारवा स्वामीनारायण पंथाचे अनुयायी आहेत व कांहीं कुबेरजीचे अनुयायी आहेत. कच्छमधील खारवा वैष्णव पंथाचे आहेत. ते अंबाजी, बहुचरा, भद्रकाली, आशापुरा, हर्संद, लना, चामुंडा, मामई, पद्मणी, वेरावरी इत्यादि देवींस विशेषतः भजतात. त्यांचे उपाध्ये ब्राह्मण असतात. मृतांस पुरण्यांत येतें. ते श्राद्धें करितात.

खारवा मुख्यत्वेंकरून खलाशांचा धंदा करितात. हिंदुस्थानांतील सर्व भागांत पूल बांधण्याच्या कामांत त्यांच्या इतके निष्णात कोणी नाहींत अशी त्यांची ख्याति आहे. मुंबईंत व गुजराथेंतील शहरांतून घरावरील कौलें परतण्याचें काम सर्वस्वीं खारवेच करितात. त्यांच्या बायका काथ्या कुटतात, दोरखंडें वळतात व मासे विकतात.

स्वामीनारायण आणि कुबेरजी पंथाचे अनुयायी सोडून इतर खारवा मांस खातात व दारू पितात.

कोंकणी खारव्यांत खांडे खारवी म्हणून एक पोटभेद आहे. चांचेगिरीच्या काळांत जे खारवी तरवारी वापरीत ते हे खांडे खारवी असावे. कानडा जिल्ह्यांतील खारवी गोव्यांतून आलेले आहेत असें म्हणतात. गोव्यांत पोर्तुगीजांची सत्ता स्थापन होण्यापूर्वीं त्यांचें महत्त्व मोठें होतें. ज्यांची कुलदेवता एक आहे त्यांच्यांत परस्पर शरीरसंबंध होत नाहीं. मुलींचीं लग्नें बहुधा वयांत येण्यापूर्वींच करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. फक्त विधुरांसच विधवांबरोबर विवाह लावितां येतात.

कोंकणी खारव्यांची अम्मा, जतका आणि म्हास्ती या देवतांवर विशेष भक्ति आहे. रोमन कॅथोलिक साधूंवर त्यांची श्रद्धा असून कुमारी मेरी आणि सेंट फ्रान्सिस झेवियर यांस ते नवस करितात. गुडफ्रायडेचा दिवस ते सणासारखा पाळतात. त्यांचे उपाध्ये हविक आणि कर्नाटक ब्राह्मण असतात.

यांचा धंदा गुजराथी खारव्यांप्रमाणेंच आहे. यांच्यांतील कांहीं लोक खाऱ्या पाण्यांत मासे मारतात. तसेंच इतर मच्छीमार जातींप्रमाणें ते पालख्याही वाहतात.

ते मांस खातात व दारू पितात.

**खारवी**—खारवा जातीचें दुसरें नांव.

**खाल्पा**—ह्या जातीस चमडिया, चमार, छाडिया आणि डबगार अशींही नांवें आहेत. ते मुख्यत्त्वेंकरून भडोच, सुरत व रेवाकांठा येथें आढळतात. खाल्पा हें नांव खल म्हणजे वरची कातडी ह्या शब्दावरून पडलें आहे. ते कातडीं कमावण्याचें व कातड्याच्या पिशव्या, दोर वगैरे करण्याचें व जुने जोडे दुरुस्त करण्याचें काम करितात, त्याचें तें निदर्शक आहे. ही जात रजपुतांस हलक्या जातींच्या स्त्रियांपासून झालेल्या संततीपासून झाली आहे असें सांगतात. त्यांच्यांत सहा पोटभेद आहेत, ते असे:—(१) खंबातिया, (२) कोटरिया, (३) नडिया, (४) पाटणी, (५) सरिया, (६) टिप्रा. त्यांच्यांत कुळें आहेत. त्यांतील कांहीं स्थानिक स्वरूपाचीं आहेत व कांहीं रजपुतांप्रमाणें आहेत. एकाच कुळांतील स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. मुलांमुलींचीं लग्नें बहुधा अगदीं लहान वयांतच करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. विधवेस मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न करतां येतें. सोडचिठ्ठी देतां येते.

खाल्पा रामानंदी, कबीर आणि रोहिदासी पंथाचे अनुयायी आहेत. त्यांचे उपाध्ये गारुडा किंवा कलाटिया ब्राह्मण असतात. मृतांस जाळण्यांत अथवा पुरण्यांत येतें. मृतांच्या तृप्त्यर्थ ते भाद्रपद महिन्यांत श्राद्ध करितात.

खाल्पा गोमांस खातात. ते दारू पितात. ते धेड, मांग आणि भंगी ह्यांच्या हातचें अन्न खातात. भंगी, मांग वगैरे अगदीं हलक्या जाती सोडून ते इतर जातींच्या लोकांस आपल्या जातींत घेतात.

**खिसेकातरू**—भामटा ह्या जातीचें दुसरें नांव.

**खेत्री**—छेत्री किंवा मुस्टिगर ही जात मुख्यत्वेंकरून बेळगांव आणि विजापूर जिल्ह्यांत आढळते. खेत्री हा शब्द संस्कृत क्षत्रिय ह्या शब्दाचा अपभ्रंश आहे असें कित्येकांचें म्हणणें आहे. परंतु ह्या जातीचा धंदा शेती

करण्याचा असल्यामुळें खेत्री हा शब्द संस्कृत क्षेत्र म्हणजे शेत ह्या शब्दाचा अपभ्रंश असावा, हें म्हणणें जास्त सयुक्तिक दिसतें.

ह्या जातींत कर्नाटक खेत्री आणि कानडा खेत्री असे प्रांतिक स्वरूपाचे दोन भेद आहेत. त्यांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं.

कर्नाटक खेत्र्यांत आडनांवें अथवा कुळें नाहींत. जे एकाच कुटुंबांतील आहेत अशी निश्चित माहिती मिळते. त्यांच्यांत शरीरसंबंध होत नाहीं. मुलांमुलींचीं लग्नें लहानपणीं अथवा वयांत आल्यानंतरही करतात. विधवाविवाह रूढ आहे.

कर्नाटक खेत्र्यांच्या कुलदेवता कालम्मा, मारुती, तिरुपतीचा व्यंकट-रमण आणि यल्लम्मा ह्या आहेत. त्यांचीं लग्नें एक देशस्थ ब्राह्मण, त्यांच्या जातींतील कट्टिमनी म्हणजे प्रमुख, व एक ओष्टमा ब्राह्मण असे तिघे मिळून चालवितात. मृतांस जाळतात. श्राद्ध केलेंच पाहिजे असा नियम नाहीं.

ते मांस खातात व दारू पितात.

**खेत्री कोमारपंथ**—कोमारपैक जातीचें दुसरें नांव.

**खेळकरी**—कोल्हाटी जातीचें दुसरें नांव.

**गंगी मक्कलू**—कब्बलिगेर ह्या जातीचें दुसरें नांव.

**गडिगीर**—वैदू जातीचें दुसरें नांव.

**गढवी**—चारण जातीचें दुसरें नांव.

**गणेशिया**—मेघवाळ जातीचें दुसरें नांव.

**गलियारा**—बंधारा जातीचें दुसरें नांव.

**गवंडी**—ह्या जातीचे लोक सर्व इलाखाभर थोडथोडे पसरलेले आहेत. त्यांचा मुख्य धंदा दगडमातीचें काम करणें, भिंती, घरें, टांक्या, विहिरी वगैरे बांधणें हा आहे. सागर आणि जिरे गवंडी चुन्यामातीच्या देवांच्या मूर्ति आणि गणपतीही करितात. विजापूर जिल्ह्यांतील गवंडी पूर्वीं मीठही करीत. कांहीं गवंडी शेती आणि मजुरीही करितात.

गवंड्यांत (१) मराठा, (२) जिरे, (३) सागर किंवा कामाठी, (४) कानडी आणि (५) गुजराथी असे पांच पोटभेद आहेत. गुजराथी गवंड्यांस कडिया, चुनार आणि सनगर असें म्हणतात.

मराठा गवंड्यांचे रीतरिवाज मराठा कुणब्यांप्रमाणेंच आहेत. ते मूळचे मराठा कुणबीच असून गवंड्यांचा धंदा करूं लागल्यापासून त्यांची निराळी जात बनली असावी असें दिसतें.

जिरे गवंडी फक्त पंढरपूर आणि सोलापूर येथें आढळतात. विजापूरच्या बादशहाच्या पदरीं जिरे ह्या आडनांवाचा एक प्रमुख गवंडी होता त्याच्यावरून जिरे हें नांव पडलें असें सांगतात. ते पूर्वी मराठा कुणबी होते. परंतु त्यांनीं विजापूरच्या आदिलशाही घराण्यांतील बादशहांकरितां कबरी बांधल्यामुळें जातीनें त्यांस १५० रुपये दंड केला. तो न दिल्यामुळें त्यांना जातिबहिष्कृत करण्यांत आलें.

सागर अथवा कामाठी गवंडी मुख्यत्त्वेंकरून सोलापूर जिल्ह्यांत आढळतात. ते आपण मूळचे क्षत्रिय पण हल्लीं शूद्र झालों आहों असें सांगतात. आपण प्रथम काशींतून निजामाच्या राज्यांत आलों, आणि तेथून तीनशें वर्षांपूर्वी सोलापूर जिल्ह्यांत आलों असें त्यांचें म्हणणें आहे. त्यांच्या जातीचे लोक अजूनही हैद्राबादेजवळ आढळतात. त्यांतील कांहीं जानवीं घालतात व जेवतांना मुकटे नेसतात.

कानडी गवंड्यांस धारवाड जिल्ह्यांत सागर चक्रवर्ती असें म्हणतात. त्यांच्यावर लिंगायत धर्माचा बराच परिणाम झालेला दिसतो. ते कधीं कधीं धर्मविधि चालविण्याच्या कामीं जंगमांची योजना करितात. त्यांचे नेहमींचे उपाध्ये ओझमा किंवा ब्राह्मण असतात.

कडिया किंवा गुजराथी गवंड्यांचे रीतरिवाज गुजराथेंतील इतर कारागीर जातींप्रमाणेंच आहेत.

**गवळी**—महाराष्ट्र व कर्नाटकांतील सर्व भागांत आढळतात. ते आपली उत्पत्ति कृष्णापासून झाली आहे असें सांगतात. गवळी ही उद्योगप्रधान जात असून तिची उत्पत्ति धनगर, कुरुबा, मराठा, कुणबी इत्यादि जातींपासून झाली आहे हें अगदीं उघड आहे. त्यांचा परंपरागत धंदा गुरें पाळून दूधदुभतें, लोणी व तूप विकणें हा आहे. त्यांच्यांत ( १ ) अहिर, ( २ ) कोंकणी, (३) मराठा, ( ४ ) नगरकर, ( ५ ) वजरकर, ( ६ ) धनगर, ( ७ ) कृष्ण

आणि ( ८ ) कुरुबा असे आठ पोटभेद आहेत. ह्या आठही पोटभेदांचा परस्परांशीं रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. कुलाबा जिल्ह्यांतील कोंकणी गवळ्यांत दाभोळी आणि चेऊली असें दोन पोटभेद असून त्यांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. कांहीं कांहीं ठिकाणीं ह्या जातीवर लिंगायत धर्माचा परिणाम बराच झालेला आढळतो. अजूनही पुष्कळ गवळी आपले धर्मविधि जंगमांकडून चालवितात. ते मांस खात नाहींत व मृतांस पुरतात. बरेचसे गवळी तर शुद्ध लिंगायतच आहेत. एकच आडनांव असलेल्या स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. आतेबहिणीशीं किंवा मावसबहिणीशीं लग्न लावितां येत नाहीं. मामेबहिणीशीं लग्न करतां येतें. भावाभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करतां येतें. विधवाविवाहास मोकळीक आहे. सोडचिठ्ठी देतां येते.

गवळ्यांचा मुख्य देव कृष्ण. त्यांच्या कुलदेवता महादेव, खंडोबा, अंबा, जनाई, कोंडाई, विठोबा इत्यादि आहेत. त्यांचे उपाध्ये जंगम किंवा ब्राह्मण असतात; पण लग्नविधि चालविण्यास ब्राह्मण अवश्य असावा लागतो. मृतांस जाळण्यांत अथवा पुरण्यांत येतें. ते श्राद्ध व महालय करितात.

कांहीं गवळी मांस खातात व दारू पितात. कांहीं शाकाहारी आहेत.

**ळभोई**—रायकरी जातीचें दुसरें नांव.

**गंधेरिया**—मुख्यत्त्वेंकरून भडोच व सुरत जिल्हा, व बडोदें व खंबायत संस्थान येथें आढळतात. ते खारवा आणि माछी यांच्या मिश्रणापासून उत्पन्न झाले आहेत असें दिसतें. ते कौलें चाळणें, मासे मारणें आणि नावाडीपणा हे धंदे करितात. त्यांच्या पोटभेदांपैकीं दोहोंचीं नांवें माछी आणि हंसोती अशीं आहेत, यावरून वरील म्हणण्यास बळकटी येते.

ह्या जातीचे संधाडिया आणि मुजफडिया असे दोन मुख्य पोटभेद आहेत. यांशिवाय गंधेरिया, माछी आणि हंसोती असे आणखी तीन पोटभेद आहेत. गंधारिया कौलें चाळण्याचा धंदा करितात, माछी मासे मारतात आणि हंसोती नावाडीपणा करतात. एकाच कुळांतील स्त्रीपुरुषांचा, तसेंच निरनिराळ्या प्रदेशांत राहाणारांचा परस्पर शरीरसंबंध होत नाहीं. आतेबहिणीशीं, मामेबहिणीशीं किंवा मावसबहिणीशीं लग्न करतां येत नाहीं. भावाभावांस

बहिणीबहिणींबरोबर लग्न करतां येतें. मुलांचीं लग्नें आठ वर्षांच्या वयापर्यंत व मुलींचीं सहा वर्षांच्या वयापर्यंत करतात. कधीं कधीं मुलें जन्माला येण्यापूर्वींही त्यांचा वाङ्निश्चय करून ठेवतात. ह्या जातींतील सर्व लग्नें खंबायत येथेंच झालीं पाहिजेत व तीं खंबायत येथील सारस्वत ब्राह्मणानेंच चालविलीं पाहिजेत असा नियम आहे. विधवाविवाहास मोकळीक आहे. सोडचिठ्ठी देतां येते. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रीस पुनः लग्न करतां येतें.

गंधेरिया स्वामीनारायण, कबीर आणि रामानंद या पंथांचे अनुयायी आहेत. त्यांचें मुख्य दैवत शंकर. त्यांचे उपाध्ये सारस्वत ब्राह्मण असतात. मृतांस जाळण्यांत येतें.

ते मांस खातात व दारू पितात.

**गंध्रप**—हे मुख्यत्वेंकरून गुजराथेंतील दक्षिण भागांत आढळतात. ते आपण मूळचे चित्रोदा पोटजातीचे नागर ब्राह्मण होतों असें सांगतात. ते वाद्यें वाजवितात आणि कलावंतिणींस साथ करितात. ह्या जातीची संख्या अगदीं लहान असल्यामुळें भावाबहिणींच्या मुलांचीं लग्नें करण्याचा प्रघात त्यांच्यांत रूढ आहे. ते ब्राह्मणांप्रमाणें मौंजीबंधन करितात आणि इतर बाबतींतही त्यांचे आचारविचार ब्राह्मणांप्रमाणेंच असतात. ते मद्यमांस सेवन करीत नाहींत.

**गाढव लोणारी**—लोणारी जातीचें दुसरें नांव.

**गाण**—पहा—कलावंतीण अथवा गाण.

**गाणिग**—कर्नाटकांत आणि कानडा जिल्ह्यांत आढळतात. ते मूळ म्हैसूर संस्थानांतून आले असावे असें मानण्यांत येतें. म्हैसूर संस्थानांतील गाणिग आणि इकडील गाणिग ह्यांचे धर्मविधि बहुतांशीं सारखे आहेत, आणि करे आणि सज्जन ह्या नांवाचे दोन मुख्य पोटभेद दोघांतही आढळतात. यावरून ते मूळचे एकच असावे ह्या अनुमानास बळकटी येते.

गाणिगांत नऊ पोटभेद आहेत ते असेः—(१) बिळे किंवा सफेत, (२) करे म्हणजे काळे, (३) केंप म्हणजे लाल, (४) पंचम, (५) पस्ती, (६) सज्जन म्हणजे शुद्ध, (७) तिळवाण, (८) वैष्णव, (९) वंतियत म्हणजे एका बैलास कामास लावणारे. ह्यांपैकीं वैष्णवांशिवाय बाकी सर्व परस्परांशीं अन्नव्यवहार

करतात; पण कोणीही दुसऱ्या पोटभेदांतील लोकांशीं बेटीव्यवहार करीत नाहींत. कानडा जिल्ह्यांतील गाणिगांत मक्कलसंतान आणि अलियसंतान असे आणखी दोन पोटभेद आहेत. ज्यांच्यांत वारसा हक्क मुलांकडे जातो ते मक्कलसंतान व ज्यांच्यांत वारसा हक्क बहिणीच्या मुलांकडे जातो ते अलियसंतान.

एकच आडनांव असलेल्या स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. सज्जन आणि पस्ती शिवाय करून इतर पोटभेदांत विधवाविवाहास आणि सोड-चिठ्ठीस मोकळीक आहे. कानडा जिल्ह्यांत ब्राह्मणांप्रमाणें विधवांचें केशवपन करितात.

कर्नाटकांतील गाणिगांचे धर्मविधि बहुतांशीं लिंगायतांप्रमाणें आहेत. कानडा जिल्ह्यांतील गाणिगांचे धर्मविधि गुडिगरांप्रमाणें आहेत.

गाणिग शिवास आणि विष्णूसही भजतात. कर्नाटकांतील गाणिग घाण्यास जोडलेल्या बैलाच्या डोळ्यांस पडदा बांधणें हें पाप आहे असें समजतात. तसेंच घाण्यास बैलांची जोडी लावणें हेंही ते पापच समजतात. ह्याच समजुतीमुळें त्यांच्यांत वंतियत हा पोटभेद झालेला आहे. कर्नाटकांतील गाणिगांचे उपाध्ये जंगम असतात. कानडा जिल्ह्यांतील गाणिगांचे उपाध्ये हविक ब्राह्मण असतात.

गाणिगांचा परंपरागत धंदा घाण्यांतून तेल काढण्याचा आहे. ते बहुतांशीं ह्याच धंदा करितात.

वैष्णवांशिवाय बाकी सर्व मांस खातात व दारू पितात. कानडा जिल्ह्यांतील गाणिगांस दारू पिण्याची मनाई आहे. ते आपणांस वैश्य म्हणवितात आणि हविक ब्राह्मणांशिवाय इतरांच्या हातचें अन्न खात नाहींत.

**गाबीत**--मुख्यत्वेंकरून रत्नागिरी व कानडा जिल्हा व सावंतवाडी संस्थानांत समुद्रकिनाऱ्यावर आढळतात. ते आपणास कोंकण मराठा असें म्हणवितात व आपण मूळचे मराठे असून शिवाजीचें आरमार चालवीत असूं असें सांगतात. ब्रिटिशांनीं पेशव्यांना जिंकल्यानंतर मराठ्यांच्या आरमाराचा नाश झाला. तेव्हांपासून आपण मासे मारण्याचा धंदा करूं लागलों व त्यामुळें मराठ्यांपासून वेगळे झालों असें त्यांचें म्हणणें आहे. त्यांच्यामध्यें कुळांचे आणि

देवकांचे जें अवशेष सांपडतात त्यांवरून ते मूळचे मराठे होते ह्या म्हणण्यास फारशी [illegible]त दिसत नाहीं. त्यांचा परंपरागत धंदा दर्यावर्दीपणा करणें व मासे मारून विकणें हा आहे. कांहीं जमिनींचे मालक आहेत व कांहीं खोत आहेत. कित्येकांच्या म्हणण्याप्रमाणें त्यांच्यांत ब्राह्मणांप्रमाणें गोत्रें आहेत. कित्येक त्यांच्यांत मराठ्यांप्रमाणें कुळें आहेत असें सांगतात. त्यांच्यांत मराठ्यांप्रमाणें देवकेंही आहेत. शरीरसंबंध कोणाशीं करावा याविषयीं निश्चित असे नियम नाहींत. मामेबहिणीशीं लग्न करतां येतें, पण आतेबहिणीशीं करतां येत नाहीं. बहिणीबहिणींच्या वंशजांत तीन पिढ्यांच्या आंत शरीरसंबंध करतां येत नाहीं. भावाभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करतां येतें. मुलांचीं लग्नें बहुधा चौदा ते वीस व मुलींचीं आठ ते चौदा वर्षांच्या दरम्यान करतात. विधवाविवाहास मोकळीक आहे. अविवाहितास विधवेशीं लग्न करितां येत नाहीं. स्त्री दुराचारी निघाल्यास जातीच्या संमतीनें तिला सोडचिठ्ठी देतां येते.

गाबीत सर्व हिंदु देवतांस भजतात. कांहीं वारकरी आणि रामदासी सांप्रदायाचे अनुयायी आहेत. त्यांचे उपाध्ये चित्पावन आणि कऱ्हाडे ब्राह्मण असतात. मृतांस जाळण्यांत अथवा पुरण्यांतही येतें. दर वर्षी मृततिथीच्या दिवशीं श्राद्ध करितात.

गाबीत मांस खातात व दारू पितात.

**गामगौडा**—गामवक्कल जातीचें दुसरें नांव.

**गामवक्कल**—ह्या जातीचे लोक फक्त कानडा जिल्ह्यांत आढळतात. त्यांस गामगौडा असेंही म्हणतात. ते वक्कल म्हणजे शेती करणाऱ्या लोकांची एक जात असून त्यांचा दर्जा हालवक्की वक्कलांखालोखाल आहे.

ह्या जातींत पुढें दिल्याप्रमाणें चौदा बळी आहेत:—

१ अज्जने बळी......एक प्रकारचें झाड
२ अने बळी.........अने = हत्ती
३ अरशिन बळी......असिन = हळद
४ चेंडी बळी.........एक प्रकारचें झाड
५ देवतेर बळी

६ हिरे बळी......एक प्रकारचें झाड
७ होन्ने बळी......एक प्रकारचें झाड
८ कडन बळी
९ कडविन बळी...कडवे=सांबर
१० नेरळ बळी......एक प्रकारचें झाड
११ शेट्टी बळी......शेट्टी=मासा.
१२ शिगे बळी......शिगे=रिंगणें.
१३ शिरे बळी......शिरे=एक प्रकारचें झाड
१४ शिबिन बळी....शिबिन=एक प्रकारचें झाड

ज्या वस्तूवरून बळीचें नांव पडलें आहे त्या वस्तूस त्या बळीचे लोक अतिशय मान देतात. जसें, अने बळीचे लोक हत्तीस नारळ वाहतात व कडविन बळीचे लोक सांबर मारीत नाहींत किंवा त्याचें मांस खात नाहींत. त्याचप्रमाणें झाडांवरून ज्यांचीं नांवें पडलीं आहेत त्या बळींचे लोक तें तें झाड तोडीत नाहींत किंवा दुसऱ्या कोणत्याही प्रकारें त्याला इजा करीत नाहींत. बळी पितृपक्षाकडून गणला जातो. एकाच बळीच्या लोकांत शरीरसंबंध होत नाहीं. मुलींचीं लग्नें बहुधा बारा वर्षांपर्यंत व मुलांचीं वीस वर्षांपर्यंत करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. अविवाहितास विधवेशीं लग्न करतां येत नाहीं. सोडचिठ्ठी देतां येते. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रीस नवरा जिवंत असेपर्यंत दुसरें लग्न करतां येत नाहीं.

गाम वक्कलांचा कुलदेव तिरुपतीचा व्यंकटरमण होय. ते हनुमान, जतगा आणि म्हस्ती वगैरे स्थानिक गौण देवतांसही भजतात. त्यांचे धार्मिक रीतरिवाज हालवक्की वक्कलांप्रमाणें आहेत.

त्यांचा वंशपरंपरागत धंदा शेती करण्याचा आहे. कांहीं शेतावर मजुरीही करतात. ते मांस खातात व दारू पितात.

**गारुडी**—ह्यांस मोडिकर व मदारी असेंही म्हणतात. ते सर्व महाराष्ट्रांत, गुजराथेंत व कानडा जिल्ह्यांत थोडथोडे आढळतात. ते जादूचे व सापाचे खेळ

करीत गांधीगांव भटकत असतात. ते विशेषेंकरून भवानीस भजतात. ते कर्में चालविण्यास ब्राह्मणांस बोलावितात. मृतांस जाळतात अगर पुरतात.

**गावड**—धनगर जातीचें दुसरें नांव.

**गावडा**—ह्यांस मीठ गावडा असेंही म्हणतात. ते रत्नागिरी जिल्ह्यांत व सावंतवाडी संस्थानांत आढळतात. ह्यांच्यांत देवकें व कुळेंही असून दोनतीन गोत्रेंही सांपडतात. परंतु लग्नें मात्र एकाच कुळांतील स्त्रीपुरुषांत होत नाहींत. एकाच गोत्रांतही लग्नें होत नाहींत असेंही कित्येकांचें म्हणणें आहे. मात्र हा नियम काश्यप गोत्रास लागू नाहीं. ह्याचें कारण ह्या जातींतील बहुतेक लोक याच गोत्राचे आहेत. काश्यप गोत्राशिवाय वत्स व भारद्वाज हीं गोत्रेंही त्यांच्यांत आढळतात.

गावड्यांचा मूळ धंदा मीठ पिकविण्याचा होता. सध्यां ते बहुधा शेती व शेतावर मजुरी करतात व खटारे हांकतात. मीठ पिकविणारांचा त्यांच्यांत अजूनही एक लहानसा पोटभेद आहे. त्यांचा दर्जा हलका समजला जातो. आतेबहिणीशीं व मामेबहिणीशीं लग्न करतां येतें, मावसबहिणीशीं करतां येत नाहीं. विधवाविवाहास मोकळीक आहे. स्त्री दुराचारी निघाल्यास तिला जातीचे पंच व उपाध्या यांच्या अनुमतीनें सोडचिठ्ठी देतां येते. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रीस जातीबाहेर घालवितात. मग ती बहुधा वेश्यावृत्तीनें राहते.

गावड्यांचे रीतरिवाज आणि धार्मिक आचार भंडाऱ्यांप्रमाणें आहेत.

ते मांस खातात व दारू पितात.

**गावडा**—हलवक्की वक्कल जातीचें दुसरें नांव.

**गिडबिडकी**—जोशी ह्या जातीचें दुसरें नांव.

**गुजर**—हें नांव महाराष्ट्रांत सर्व गुजराथ्यांस लावण्यांत येतें.

**गुडिगर**—ह्यांस गौडचित्रक असेंही म्हणतात. ते मुख्यत्वेंकरून कानडा जिल्ह्यांत आढळतात. ते आपणास चितार किंवा चित्रक असें म्हणवितात आणि आपण क्षत्रिय आहों असें प्रतिपादन करितात. पोर्तुगीजांचा अंमल गोव्यांत बसल्यानंतर ते तेथून कानडांत आले आणि त्यांच्यांतून जे किनारा सोडून वर गेले त्यांनीं कोंकणीऐवजीं कानडी भाषेचा स्वीकार केला.

ते आपणांत काश्यप, कौंडण्य, वसिष्ठ, वत्स, गौतम आणि भारद्वाज हीं गोत्रें असल्याचें सांगतात, पण ब्राह्मण हें त्यांचें म्हणणें कबूल करीत नाहींत. एकाच गोत्रांत लग्नें होत नाहींत. आतेबहिणीशीं व मामेबहिणीशीं लग्न करतां येतें; मावसबहिणीशीं करतां येत नाहीं. भावाभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करतां येतें. मुलींचीं लग्नें नऊ ते बारा व मुलांचीं सोळा ते वीस वर्षांच्या दरम्यान करतात. लग्न करण्यापूर्वीं मुलांची मुंज करितात. विधवाविवाहास मोकळीक नाहीं. स्त्री दुराचारी निघाल्यास तिला सोडचिठ्ठी देतां येते. अशा स्त्रीस जातीबाहेर घालवून देतात.

गुडिगारांचीं कुलदैवतें नागेश, रवळनाथ, लक्ष्मीनारायण, म्हाळसा, शांता-दुर्गा, कावेरी आणि कामाक्षी हीं आहेत. ह्या सर्वांचीं पवित्र स्थानें गोव्यांत आहेत. त्यांचे उपाध्ये हविक ब्राह्मण असतात.

ह्यांचा परंपरागत धंदा कोरींव काम करण्याचा, जडावाचें काम करण्याचा व चित्रें काढण्याचा आहे. चंदनावर व हस्तिदंतावर ते उत्कृष्ट कोरींव काम करितात.

ते मांस खातात व दारू पितात. ते फक्त हविक ब्राह्मणांच्या हातचेंच अन्न खातात.

**गुरव**—गुजराथ खेरीजकरून इलाख्यांत सर्वत्र आढळतात. त्यांच्यांत ( १ ) शैव अथवा नगरी, नीलकंठ, स्वयंभू, पुजारी किंवा देवलक, ( २ ) कडू अथवा जुनरी, कोटसाने किंवा गस्त गुरव, ( ३ ) हुगार, जीर किंवा मलगर–हे बहुतांशीं लिंगायत आहेत. ( ४ ) जैन गुरव, ( ५ ) कोंकण किंवा भाविक गुरव, असे पांच पोटभेद आहेत. यांपैकीं कोणाचाही परस्पर शरीरसंबंध होत नाहीं. जीर किंवा हुगार गुरवांत ( १ ) लिंगायत म्हणजे लिंग धारण करणारे, ( २ ) हिंदु म्हणजे जानवीं घालणारे, ( ३ ) आणि लिंग व जानवीं हीं दोन्ही धारण करणारे, असे तीन धार्मिक भेद आहेत.

वरील सर्व पोटभेदांस साधारणत: नुसतें गुरव असेंच म्हणतात. कडू गुर-वांचा दर्जा शैव गुरवांपेक्षां हलका आहे. जुनरी आणि नगरी ह्या नांवांवरून हे पोटभेद अहमदनगर आणि विजापूर ( जुन्नर ) हीं राज्यें वेगवेगळीं होतीं

त्या वेळीं झाले असावे असें दिसतें. राजकीय देशमर्यादेमुळें जातींत पोटभेद कसे निर्माण होतात त्याचें हें एक उदाहरण आहे.

जैन गुरव रत्नागिरी जिल्ह्यांतील मालवण तालुक्यांत आढळतात. त्यांस जैन कां म्हणतात तें कळत नाहीं. ते जैन तीर्थकरांस मुळींच भजत नाहींत, असें शोधाअंतीं आढळून आलें आहे. मालवण तालुक्यांतील वायंगण गांवीं एक शिवाचें देऊळ आहे. त्यास जैन रामेश्वराचें देऊळ असें म्हणतात. तें कोणा तरी जैनानें बांधलें असल्यामुळें त्यास हें नांव पडलें असण्याचा संभव आहे. तसेंच लिंगायत धर्माच्या मतांचा पगडा बसून ज्या जैनांनीं शिवपूजेचा स्वीकार केला त्यांचे वंशज सध्यांचे जैन गुरव असावे असें दिसतें.

शैव गुरवांस गुरवांच्या सर्व पोटभेदांत श्रेष्ठ समजण्यांत येतें. ते मूळ ब्राह्मण होते अशी दंतकथा प्रचलित आहे. त्यांचा मूळ पुरुष जो सुदर्शन ब्राह्मण त्याच्या दुष्कृत्यांमुळें ते पतित झाले असें सांगतात. ते मौंजीबंधन करितात आणि मद्यमांस सेवन करीत नाहींत. त्यांचे आचारविचार आणि धर्मविधि बहुतांशीं देशस्थ ब्राह्मणांप्रमाणें आहेत. त्यांच्यांत गोत्रें आहेत आणि आडनांवांनीं दर्शविलीं जाणारीं कुळेंही आहेत. पुष्कळ कुटुंबांस आपलीं गोत्रें माहित नसल्यामुळें लग्नें मात्र कुळांवरून ठरविलीं जातात. विधवाविवाहास आणि सोडचिठ्ठीस मोकळीक आहे. त्यांचे उपाध्ये त्यांच्याच जातीचे असतात. जातीचे उपाध्ये न मिळाल्यास ब्राह्मणांस बोलावितात. ते फक्त ब्राह्मणांच्याच हातचें अन्न खातात.

जुनरी अथवा कडू गुरव मांस खातात व दारू पितात आणि त्यांचे रीतरिवाज कुणब्यांप्रमाणें असतात. ते कुणब्यांच्या हातचें अन्न खातात.

लिंगायत गुरवांस अष्टवर्णाचा अधिकार आहे. पण ते पंचमसाळ्यांत मोडत नाहींत. देवळांतील देवांच्या पूजेअर्चेशिवाय ते वाद्यें वाजवितात व फुलें विकतात. कांहीं फलज्योतिषही सांगतात व कांहीं शेती करतात.

जैन गुरवांचे आचारविचार स्थानिक ब्राह्मणांप्रमाणें असतात. ते मद्यमांस सेवन करीत नाहींत व ब्राह्मणांच्याही हातचें अन्न खात नाहींत.

**गोपाळ**—हे गाई पाळतात म्हणून त्यांस गोपाळ हें नांव पडलें असावें. ते कसरतीचे खेळ करीत आणि भिक्षा मागत गावोगांव भटकत असतात. मराठा कुणबी, धनगर, कासार, सोनार, साळी, वंजारी आणि महार इत्यादि अनेक जातींच्या लोकांपासून ही जात बनली आहे असें दिसतें. अजूनहा ते कुणब्यांस आपल्या जातींत घेतात. त्यांची गणना अस्पृश्यांत केली जाते. त्यांची मुख्य वस्ती खानदेशांत आहे.

त्यांच्यांत भिल्ल, गुजराथी, मराठा आणि वीर असे चार पोटभेद आहेत. त्यांत मराठ्यांचाच भरणा विशेष आहे. त्यांच्यांत अनेक कुळें आहेत. एकाच कुळांतील स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. आतेबहिणीशीं अथवा मावसबहिणीशीं लग्न करितां येत नाहीं. मामेबहिणीशीं लग्न करितां येतें. भावाभावांस बहिणीबहिणींशीं लग्न करतां येतें. विधवाविवाहास मोकळीक आहे. अविवाहितास विधवेशीं लग्न करावयाचें असल्यास प्रथम रुईबरोबर लग्न करावें लागतें. सोडचिठ्ठी देतां येते. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रीस विधवाविवाहविधीनें दुसरें लग्न करतां येतें.

गोपाळांचीं कुलदैवतें तुळजापूरची देवी, जेजुरीचा खंडोबा, मरीआई आणि म्हसोबा हीं होत. त्यांचीं लग्नें देशस्थ ब्राह्मण चालवितात. इतर विधि जातींतील जाणते चालवितात. मृतांस पुरतात. त्यांच्या तृप्त्यर्थ दरवर्षी महालय करतात. ते मांस खातात व दारू पितात.

**गोपाळ**—गोल्ल जातीचें दुसरें नांव.

**गोल**—गोल्ल जातीचें दुसरें नांव.

**गोला**—गुजराथेंत आणि काठेवाडांत सर्वत्र आढळतात. ते आपण रजपूत वंशाचे आहों असें सांगतात आणि त्याची खूण म्हणून आपल्या नांवास राणा हा शब्द जोडतात. त्यांच्यांत पुष्कळ आडनांवें आहेत. एकच आडनांव असलेल्या स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. पांचसात पिढ्यांच्या आंत लग्न करतां येत नाहीं. आतेबहीण, मामेबहीण अथवा मावसबहीण इच्याशीं लग्न करतां येत नाहीं. विधवाविवाहास मोकळीक आहे. विधवेस मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न करतां येतें.

गोली विशेषेंकरून खोडियार मातेस भजतात. त्यांचे उपाध्ये औदिच, [illegible]वाल, मेवाडा किंवा श्रीमाळी ब्राह्मण असतात. मृतांस जाळतात. त्यांच्या तृप्त्यर्थ श्राद्धें करितात.

ते मांस खातात व दारू पितात.

ते तांदूळ सडण्याचा धंदा करितात.

**गोला**—खवास जातीचें दुसरें नांव.

**गोल्ल**—ह्यांस गोल किंवा गोपाळ असेंही म्हणतात. ते मुख्यत्वेंकरून कर्नाटकांत आढळतात. ते गाईम्हशींची पैदास करतात व गांवोगांव भटकत राहून त्यांची विक्री करितात. ते औषधेंही विकतात. त्यांचें मूळ स्थान तेलंगण असावें असें दिसतें. अजूनही ते घरांत तेलगू भाषाच बोलतात. सुमारें सव्वाशें वर्षांपूर्वीं तेलंगणांत दुष्काळ पडला असतां पुष्कळ गोल्ल अन्नाच्या शोधार्थ उत्तरेकडे निघून गेले. त्यांतील कांहीं औषधी विकूं लागले. त्यामुळें त्यांची एक स्वतंत्र जातच बनली. त्यांस जरी गोल्ल असेंच नांव आहे तरी गुरांची पैदास्त करणाऱ्या मूळ गोल्लांपासून ते अगदीं भिन्न झाले आहेत. त्यांच्यांत मराठे, वैदू इत्यादि अनेक जातींच्या लोकांचें मिश्रण झालें आहे. त्यांच्यांत ( १ ) अडवी अथवा तेलगू गोल्ल, ( २ ) हनम गोल्ल किंवा भिंगी, ( ३ ) कृष्ण गोल्ल किंवा यादव, ( ४ ) केंगुरी गोल्ल, ( ५ ) पाकनाक गोल्ल आणि ( ६ ) शास्त्र गोल्ल असे पोटभेद आहेत. विधवाविवाहास आणि सोडचिठ्ठीस मोकळीक आहे. ते मुख्यत्वेंकरून हनुमान, हुलगेवा, यल्लम्मा, मरगाई आणि कृष्ण यांस भजतात. त्यांना उपाध्ये नसतात, पण लग्नें चालविण्यास ते ब्राह्मणास बोलावतात. हनम गोल्लांचीं लग्नें त्यांच्या जातीचे गुरूच चालवितात. मृतांस बहुधा पुरण्यांत येतें. मृत्यूच्या तिसऱ्या दिवशीं लिंगायत जंगमाकडून रक्षा आणून ती अंगास चोळून ते शुद्ध होतात.

ते मांस खातात व दारू पितात.

मूळ म्हणजे गुरांची पैदास्त करणाऱ्या गोल्लांमध्यें ( १ ) गोल्ल, ( २ ) हाट गोल्ल, ( ३ ) हाव गोल्ल ( ४ ) काड गोल्ल, ( ५ ) केंपे गोल्ल आणि ( ६ ) उर गोल्ल असे सहा पोटभेद आहेत. त्यांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होत

नाहीं. ते लिंगायत विधि पाळतात आणि मृतांस पुरतात. त्यांचीं मुख्य देवतें शिव, पार्वती आणि काळभैरव हीं होत. त्यांचे उपाध्ये श्री वैष्णव ब्राह्मण अस-तात. त्यांचा धर्मगुरू लिंगायत असून तो म्हैसुरास राहतो.

ते मांस खातात व दारू पितात.

**गोंधळी**—गुजराथ खेरीज करून इलाख्यांतील सर्व भागांत आढळतात. त्यांच्यांत अनेक जातींच्या लोकांचा समावेश होत असून देवांस नवसासाठीं वाहिलेल्या मुलांचा भरणा त्यांत विशेष आहे. जमदग्नि ऋषि व त्याची स्त्री रेणुका यांपासून आपली उत्पत्ति झाली असून आपलें मूळ स्थान निजामाच्या राज्यांत मोहूर आणि तुळजापूर येथें आहे असें ते सांगतात. तीन चारशें वर्षांपूर्वीं आपण महाराष्ट्रांत आलों असें त्यांचें म्हणणें आहे. ते आपणास भवानी देवीचे पुत्र किंवा भक्त म्हणवितात आणि गळ्यांत भवानी कवड्यांची माळ घालतात. ते देवीचे भक्त असल्यामुळें खालच्या वर्गांतील हिंदु त्यांस थोडें बहुत ब्राह्मणाप्रमाणेंच पूज्य मानतात. मराठी राज्यसंस्थापनेच्या आरंभीं गोंधळ्यांचे पोवाडे लोकांस फार आवडत असत आणि ते ऐकून अशिक्षित लोकांस देशाभिमानाची स्फूर्ति उत्पन्न होई. त्या काळीं गोंधळी ज्यांच्या कीर्तीचीं कवनें करून गात आणि ज्यांच्या नांवानें डंका वाजवीत त्यांस लोक अतिशय मान देत असत. हल्लीं ते मुख्यत्त्वेंकरून गोंधळ करून आणि भवानीच्या नांवानें भिक्षा मागून उपजीविका करतात.

गोंधळ्यांत मराठा, कुंभार, कदमराई, रेणुकराई, ब्राह्मण आणि अकरमासे असे सहा पोटभेद आहेत. यांतील शेवटचे पहिल्या पांचही जणांच्या हातचें अन्न खातात. पहिले चार पांचव्याच्या हातचें अन्न खातात; पण एकमेकांच्या हातचें अन्न खात नाहींत. ब्राह्मण शिवाय करून इतरांचे आचारविचार व धर्मविधि मराठा कुणब्यांप्रमाणें आहेत. त्यांचा दर्जा मराठ्यांखालोखाल सम-जला जातो. मराठे त्यांच्या हातचें अन्न खात नाहींत.

**गौड चित्रक**—गुडिगर जातीचें दुसरें नांव.

**घडशी**—महाराष्ट्रांत सर्व ठिकाणीं थोडथोडे आढळतात. ते आपल्या उत्प-त्तीविषयीं अशी कथा सांगतात कीं, रामाचें सीतेबरोबर लग्न होण्याच्या वेळीं

तेथें वाजंत्री नव्हते. तेव्हां रामानें चंदनाचे तीन पुतळे करून त्यांच्यांत प्राण घातले, आणि त्यांपैकीं एकास संबळ, दुसऱ्यास सूर व तिसऱ्यास सणई दिली. हे घडशांचे मूळ पुरुष होत.

घडशांत बारामासे आणि अकरमासे असे दोन पोटभेद आहेत. एकच आडनांव असलेल्या स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. आतेबहिणीशीं व मामेबहिणीशीं लग्न करितां येतें. भावाभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करतां येतें. विधवाविवाहास व सोडचिठ्ठीस मोकळीक आहे. अविवाहितास विधवेशीं लग्न करतां येत नाहीं. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रीस विधवाविवाहविधीनें दुसरें लग्न करतां येतें.

घडशी मुख्यत्वेंकरून खंडोबा, बहिरोबा, व मारुती यांस भजतात. मृतांस जाळतात अथवा पुरतातही. विधवेशीं विवाह केलेल्या पुरुषास पुरलेंच पाहिजे. त्यांचे धर्मविधि बहुतांशीं कुणब्यांप्रमाणेंच असतात.

घडशी वाद्यें वाजविण्याचा धंदा करितात. लग्नसराईंत त्यांना चांगली कमाई होते.

ते मांस खातात व दारू पितात.

**घंटीचोर**—भामटा जातीचें दुसरें नांव.

**घाडी**—फक्त कानडा जिल्ह्यांत आढळतात. ते खेड्यांतून देवांस अर्पण केलेल्या प्राण्यांस मारण्याचा व भविष्य सांगण्याचा धंदा करितात. त्यांच्यांत विधवाविवाह रूढ आहे. पण अविवाहितास विधवेशीं लग्न करतां येत नाहीं. सोडचिठ्ठी देण्यास प्रतिबंध आहे. त्यांचा कुलदेव तिरुपतीचा व्यंकटरमण. त्यांचे उपाध्ये हविक आणि कर्नाटक ब्राह्मण असतात. ज्यांस ऐपत असेल ते मृतांस जाळतात. बाकीचे पुरतात.

ते मांस खातात, पण दारू पीत नाहींत.

**घांच कोतवालिया**–विंटोळिया जातीचें दुसरें नांव.

**घायजो**—पहा–न्हावी.

**घांची**—गुजराथेंत शहरांतून व मोठमोठ्या खेड्यांतून आढळतात. ते आपण उत्तर गुजराथेंतील मोढेरा येथील वाणियांचे वंशज आहों, असें सांग-

तात. ते आपला घाण्यांत तेल काढून विकण्याचा परंपरागत धंदाच मुख्यतः करितात. शिवाय कांहीं धान्याचा व्यापार करितात, फळफळावळ व भाजी विकतात व शेतीही करतात. अहमदाबादी, चांपानेरी, मोध, पाटणी, सिध-पुरिया, आणि सुरती असे सहा पोटभेद त्यांच्यांत आहेत. ते सर्व आपणास मोध घांची असेंच म्हणतात. ते मूळांत एकच होते यांत संशय नाहीं. पण गुजराथेंत एकाच पोटभेदांतील कांहीं लोक दुसऱ्या ठिकाणीं जाऊन स्थायिक झाले म्हणजे त्यांचा एक स्वतंत्र पोटभेदच बनतो असा साधारणतः नियम आहे. त्याप्रमाणें सर्व घांची मूळचे मोध असून त्यांचे पुढें वर सांगितल्याप्रमाणें पोटभेद झाले असावे. वरील सहा पोटभेदांपैकीं मोध आणि सिधपुरिया हे सर्वांत श्रेष्ठ गणले जातात. ह्यांच्या हातचें अन्न बाकीच्या चार पोटभेदांतील लोक खातात, पण हे त्यांच्या हातचें अन्न खात नाहींत. ह्या साही पोटभेदां-तील लोकांचा परस्परांशीं शरीरसंबंध होत नाहीं.

जवळच्या नातलगांत व सात पिढ्यांच्या आंत लग्नें होत नाहींत. लग्नें बहुधा अगदीं लहानपणींच करतात. विधवाविवाहास मोकळीक आहे. विधवेस मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न करतां येतें, मोठ्या भावाशीं करतां येत नाहीं. सोडचिठ्ठीचा फारसा प्रघात नाहीं.

ते स्वामी नारायण, रामानंद वगैरे पंथांचे अनुयायी आहेत. त्यांचे उपाध्ये ब्राह्मण असतात. मृतांचें दहन करतात. ते श्राद्धें करतात.

मोध आणि सिधपुरिया खेरीजकरून बाकी सर्व घांची मांस खातात व दारू पितात.

**घिसाडी**—हे महाराष्ट्रांत आणि कर्नाटकांत सर्व ठिकाणीं थोडथोडे आढ-ळतात. बेळगांव जिल्ह्यांत त्यांस बैलने कुंबार असेंही म्हणतात. ते घरांत अपभ्रष्ट गुजराथी भाषा बोलतात, त्यावरून ते मूळ गुजराथेंतून आले असावे असें दिसतें. ते पावसाळा शिवाय करून बाकीचे आठ महिने गांवोगांव भटकत असतात व पालांतून राहतात.

पितृवंशाकडून चार पिढ्यांच्या आंत व मातृवंशाकडून तीन पिढ्यांच्या आंत शरीरसंबंध होत नाहीं. आतेबहिणीशीं व मामेबहिणीशीं लग्न करतां येत.

मावसबहिणीशीं लग्न करतां येत नाहीं. भावाभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करतां येतें. विधवाविवाहास मोकळीक आहे. अविवाहितास विधवेशीं लग्न करतां येत नाहीं. सोडचिठ्ठी देतां येत नाहीं.

घिसाडी मुख्यत्वेंकरून वारकरी व कबीर पंथाचे अनुयायी आहेत. त्यांचीं कुलदैवतें बहिरी, गिरीचा बालाजी, भवानी, खंडोबा, सटवाई, यमाई, कालम्मा, अंबाई आणि यल्लम्मा हीं आहेत. त्यांचे उपाध्ये स्थानिक ब्राह्मण असतात. विवाहित मृतांस जाळतात, अविवाहितांस पुरतात.

घिसाडी घिसाड काम म्हणजे लोखंडाचे नाल, चमचे, कोयत्या, पळ्या, शेतीचीं आउतें वगैरे जिन्नस करितात.

ते मांस खातात व दारू पितात.

**चमगार**—चांभार जातीचें कानडी नांव.

**चमाडिया**—खाल्पा जातीचें दुसरें नांव.

**चमार**—खाल्पा जातीचें दुसरें नांव.

**चामठा**—मुख्यत्त्वेंकरून काठेवाडांत आढळतात. ते जातीं विकण्याचा धंदा करितात.

**चारण**—गुजराथ, काठेवाड, कच्छ, सिंध आणि राजपुतान्यांत आढळतात. त्यांना कधीं कधीं गढवी असेंही म्हणतात. त्यांच्या उत्पत्तीविषयीं पुढील दंतकथा प्रचलित आहे.

शिव आणि पार्वती आपलीं वाहनें म्हणजे बैल,नाग आणि वाघ यांस बरोबर चरावयास पाठवीत असत. चरत असतां नेहमीं त्यांची मारामारी होऊन ते एकमेकांस ठार मारीत असत. त्यामुळें शिवास नित्य नवीं वाहनें उत्पन्न करावीं लागत व फार त्रास पडून पुष्कळ वेळही व्यर्थ जाई. हें पाहून पार्वतीनें आपल्या घामापासून एक हुशार चारण उत्पन्न केला. त्यानें त्या वाहनांस चारण्याचें काम इतकें उत्तम केलें कीं, शिवानें प्रसन्न होऊन त्याला नागकन्या मिळविण्याची युक्ति सांगितली, व ती त्यानें मिळविल्यानंतर त्याचें तिच्याशीं लग्न केलें. ह्या नागकन्येपासून त्यास नाग आणि तमर असे दोन पुत्र झाले. त्यांपैकीं एकटा नागच पृथ्वीवर राहिला. त्याचे वंशज हेच चारण होत.

## चारण.

चारण शब्दाचा अर्थ चारणारा असा आहे, पण स्तुतिपाठक असाही त्याचा अर्थ कित्येक करतात. चारण हे घेडली कुळांतील एका अविवाहित रजपूत कन्येस झालेल्या मुलाचे वंशज आहेत अशीही एक कथा भाट सांगतात. ह्या रजपूत कन्येनें मुलगा होतांच आपली लज्जा रक्षण करण्याकरतां त्याला गडाच्या ( किल्ल्याच्या ) मागें टाकून दिलें. त्या मुलाचें रक्षण करण्यांत येऊन तो गडामागें सांपडला असल्यामुळें त्याला गढवी हें नांव देण्यांत आलें. पुढें तो मुलगा एका कुंभाराच्या गाढवास चरण्यास नेऊं लागल्यामुळें त्याला लोक चारण असेंही म्हणूं लागले. ह्या कथेंत बरेंच तथ्य आहे. कारण चारण मूळ गाढवांसच चारीत असत. तसेंच गुजराथेंत अजूनही कुंभारांस चारण कुंभार हें जोडनांव लावण्यांत येतें. कुंभारांतील प्रत्येक लग्नावर चारण करही घेत असत. हा कर सिद्धराज जयसिंग ( इ. स. १०९४–११४३ ) यानें उठविला.

चारणांचा मूळ धंदा गुरांची पैदास्त करण्याचा व रजपूत राजांचे स्तुतिपाठ गाण्याचा होता. पुढें भाट जेव्हां रजपूतांचे स्तुतिपाठक बनले तेव्हां ते काठींच्या स्तुतिपाठकांचें काम करूं लागले. कित्येक चारण अजूनही रजपुतांच्या व काठींच्या वंशावळी ठेवतात व त्यांची स्तुति गातात. कांहीं गुरांची पैदास्त करून विक्री करतात, कांहीं बैलांचे तांडे ठेवून गांवोगांव माल वाहून नेतात. कांहीं व्यापार व सावकारी करितात, व कांहीं शेती करितात. कित्येक भिक्षाही मागतात. पूर्वीं ते भाटांप्रमाणें जामीनही राहात व त्रागा करण्याची भीति घालून करार पाळण्यास लावीत. चारण स्त्रियांच्या अंगीं दैवी शक्ति आहे असें समजण्यांत येतें व कच्छमध्यें खालच्या वर्गांतील लोक त्यांस 'माता' ह्या नांवानें संबोधितात. उत्तर गुजराथेंतील अत्यंत लोकप्रिय देवींपैकीं कांहीं देवी, ज्या चारण स्त्रियांनीं आपल्या जातीचे हक्क रक्षण करण्याकरितां आपले प्राण अर्पण केले, त्यांचेच आत्मे होत असें मानण्यांत येतें.

चारणांत गुजर, कच्छेला किंवा पर्जिया, मारू आणि तुंबेल असे चार मुख्य पोटभेद आहेत. ह्यांपैकीं कच्छेला आणि तुंबेल यांचा रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. बाकीच्या विभागांचा परस्पर रोटीव्यवहार होतो, पण बेटीव्यवहार होत नाहीं. त्यांच्यांत अनेक कुळें आहेत. पालनपूर आणि रेवाकांठा शिवाय करून

इतर ठिकाणीं मामेबहिणीशीं, आतेबहिणीशीं अथवा मावसबहिणीशीं लग्न करतां येतें. मुलींचीं लग्नें बहुधा दहा ते वीस वर्षांच्या दरम्यान करितात. रेवाकांठा आणि पंचमहाल शिवायकरून इतर ठिकाणीं विधवाविवाहास मोकळीक आहे. विधवेस मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न करतां येतें. सोडचिठ्ठीच्या बाबतींत निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळा प्रघात आहे. उत्तर गुजराथेंत नवऱ्यास अथवा बायकोस कोणासच काडी मोडून देतां येत नाहीं. मध्यगुजराथेंतील कांहीं भागांत नवऱ्यास बायकोस काडी मोडून देतां येते, आणि कच्छ काठेवाडांत प्रत्येकास दुसऱ्यास काडी मोडून देतां येते.

चारण लोक नेहमीं जानवीं घालतातच असा नियम नाहीं. ते अनेक पंथांचे अनुयायी असून मुख्यत्त्वेंकरून अंबाभवानीस भजतात. त्यांचे उपाध्ये मेवाडा, पंजिया, राजगोर, सारस्वत आणि श्रीगौड ब्राह्मण असतात. ते मृतांस जाळतात व श्राद्धें करतात. ते मत्स्य व मांस खातात.

**चांभार**—गुजराथ शिवायकरून इलाख्यांतील सर्व भागांत आढळतात. गुजराथेंत या जातीसमान जी जात आहे तिला मोची किंवा चमार म्हणतात. चांभारांस कानडा जिल्ह्यांत चमगार आणि कर्नाटकांत समगार असेंही म्हणतात. चांभार हा शब्द जातिदर्शक असून शिवाय त्याचा अर्थ चामड्याचें काम करणारा असाही असल्यामुळें, हें काम करणाऱ्या इतर जातींसही तो लावण्यांत येतो. चांभारांची अस्पृश्यांत गणना होते व महारांप्रमाणें त्यांनाही गांवाच्या सीमेबाहेर राहावें लागतें. वैदिक काळीं आणि बुद्धाच्या पूर्व काळीं चामड्याचें काम करण्याचा धंदा हलका मानला जात नसे. यजुर्वेदाच्या वाजसनेय संहितेच्या पुरुषमेध नांवाच्या भागांत चर्मम्ण ( चांभार ) योग्य बळी आहे असें सांगितलें आहे. पाली जातकांत ज्याच्याशीं राजे संबंध ठेवित असत अशा अठरा व्यापाऱ्यांच्या संघांचा उल्लेख आहे. ह्यांपैकीं एक संघ चम्मकारांचा ( चांभारांचा ) होता. ही गोष्ट, तसेंच साधारणतः चांभार सुरेख असतात, आणि त्यांच्या स्त्रियांची ( विशेषतः कानडा जिल्ह्यांतील स्त्रियांची ) सौंदर्याविषयीं ख्याति आहे, ह्या गोष्टीवरून त्यांच्यांत आर्यांचें थोडें तरी रक्त असावें असें जें कित्येकांचें म्हणणें आहे त्यास बळकटी येते.

उलट पक्षीं त्यांच्यांत आढळून येणारे देवकांचे अवशेष व त्यांनीं पतकरलेला नीच धंदा यांवरून ते येथील मूळचे रहिवासी असावे असें दिसतें. निदान इतकें तरी दिसतें कीं, आर्य लोक पूर्वी चामड्याचें काम करीत असत. पुढें चामड्याच्या स्पर्शानें विटाळ होतो हें मत जेव्हां स्वीकारण्यांत आलें आणि चामड्याच्या धंद्यास हीन स्वरूप प्राप्त झालें, तेव्हां जे आर्य हा धंदा करीत असत त्यांस समाजबहिष्कृत करण्यांत येऊन ते ह्या मूळच्या रहिवाशांत सामील झाले असावे.

चांभारांत भाषाभिन्नत्वामुळें झालेले मराठा आणि कानडी असे दोन पोटभेद आहेत.

मराठा चांभारांत चेवली, दाभोळी, घाटी, कोंकणी इत्यादि प्रांतिक स्वरूपाचे पोटभेद आहेत. खानदेशांत अहिर नांवाचा एक पोटभेद असून बाकीच्यांस हरळी चांभार असें म्हणतात. कोल्हापुरांत चामड्याच्या कामाच्या दोन प्रकारांवरून दोन पोटभेद झालेले आढळतात. त्यांच्यांत आडनांवानें दर्शविलीं जाणारीं अनेक कुळें आहेत. त्यांशिवाय त्यांच्यांत देवकेंही आहेत. त्यांपैकीं कांहीं खालीलप्रमाणें आहेतः—

| कुळाचें नांव | गोत्राचें नांव |
|---|---|
| अहिरराव ... ... ... | नीम |
| अरखे ... ... ... | हरियाळी |
| बमणे ... ... ... | पांचपालवी |
| भोंसले ... ... ... | राजहंसाचा पंख |
| दोईफोडे ... ... ... | पांचपालवी |
| करंडे ... ... ... | ,, |
| पवार ... ... ... | ,, |
| शेळके ... ... ... | वड |
| शिंदे ... ... ... | मर्यादवेल |
| वसाईत ... ... ... | वासनवेल |

रत्नागिरी जिल्ह्यांतील चांभारांचीं देवकें उंबर, कळंब, मोराचें पीस, गरुडाचा पंख आणि कोया ( एक पक्षी ) हीं आहेत.

ज्यांचें कूळ व देवक एकच असतें त्यांच्यांत शरीरसंबंध होत नाहीं. मामेबहिणीबरोबर लग्न करतां येतें, मावसबहिणीबरोबर करतां येत नाहीं. भावाभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करतां येतें. लग्नें अगदीं लहानपणींच करितात. विधवाविवाहास आणि सोडचिठ्ठीस मोकळीक आहे. अविवाहितास विधवेशीं लग्न करावयाचें असल्यास प्रथम शमीबरोबर लग्न करावें लागतें.

मराठा चांभार मुख्यत्त्वेंकरून बहिरोबा, जनाई, जोखाई आणि जखाई यांस भजतात. त्यांचे उपाध्ये ब्राह्मण असतात. ठाणें आणि अहमदनगर जिल्ह्यांत त्यांचे अंत्यविधि अनुक्रमें कुंभार आणि जंगम चालवितात. मृतांस जाळण्यांत अगर पुरण्यांतही येतें.

ते मांस खातात, व दारू पितात.

कानडी चांभारांत स्थानिक स्वरूपाचीं आठ कुळें आहेत. मामेबहिणीशीं व आतेबहिणीशीं लग्न करतां येतें. मुलींचीं लग्नें वयांत येण्यापूर्वी करितात. मुलांचीं लग्नें वीस ते पंचवीस वर्षांपर्यंत करितात. लग्न करण्यापूर्वी मुलगी वयांत आल्यास तिच्या बापास कन्यादान करतां येत नाहीं. अशा प्रसंगीं कन्यादानाचा विधि मुलीचा एखादा जवळचा नातलग करितो. विधवाविवाहास मोकळीक आहे. कानडा जिल्हा शिवायकरून इतर ठिकाणीं सोडचिठ्ठी देण्यास हरकत नाहीं.

कानडी चांभार स्मार्तसांप्रदायी आहेत. त्यांचे उपाध्ये कऱ्हाडे किंवा हविक ब्राह्मण असतात. त्यांस ते लग्नें चालविण्यास बोलावतात. कर्नाटकांत अंत्यविधि जंगमांकडून चालविला जातो. मृतांस पुरतात. ते महालय करतात, श्राद्ध करीत नाहींत.

ते मांस खातात व दारू पितात.

**चितार**—गुडिगर जातीचें दुसरें नांव.

**चित्रक**—गुडिगर जातीचें दुसरें नांव.

**चित्रकथी**—मुख्यत्वेंकरून नाशिक जिल्ह्यांत आढळतात. ते आपली उत्पत्ति मराठ्यांपासून झाली आहे असें सांगतात. देवादिकांचीं चित्रें दाखवीत आणि त्यांच्या कथा सांगत ते गांवोगांव भटकत असतात. त्यांच्यांत आडनांवानें दर्शविलीं जाणारीं कुळें व देवकेंही आहेत. मुख्य देवकें पुढें दिल्याप्रमाणें आहेत.

| कुळाचें नांव | देवकाचें नांव |
|---|---|
| ठोंबरे ... ... ... | शमी |
| इंगळे ... ... ... | कोहाळा |
| जाधव ... ... ... | पालाचें कणीस |
| मोरे ... ... ... | मोराचा पंख |
| साळुंखे ... ... ... | साळुंकीचा पंख |
| पोवार ... ... ... | सुरी |
| आंबले ... ... ... | आंबा |
| सुपळकर ... ... ... | पांचपालवी |

कूळ व देवक एकच असलें तर शरीरसंबंध होत नाहीं. आतेबहिणीशीं व मावसबहिणीशीं लग्न करतां येत नाहीं, मामेबहिणीशीं करतां येतें. भावाभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करतां येतें. लग्नें अगदीं लहानपणापासून तों वयांत आल्यानंतरही करतात. विधवाविवाहास मोकळीक आहे. अविवाहितास विधवेशीं लग्न करतां येत नाहीं. नवऱ्याचें बायकोशीं पटत नसेल किंवा ती दुराचारी असेल, तर त्यास तिला सोडचिठ्ठी देतां येते. दुराचारी स्त्रियांस जातीबाहेर घालविण्यांत येतें. इतरांस विधवाविवाहविधीनें दुसरें लग्न करतां येतें.

चित्रकथींचीं कुलदैवतें तुळजापूरची भवानी, जेजुरी आणि पालीचा खंडोबा, रत्नागिरीचा जोतिबा आणि कोल्हापूरची लक्ष्मी हीं आहेत. त्यांचे उपाध्ये ब्राह्मण असतात.

ते मांस खातात व दारू पितात.

**चुनार**—पहा–गवंडी.

**चोखामेळा**—महार जातीचें दुसरें नांव.

**चोध्रा**—मुख्यत्वेंकरून सुरत जिल्ह्यांत आढळतात. त्यांचा परंपरागत धंदा शेती करण्याचा आहे. ते लांकडेंही तोडतात. त्यांच्यांत भरूतिया, चंताला, चोखापूर, तकारिया, वलवाई, संतला, मोटा, नाना आणि बोडा, असे नऊ पोटभेद आहेत. ह्यांपैकीं चोखापुरांचा दर्जा सर्वांत श्रेष्ठ आहे. त्यांस पावागडिया असेंही म्हणतात. यावरून पूर्वीं त्यांचा पावागड टेकडीशीं कांहींतरी संबंध असावा असें दिसतें. इतर पोटभेदांतील लोक यांच्या हातचें अन्न खातात, पण हे त्यांच्या हातचें अन्न खात नाहींत. ज्यांच्यामध्यें पूर्वीचें कांहीं नातें आढळण्यांत येत नाहीं त्यांच्यांत शरीरसंबंध होतो. लग्नें बहुधा वयांत आल्यावर करितात. लग्न नवऱ्याची बहीण ( ही सुवासिनी असली पाहिजे ) चालविते. त्याला बहीण नसल्यास त्याची चुलत बहीण चालविते. ज्यांना लग्नाचा खर्च करण्याची ऐपत नसते ते खंडाळिया पद्धतीनें विवाह करितात. ह्या पद्धतीनें लग्न करणारास कांहीं ठराविक मुदतीपर्यंत मुलीच्या बापाच्या घरीं नोकरी करावी लागते. विधवाविवाहास मोकळीक आहे. विधवेस मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न करतां येतें. सोडचिठ्ठी देतां येते.

चोध्रा मुख्यत्वेंकरून सुरज म्हणजे सूर्य, धरतीमाता म्हणजे पृथ्वी, काकाबलियो, भवानी आणि पलियो यांस,व सीमारियो आणि नादेरियो ह्या सीमेवरील देवतांस भजतात. त्यांचे धर्मविधि जातींतील जाणते चालवितात. मृतांस जाळतात अथवा पुरतात. त्यांच्या तृप्त्यर्थ कोणतेच विधि करण्यांत येत नाहींत. ते मांस खातात व दारू पितात. ते कोळी, कणबी इत्यादि वरच्या जातीच्या लोकांस आपल्या जातींत घेतात.

**छत्री**–किलिकेट जातीचें दुसरें नांव.

**छप्परबंद**—ह्यांची संख्या अगदीं लहान असून ते फक्त पुणें आणि सातारा येथें आढळतात. ते उत्तर हिंदुस्थानांतून आले असावे असें दिसतें. ते छप्परें बांधण्याचा धंदा करतात. ते खोटीं नाणीं पाडीत असल्यामुळें त्यांची गणना गुन्हेगार जातींत करण्यांत आली आहे.

**छाडिया**—खाल्पा जातीचें दुसरें नांव.

**छापगार**—भावसार जातीचें दुसरें नांव.

**छीपा**—भावसार जातीचें दुसरें नांव.

**छेत्री**—खेत्री जातीचें दुसरें नांव.

**जलगार**—झारेकरी जातीचें दुसरें नांव.

**जाड**—कब्बलिगर आणि देवांग या जातींचें दुसरें नांव.

**जिनगर**—महाराष्ट्रांत सर्व ठिकाणीं आढळतात. त्यांस दलसिंगर, दिग-वान आणि कारंजकर असेंही म्हणतात. जिनगर हा शब्द जीन ह्या फारसी शब्दावरून निघाला आहे. ह्या जातीचा परंपरागत धंदा जिनें करण्याचाच असल्यामुळें जिनगर हें त्यांचें नांव यथार्थ आहे. जिनें करणारांस इतर जातीचे लोक करीत असलेले अनेक प्रकारचें काम करावें लागत असल्यामुळें जिनगरांस जाड (कोष्टी), लोहार, ओतारी, सोनार, तारकर, चितारी, इत्यादि नांवांनींही संबोधण्यांत येतें. परंतु ह्या नांवांनीं निदर्शित केलेल्या जातींचा आणि त्यांचा कोणत्याच प्रकारचा संबंध नाहीं. कारंजकर म्हणजे कारंजीं करणारे. पूर्वीं जेव्हां बागांतून कारंजीं करण्याची वहिवाट होती, त्या वेळीं ह्या लोकांची योजना त्या कामावर करण्यांत येत असल्यामुळें त्यांस हें नांव पडलें असावें. ह्या जातीस जरी इतकीं नांवें आहेत तरी ते खुद्द आपणांस आर्य सोमवंशी क्षत्रिय असें म्हणतात. त्यांच्या रूपावरून पाहिल्यास ते उच्च वर्णाचे असावे असें दिसतें, आणि पूर्वीं लढाईच्या काळांत जिनांची जरूर लोकांस फार लागत असल्यामुळें ह्या जातीस बरेंच महत्त्व प्राप्त झालें असावें. त्यांचा जिनें कर-ण्याचा धंदा जसजसा बसत चालला, तसतसे ते लांकडाचीं खेळणीं आणि अस-लींच दुसरीं कामें करूं लागले आणि त्यामुळें त्यांची आर्थिक स्थिति दिवसें-दिवस खालावत जाऊन त्यांचें समाजांतील महत्त्व बरेंच कमी झालें. तें इतकें कीं, हल्लीं स्थानिक न्हावी त्यांस अस्पृश्य समजून त्यांची स्मश्रूही करीत नाहींत. कांहीं वर्षांपूर्वीं पुण्यांतील जिनगरांनीं ह्या त्यांच्या वागण्यामुळें आपली बदनामी होते अशी कोर्टांत फिर्यादही केली होती, पण ती काढून टाकण्यांत आली.

जिनगरांस अस्पृश्य समजण्यांत येण्याचें कारण हल्लीं जिनें करतांना त्यांस कातड्याचें काम करावें लागतें हें असावें. पूर्वींच्या जिनांस कातडीं लागत नसत.

जिनगरांत जिनगर, चितार आणि कडू असे तीन पोटभेद आहेत. यांपैकीं पहिल्या दोन पोटभेदांत रोटीबेटीव्यवहार होतो. कडूंत जातीचे नियम मोडणारांचा समावेश होतो. जिनगर आणि चितार त्यांच्याशीं रोटीव्यवहारही करीत नाहींत.

जिनगरांत दहा गोत्रें आहेत. पण लग्नें मात्र समान आडनांवाच्या लोकांच होत नाहींत. यावरून त्यांनीं आपलें क्षत्रियत्व स्थापित करण्याकरितां गोत्रें मागाहून घेतलीं असावीं असें दिसतें. आतेबहिणीशीं अथवा मावसबहिणीशीं लग्न करतां येत नाहीं. मामेबहिणीशीं लग्न करतां येतें. भावाभावांस बहिणी-बहिणींबरोबर लग्न करतां येतें. मुलींचीं लग्नें बहुधा बारा वर्षांपर्यंत करितात, मुलांचीं तीस वर्षांपर्यंत करितात. महाराष्ट्रांतील जिनगरांत विधवाविवाह रूढ आहे, पण कर्नाटकांत त्यास प्रतिबंध आहे. अविवाहितास विधवेशीं लग्न करावयाचें असल्यास प्रथम शमीबरोबर लग्न करावें लागतें. बायको दुराचारी असल्यास अथवा तिच्याशीं पटत नसल्यास नवऱ्यास तिला काडी मोडून देतां येते. नवऱ्याशीं पटत नसल्यामुळें काडी मोडून दिलेल्या स्त्रीस विधवाविवाह-विधीनें दुसरें लग्न करतां येतें.

जिनगर लोक सर्व हिंदु देवतांस भजतात. ते जानवीं घालतात. त्यांचे उपाध्ये ब्राह्मण असतात. मृतांस जाळतात. त्यांच्या तृप्त्यर्थ श्राद्धें व महालय करतात.

जिनगर लोक अनेक प्रकारचीं कसबाचीं कामें करितात. ते वीणा, सारंगी वगैरे वाद्येंही करितात. लांकडाचीं रंगीत खेळणीं व फळें करण्याच्या कामा-बद्दल त्यांची फार प्रसिद्धि आहे.

ते मांस खातात व दारू पितात. ते फक्त ब्राह्मणांच्याच हातचें अन्न खातात. त्यांच्या हातचें अन्न कोणत्याही जातीचे लोक खात नाहींत.

**जैन जाती**—जैनांची वस्ती मुख्यत्त्वेंकरून गुजराथ, काठेवाड व कच्छ, तसेंच दक्षिण महाराष्ट्राचा दक्षिण भाग व कर्नाटक प्रांतांत आहे. त्यांचे गुज-राथी जैन व महाराष्ट्रीय जैन असे प्रादेशिक स्वरूपाचे दोन विभाग आहेत. त्यांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. ह्या दोन्ही विभागांच्या धर्मांचीं मुख्य तत्त्वें जरी तींच आहेत तरी त्यांच्या चालीरीतींत बराच फरक आहे.

जैन धर्म जातिभेदास प्रतिकूल नाहीं. त्यामुळें पुष्कळ हिंदु जातींत जैनधर्मीय पोटभेदही आढळतात. गुजराथेंतील कांहीं वाणी शिवाय करून जैन आणि हिंदु पोटभेदांत बेटीव्यवहार होत नाहीं.

ज्या जातींत जैनधर्मीय पोटभेद आहेत त्यांतील मुख्य जाती येणेंप्रमाणें:--

## गुजराथ

( १ ) अगवील वाणी, ( २ ) भवसार किंवा छीपा, ( ३ ) भाटिया, (४) भोजक, ( ५ ) चतुर्थ, ( ६ ) खत्री, ( ७ ) देशावाल वाणी, ( ८ ) गंधी, ( ९ ) गुर्जर वाणी, ( १० ) हलवाई किंवा कंडोई, ( ११ ) हरदास, ( १२ ) हुंबड किंवा उंबड वाणी, ( १३ ) जती, ( १४ ) कासार, कंसार, बोगार किंवा बलिगार, ( १५ ) खदायता वाणी, ( १६ ) कुंभार, ( १७ ) कुणबी, ( १८ ) लाड वाणी, ( १९ ) लोहाणा, ( २० ) मारवाडी किंवा ओस्वाल वाणी, ( २१ ) मेवाडा वाणी, ( २२ ) मोध वाणी, (२३) नर्सिंगपुरी वाणी, ( २४ ) निमा किंवा नेमा वाणी, ( २५ ) पांचाळ, ( २३ ) पोर्वाड किंवा पोर्वाल वाणी, ( २७ ) सेवक, ( २८ ) शेतवाल, ( २९ ) श्रीमाळी वाणी, ( ३० ) सोनी, ( ३१ ) सोरठिया वाणी.

## महाराष्ट्र

( १ ) चतुर्थ, ( २ ) कासार बोगार किंवा बलिगार, ( ३ ) पंचम, ( ४ ) शेतवाल, ( ५ ) उपाध्या.

गुजराथेंतील जैनांच्या मुख्य जातींची माहिती पुढें " वाणी " ह्या सदराखालीं दिली आहे. महाराष्ट्रीय जैनांतील उपाध्या ही तेथील जैनांच्या पुरोहितांची जात असून ते महाराष्ट्रीय जैनांच्या इतर सर्व जातींतील मुलींबरोबर लग्न करितात, पण आपल्या मुली त्यांस देत नाहींत. चतुर्थ म्हणजे ' चौथे ' हे शेती करितात. पंचम म्हणजे ' पांचवे ' व्यापार करितात.

जैन हें नांव 'जिन' म्हणजे 'जेता' या शब्दावरून पडलेलें आहे. ऋषभापासून महावीरापर्यंत एकंदर चोवीस जिन होऊन गेले. त्यांना तीर्थंकर असेंही म्हणतात.

जैनांतील सोळा संस्कार जवळ जवळ ब्राह्मणांतील सोळा संस्कारांप्रमाणेंच आहेत. पैकीं मौंजीबंधन, विवाह, गर्भादान आणि अंत्येष्टि एवढे चारच संस्कार ते पाळतात. त्यांचे मंत्र वैदिक नसले तरी त्यांत आणि ब्राह्मणांच्या संस्कारांत फारसा भेद नाहीं.

मौंजीबंधन आठ ते सोळा वर्षांच्या दरम्यान करितात. मुलांचीं लग्नें बहुधा पंधरा ते पंचवीस व मुलींचीं त्या वयांत येण्यापूर्वीं करितात. विधवाविवाह जरी जैनशास्त्रसंमत नाहीं, तरी उपाध्यांशिवाय इतर सर्व जैनांत तो रूढ आहे. ही चाल दोन अडीचशें वर्षांपूर्वीं प्रचारांत आली असें ते सांगतात. नवराबायकोचें पटत नसल्यास बायकोस नवऱ्यापासून वेगळें राहतां येतें, पण तो जिवंत असेपर्यंत दुसरें लग्न करतां येत नाहीं.

जैन वेदांस मानीत नाहींत. तसेंच ते ईश्वराचें अस्तित्वही मानीत नाहींत. ते मंदिरांत तीर्थंकरांच्या मूर्तींची स्थापना करून त्यांची पूजा करितात. घरीं ते देवतांच्या मूर्तींची पूजा करितात. महाराष्ट्रांतील बहुतेक जैन दिगंबर पंथाचे आहेत.

महाराष्ट्रांतील जैनांतील बहुजनसमुदाय शेतीचा व्यवसाय करितो. कांहीं मोठे जमीनदार मात्र नोकर ठेवून त्यांजकडून शेती करवितात. इतर जमीनदार आपल्या बायकांच्या मदतीनें शेतांतील सर्व काम स्वतांच करितात. कोल्हापूर, मिरज वगैरे मोठ्या शहरांतील जैन जवाहिर, कापूस, कापड, धान्य इत्यादि जिनसांचा व्यापार करितात. कांहीं जैन भिक्षा मागून उदरनिर्वाह करितात. पण जर कोणी जैन परधर्मीयाकडे भिक्षा मागील, तर त्यास जातीबाहेर घालविण्यांत येतें.

जैन शुद्ध शाकाहारी आहेत. ते दारू पीत नाहींत.

**जोगतीण** आणि **जोगती**—मुख्यत्त्वेंकरून पुणें आणि सातारा येथें आढळतात. जोगतीण म्हणजे यल्लम्मा देवीस अर्पण केलेली मुलगी आणि जोगती म्हणजे त्याच देवीस अर्पण केलेला मुलगा. जोगती आपल्या मूळ जातीचे रीतरिवाज पाळतात व मूळ जातींतील मुलींशीं लग्न करतात. जोगतिणीस लग्न करतां येत नाहीं. त्या देवीच्या नांवानें भिक्षा मागून उदरनिर्वाह करितात.

**जोगी**—सर्व इलाख्याभर थोडथोडे आढळतात. हा पंथ गोरखनाथानें स्थापिलेला आहे. ह्या पंथांतील लोकांस ते आपल्या कानांच्या पाळ[illegible] मोठीं भोकें पाडीत असल्यामुळें, कानफाटे असेंही म्हणतात. त्यांना नाथ असेंही संबोधण्यांत येतें.

जोग्यांत गुजराथी जोगी आणि मराठा जोगी असे प्रांतिक स्वरूपाचे दोन पोटभेद आहेत. मराठा जोग्यांत कानडी जोग्यांचाही समावेश होतो. गुजराथी जोगी हे केवळ पंथानुयायी आहेत, त्यांची स्वतंत्र जात नाहीं. मराठा जोग्यांत पंथानुयायी आणि संसारी असे दोन भेद आहेत. पंथानुयायी भिक्षा वृत्तीनें राहतात. संसारी जोगी भिक्षा मागतात, शेती करतात, मजुरी करतात, म्हशींची आणि कुत्र्यांची पैदास्त करतात, आणि दगडया करून विकतात. त्यांच्यांत अरे, बलगार, बेरक, भोरपी, डोंबारी, दवरजी, जोगार, केर, किनरी, कुरूब, मेंदर आणि मुराद असे बारा पोटभेद आहेत. गोरखनाथाच्या बारा शिष्यांनीं स्थापिलेल्या बारा पंथांवरून त्यांच्यांत बारा कुळें झालेलीं आहेत. एकाच कुळांतील स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. मुलगा बारा वर्षांचा झाला म्हणजे त्याला त्याच्या पंथाची दीक्षा देण्यांत येते. त्यांचे इतर आचारविचार आजूबाजूच्या शेती करणाऱ्या जातींप्रमाणें असतात.

**जोशी**—मुख्यत्वेंकरून महाराष्ट्रांत व कर्नाटकांत आढळतात. त्यांस पिंगळे, बुडबुडकी, गिडबिडकी, कुडबुडे, डोशगर आणि डवरी असेंही म्हणतात. जोशी म्हणजे ज्योतिषी. हे लोक ज्योतिष सांगत असल्यामुळें त्यांस हें नांव पडलेलें आहे. सकाळीं ते पिंगळ्याचा शब्द ऐकून त्यावरून पुढें ज्योतिष सांगतात म्हणून त्यांस पिंगळे म्हणतात. इतर नांवें ते वाजवीत असलेल्या वाद्यांवरून त्यांस पडलेलीं आहेत.

जोशांत अकरमासे म्हणून एक पोटभेद आहे. त्यांच्याशीं इतर जोशी अन्नव्यवहार करतात, पण शरीरसंबंध करीत नाहींत. त्यांच्या चालीरीति मराठा कुणब्यांप्रमाणें असतात. ते भिक्षा मागत व ज्योतिष सांगत गांवोगांव भटकत असतात.

**जोहारी**—मुख्यत्त्वेंकरून दक्षिण महाराष्ट्रांत आढळतात. त्यांच्यांत बारामासे, अकरमासे आणि दहामासे असे तीन पोटभेद आहेत. पहिले सर्वांत श्रेष्ठ, दुसरे त्याहून कमी दर्जाचे व तिसरे सर्वांत कनिष्ठ असें समजण्यांत येतें. दुसऱ्या व तिसऱ्या पोटभेदांत [illegible]तील लोकांच्या अनौरस संततीचा व इतर जातींतून जातींत सामील केलेल्या [illegible]ांचा समावेश होतो.

ह्या जातींत अनेक कुळें आहेत. एकाच कुळांतील स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. आतेबहिणीशीं व मामेबहिणीशीं लग्न करतां येतें. भावाभावांस बहिणीबहिणींशीं लग्न करतां येतें. विधवाविवाहास मोकळीक आहे. अविवाहितास विधवेशीं लग्न लावतां येत नाहीं. सोडचिठ्ठी देतां येते. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रीस पाटाच्या विधीनें दुसरें लग्न करतां येतें.

जोहारी सर्व हिंदु देवतांस भजतात. त्यांचे उपाध्ये कनोजा किंवा देशस्थ ब्राह्मण असतात.

जोहारी लोक कांचेचे मणी विकतात. ते चांदीसोन्याचा जुना जर विकत घेऊन तो जाळून त्यांतून चांदीसोनें काढतात. त्यांच्या बायकांचीं लहान लहान दुकानें असतात. त्यांत त्या लांकडाच्या व टिनच्या पेट्या, फण्या, गोट्या, आरसे, भोंवरे, बाहुल्या वगैरे जिन्नस विकतात.

ते मांस खातात व दारू पितात.

**जंफोडा**—भंगी जातीचें दुसरें नांव.

**ज्यू**—बेने इस्राएलांचें दुसरें नांव.

**झारेकरी**—महाराष्ट्रांतील कांहीं भागांत आणि गुजराथेंत आढळतात. गुजराथेंत त्यांना धूळधोया आणि जलगार असेंही म्हणतात. ते सोनारांच्या भट्टींतील राख विकत घेऊन, धुवून स्वच्छ करून,त्यांतून सोन्याचे कण काढतात.

**टकारी**—मुख्यत्त्वेंकरून खानदेश, नाशिक, सोलापूर आणि अहमदनगर जिल्ह्यांत आढळतात. त्यांना वाघ्री आणि पारधी असेंही म्हणतात. ते घर तेलगू भाषा बोलत असल्यामुळें तेलंगणांतून आले असावे असें दिसतें. कित्येक लोक ते भामट्यांची एक शाखा आहे असें मानतात. ते आपल्याहून श्रेष्ठ जातींच्या लोकांस आपल्या जातींत घेतात.

खानदेशांतील टकाऱ्यांत घाटोळे म्हणून एक पोटभेद आहे. खानदेशांतील टकारी महाराष्ट्रांतील इतर भागांतील टकाऱ्यांच्या मुली करतात, पण आपल्या मुली त्यांस देत नाहींत. त्यांच्यांत सहा कुळें आहेत. कूळ अथवा देवी एकच असल्यास शरीरसंबंध होत नाहीं. मामेबहिणीशीं लग्न करतां येतें; आतेबहिणीशीं व मावसबहिणीशीं करतां येत नाहीं. भावाभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करतां येतें. विधवाविवाहास मोकळीक आहे. विधवेनें मृत पतीच्या वडील अगर धाकट्या भावाशींच लग्न केलें पाहिजे. असा भाऊ नसल्यास तिनें दुसऱ्या कोणाबरोबर लग्न करण्यास हरकत नाहीं. अविवाहितास विधवेशीं लग्न करावयाचें असल्यास प्रथम त्याचें रुईशीं लग्न लावतात. सोडचिठ्ठी देतां येते. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रीस विधवाविवाहविधीनें लग्न करतां येतें.

टकारी मुख्यत्त्वेंकरून खंडोबा, देवी, इत्यादि गौण देवतांस भजतात. ते लग्नें चालविण्यास ब्राह्मणांस बोलावतात. त्यांचे इतर विधि जातींतील जाणते चालवितात. मृतांस बहुधा पुरण्यांत येतें.

ह्या जातीचे लोक जात्यांस टांकी लावण्याचा धंदा करितात. कांहीं मजुरी करितात व कांहीं शेतीही करितात.

ते मांस खातात व दारू पितात.

**टकारी**—भामटा जातीचें दुसरें नांव.

**ठक्कर**—भाटिया जातीचें दुसरें नांव.

**ठाकर**—रत्नागिरी जिल्ह्यांत आणि सावंतवाडी संस्थानांत आढळतात. त्यांना बागडे ठाकर असेंही म्हणतात. कोल्हापूर संस्थानांत बागडे म्हणून एक जात आढळते. त्यांचा व ठाकरांचा कांहींतरी संबंध असावा असें दिसतें. कारण मासे मारणें, विणणें आणि घोंगड्या दुरुस्त करणें हे धंदे दोन्ही जातींचे लोक करतात. ह्याशिवाय ठाकरांचा मुख्य धंदा म्हटला म्हणजे रात्रीं, विशेषतः देवळांत, बाहुल्यांचा खेळ दाखविणें हा होय. ते कानडा आणि बेळगांव जिल्ह्यापर्यंत हे खेळ करून दाखवीत भिक्षा मागत फिरत असतात. कांहीं नंदीवाल्यांप्रमाणें बैलांचे खेळ करून दाखवितात व कांहीं गोंधळ्याप्रमाणें पोवाडे म्हणून नाचतात. कांहीं गंगावनें करून विकतात.

ठाकरांत पुष्कळ कुळें आहेत. त्यांच्यांत देवकेंही आहेत. कांहीं ठिकाणीं एकाच कुळांत लग्न होत नाहीं, तर कांहीं ठिकाणीं एकच देवक असलेल्या कुटुंबांत शरीरसंबंध होत नाहीं. त्यांच्यांत कळंब, उंबर, सावरी, वड आणि सूर्यकांताचें फूल इतकीं देवकें [illegible] त्याचें तूर्त आढळून आलें आहे. आतेबहिणीबरोबर व मावसबहिणीबरोबर लग्न करतां येत नाहीं. मामेबहिणीबरोबर लग्न करतां येतें. भावाभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करतां येतें. विधवा-विवाहास मोकळीक आहे. नवऱ्यास बायकोस काडी मोडून देतां येते. काडी मोडून देणाऱ्या पुरुषास जातीस जेवण अथवा आपल्या शक्तीप्रमाणें आठ आणे अथवा त्याहून जास्त पैसे द्यावे लागतात. काडी मोडून देण्याचें कारण व्यभिचार नसल्यास काडी मोडून दिलेल्या स्त्रीस पाटाच्या विधीनें दुसरें लग्न करतां येतें.

ठाकरांच्या कुलदेवता केशरलिंग, भवानी, रसये, खंडोबा, सिदोबा इत्यादि आहेत. प्रत्येक कुटुंबांत कुटुंबाच्या मूळ पुरुषाच्या नांवानें एक नारळ ठेवलेला असतो. त्यास तळखांबा असें म्हणतात. तळखांब्याची रोज पूजा करितात. दर वर्षी तळखांब्याचा जुना नारळ काढून घेऊन त्या जागीं नवा नारळ ठेवतात. ठाकरांचे उपाध्ये ब्राह्मण असतात. मृतांस ऐपतीप्रमाणें जाळण्यांत अगर पुरण्यांत येतें. ते श्राद्धपक्ष करतात.

ते मांस खातात व दारू पितात.

**ठाकूर**—मुख्यत्त्वेंकरून ठाणें, कुलाबा व नाशिक जिल्ह्यांत आढळतात. छोट्या रजपूत राजांस ठाकूर किंवा ठाकोर ही पदवी लावीत असल्यामुळें ठाकुरांत रजपुतांच्या रक्ताची भेसळ असावी असें कित्येकांचें म्हणणें आहे. इगतपुरी येथील एका ठाकुराजवळ असलेल्या ताम्रपटांत ठाकूर नांवाच्या जातीचा उल्लेख असल्यामुळें ह्या म्हणण्यास बळकटी येते. गुजराथेंतून जे रज-पूत दक्षिणेकडे पळून आले त्यांपैकीं कांहींची त्यांच्यांत भेसळ झाली असावी असें म्हणतात.

ठाकूर हे येथील मूळ रहिवाशांपैकीं असून ते शेती व मजुरी करून पोट भरतात. ते बहुतेक शेती हातानें व कुदळीनेंच करतात. ते जळाऊ लांकडेंही

गोळा करून विकतात. त्यांच्या उपजीविकेस पुरण्याइतकें अन्न त्यांस न मिळाल्यास ते जंगली भाज्या, मुळें व वनस्पति खातात.

ठाकुरांत क ठाकूर आणि म ठाकूर असे दोन पोटभेद आहेत. त्यांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. म ठा[illegible] क ठाकुरांपेक्षां श्रेष्ठ समजण्यांत येतें. त्यांच्यांत अनेक कुळें आहे[illegible] त्यांच्यांत सूर्यफूल, तरवार, आंबा, उंबर, साग, जांभूळ इत्यादि देवकें आहेत. मामेबहिणीबरोबर लग्न लावितां येतें. आतेबहिणीबरोबर अथवा मावसबहिणीबरोबर लग्न करतां येत नाहीं. भावाभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करतां येतें. लग्नें बहुधा वयांत आल्यावर करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. सोडचिठ्ठी देतां येते. स्त्रीच्या दुराचरणामुळें तिला सोडचिठ्ठी दिलेली असल्यास तिला नवरा जिवंत असेपर्यंत दुसरें लग्न करतां येत नाहीं. तसें नसल्यास तिला पाटाच्या विधीनें दुसरें लग्न करतां येतें.

कधीं कधीं ठाकुरांतील स्त्रिया लग्नें न करतांच पुरुषांजवळ बायकोच्या नात्यानें राहतात. अशा संबंधापासून झालेल्या मुलांचें लग्न करण्याचा प्रसंग जेव्हां येतो तेव्हां त्यांचें लग्न करण्यांत येतें. कारण, असें लग्न न केल्यास त्या मुलांस अनौरस समजण्यांत येतें.

ठाकुरांचीं मुख्य दैवतें हिरवा, चेडा, वाघ्या, बहिरी, भवानी, सुपली, खंडेराव आणि वेताळ हीं होत. शिवाय ते मोरवाडा पेट्यांतील व नाशिक जिल्ह्यांतील पुष्कळ डोंगरांसही भजतात. कांहीं वर्षांपूर्वीं त्यांचे सर्व धर्मविधि जातींतील जाणतेच चालवीत असत. पण अलीकडे ते या कामीं ब्राह्मणांची योजना करूं लागले आहेत. ते मृतांस पुरतात व त्यांच्या तृप्त्यर्थ दर वर्षीं भाद्रपदांतील अमावास्येस कावळ्यांस अन्न घालतात.

ते मांस खातात व दारू पितात.

**ठाकोर**—रावत जातीचें दुसरें नांव.

**डबगार**—खाल्पा जातीचें दुसरें नांव.

**डवरी**—जोशी जातीचें दुसरें नांव.

**डवरे गोसावी**—भराडी जातीचें दुसरें नांव.

**डेपला**—मुख्यत्वेंकरून कच्छ आणि काठेवाडांत आढळतात. ते लोहाणांची एक शाखा असावी असें दिसतें. पूर्वी त्यांच्यांत आणि लोहाणांत परस्पर शरीरसंबंध होत असे असें सांगतात. वढवाण आणि ध्रांगध्राशिवाय इतर ठिकाणचे लोहाणा [illegible] त्यांच्याशीं अन्नव्यवहार करतात आणि त्यांचे उपाध्येही एकच असतात. तीन [illegible]ांपूर्वी लोहाणांप्रमाणेंच डेपल्यांचेही भाट अथवा वहीवांचा होते, पण आतां [illegible] आढळण्यांत येत नाहींत. अशी दंतकथा आहे कीं, लखो आणि दामो नांवाचे दोन भाऊ होते. ते लोहारगडाहून (सिंध) लिमडीजवळील शियाळी नांवाच्या खेड्यांत आले, आणि वढवाणवरून ध्रांगध्राला गेले. लखोपासून लोहाणांची उत्पत्ति झाली आणि दामोपासून डेपल्यांची झाली. आणखी असेंही सांगतात कीं, ते काठेवाडांत आल्यास तीनशेंहून अधिक वर्षें झालीं आहेत.

डेपलांत सहा कुळें आहेत. एकाच कुळांत शरीरसंबंध होत नाहीं. आतेबहिणीशीं, मामेबहिणीशीं किंवा मावसबहिणीशीं लग्न करतां येत नाहीं. भावाभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करतां येतें. मुलांचीं लग्नें पंधरा ते वीस व मुलींचीं नऊ ते तेरा वर्षांच्या दरम्यान करतात. विधवाविवाहास मोकळीक आहे. अविवाहितास विधवेशीं लग्न करतां येत नाहीं. सोडचिठ्ठी देतां येत नाहीं.

डेपला स्वामीनारायण आणि रामानंद पंथाचे अनुयायी आहेत. त्यांचीं कुलदैवतें आशापुरी, पिढड, खोडियार, सूरो, सुर्धन आणि ठाकूरजी हीं आहेत. त्यांचे उपाध्ये गुजराथी सारस्वत ब्राह्मण असतात. ते त्यांच्या हातचें आणि लोहाणांच्या हातचें अन्न खातात. इतर ब्राह्मण त्यांस कमी लेखतात.

मृतांस जाळतात व त्यांच्या तृप्त्यर्थ श्राद्धें करतात. ज्यांस ऐपत असते ते लोक अविवाहित आणि निपुत्रिक मृतांच्या शांतीसाठीं नील परणाववी नांवाचा विधि करतात. ह्या विधींत एका पाड्याचें पाडीबरोबर लग्न करण्यांत येतें.

डेपला घरकामास नोकरीस राहून, दगडाच्या खाणींत काम करून आणि दुकानदारी करून पोट भरतात. कांहीं शेती करतात.

**डोंब**—महार जातीचें दुसरें नांव.

**डोंबारी**—कोल्हाटी जातीचें दुसरें नांव.

**ढोर**—सर्व दक्षिण महाराष्ट्रांत आणि विजापूर व बेळगांव जिल्ह्यांत आढळतात. ढोर गुरांचीं कातडीं कमावीत असल्यामुळें त्यांस ढोर ( गुरूं ) हें नांव पडलें असावें. त्यांच्यांत बुधलेकरी [illegible]गार, बुंदेलखंडी, हिंदुस्थानी, कंकय्या, कर्नाटकी, खेतरफेडी, अ[illegible]मराठा असे सात पोटभेद आहेत. त्यांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. त्यांच्यांत आडनांवांनीं दर्शविलीं जाणारीं कुळें आहेत. त्यांच्यांत उंबर, जांभूळ, मर्यादवेल, परशा इत्यादि देवकें आहेत. ज्यांचें कूळ व देवक एकच असतें त्यांच्यांत शरीरसंबंध होत नाहीं. आतेबहिणीशीं व मामेबहिणीशीं लग्न करतां येतें. भावाभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करतां येतें. लग्नें अगदीं लहानपणीं व वयांत आल्यानंतरही करितात. विधवाविवाह व सोडचिठ्ठी यांस मोकळीक आहे. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रीस विधवाविवाहविधीनें दुसरें लग्न करतां येतें.

ढोरांचीं कुलदैवतें तुळजापूरची आणि कोंडणपूरची भवानी, जेजुरीची जनाई व खंडोबा, शिंगणापूरचा महादेव आणि पंढरपूरचा विठोबा हीं होत. ते धर्मविधि चालविण्याच्या कामीं ब्राह्मण आणि जंगम ह्या दोघांचीही योजना करितात. ते मृतांस पुरतात व त्यांच्या तृप्त्यर्थ महालय करतात.

ते मांस खातात व दारू पितात.

**ढोली**—बजानिया जातीचें दुसरें नांव.

**तरळ**—महार जातीचें दुसरें नांव.

**तर्गाळा**—भावैय्या जातीचें दुसरें नांव.

**तलवार**—बेरड जातीचें दुसरें नांव.

**तारू**—मुख्यत्वेंकरून अहमदनगर व नाशिक जिल्ह्यांत आढळतात. त्यांचा धंदा नदींतून नावा चालविण्याचा असल्यामुळें त्यांना तारू ( तारूं ) हें नांव पडलें आहे. आपण मूळचे मराठे असून नावा चालविण्याचा धंदा करूं लागल्यापासून आपली निराळी जात बनली, असें तें सांगतात.

देवक व कूळ एकच असलें तर शरीरसंबंध होत नाहीं. प्रत्येक कुळाचें निरनिराळें देवक असतें. त्यांचीं मुख्य देवकें मोराचें पीस, पांचपालवी, सूर्यफूल आणि मर्यादवेल हीं आहेत.

त्यांच्या रीतिभाती व धर्मसमजुती मराठा कुणब्यांप्रमाणेंच आहेत.

**तांडेल**—मांगेला जातीचें दुसरें नांव.

**तांबट**—त्यांस कासार असेंही म्हणतात. ते महाराष्ट्रांत सर्वत्र आढळतात. देवांचा शिल्पकार जो विश्वकर्मा त्याच्या त्वष्टा नामक पुत्रापासून आपली उत्पत्ति झाली आहे असें ते सांगतात व आपणांस त्वष्टा कासार म्हणवितात. ते तांब्यापितळेचीं नाना प्रकारचीं भांडीं करून विकतात. ज्यांना इंग्रजी शिक्षण मिळतें ते सरकारी किंवा व्यापाऱ्यांच्या ऑफिसांत नोकरी धरतात.

तांबट लोकांत अंगिरस, अत्रि, भारद्वज, भृगू, गौतम, जमदग्नि आणि काश्यप अशीं सात गोत्रें आहेत. सगोत्रांत शरीरसंबंध होत नाहीं. देशावरील तांबट मुलांची मुंज करितात. कोंकणांतील तांबट मुंज करीत नाहींत.

मुलांचीं लग्नें बहुधा वीस वर्षांच्या वयापर्यंत करितात. मुलींचीं दहा ते बारा वर्षांच्या दरम्यान करितात. देशावरील तांबट विधवाविवाह करीत नाहींत. कोंकणांतही फक्त मागसलेले लोकच विधवाविवाह करितात. सोडचिठ्ठी देतां येत नाहीं.

तांबट मुख्यतः स्मार्थमतानुयायी आहेत. त्यांची कुलदेवी कालिका. त्यांचे उपाध्ये ब्राह्मण असतात. त्यांचे धर्मविधि ब्राह्मणांप्रमाणेंच असतात.

ते मांस खातात व दारू पितात. ब्राह्मणांशिवाय इतर जातींच्या लोकांच्या हातचें अन्न आपण खात नाहीं असें ते सांगतात.

**तांबोळी**—दक्षिण महाराष्ट्रांत सर्वत्र आढळतात. तांबोळी हा शब्द संस्कृत तांबूल ह्या शब्दावरून निघाला आहे. ते विड्याचीं पानें विकीत असल्यामुळें त्यांस हें नांव पडलें आहे. त्यांस कोणी कोणी बारीही म्हणतात. पण तें चूक आहे. कारण बारी फक्त विड्यांच्या पानांची लागवड करितात. तांबोळ्यांचा मराठा कुणब्यांशीं रोटीबेटीव्यवहार होतो. ते दिसण्यांत त्यांच्यासारखेच असतात, व त्यांचे रीतरिवाज व धर्मसमजुती त्यांच्याप्रमाणेंच आहेत.

**तिगला**—मुख्यत्वेंकरून कर्नाटकांत आढळतात. ते म्हैसूर संस्थानातील तिगलांची एक शाखा असून त्यांचें त्यांच्याशीं बरेंच साम्य आहे. तिगला हें मद्रास इलाख्यांतील रड्डी अथवा पल्ली ज[illegible] एक नांव आहे. म्हैसुरांतील तिगला हे मूळ मद्रासेंतूनच आलेले [illegible]त. मुंबई इलाख्यांतील तिगलांची आतां एक स्वतंत्र जातच बनली आहे. पल्लींप्रमाणें तेही आपणांस क्षत्रिय म्हणवितात आणि त्यांच्याप्रमाणें ते जानवींही घालूं लागले आहेत; परंतु त्यांचा धंदा शेतीचा आहे. ते घरीं एव्बार या नांवाची अपभ्रष्ट तामील भाषा बोलतात.

एकाच कुळांतील स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. आतेबहिणीशीं व मामेबहिणीशीं लग्न करतां येतें; मावसबहिणीशीं करतां येत नाहीं. मुलींचीं लग्नें वयांत आल्यानंतरही करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. सोडचिठ्ठी देतां येते. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रीस विधवाविवाहविधीनें दुसरें लग्न करतां येतें.

तिगला वैष्णव आहेत. त्यांची कुलदेवी गुरुनाथम्मा. तिचीं पवित्र स्थानें म्हैसुरांत आणि दक्षिण कानड्यांतील कारकल येथें आहेत. त्यांचीं लग्नें ब्राह्मण चालवितात. विधवाविवाह जातींतील विधवा चालवितात. मृतांस जाळतात अथवा पुरतात. ज्यांनीं मुद्रा घेतल्या असतील त्यांस जाळलेंच पाहिजे. मृतांच्या तृप्त्यर्थ भाद्रपदांतील अमावास्येस एक घट पाण्यानें भरून त्याची पूजा करितात आणि जातीचें एक मेहूण जेऊं घालतात. ते श्राद्ध करीत नाहींत.

त्यांचा परंपरागत धंदा शेती व बागायती करण्याचा आहे. कांहीं मजुरीहा करितात.

ते मांस खातात व दारू पितात.

**तिर्गर**—मुख्यत्वेंकरून अहमदाबाद, खेडा, महीकांठा आणि पालनपूर येथें आढळतात. ते पूर्वीं तीर करीत असत म्हणून त्यांस तिर्गर हें नांव पडलें आहे. हल्लीं तीरांस मागणी नसल्यामुळें ते शेती करून उदरनिर्वाह करितात.

त्यांच्यांत आठ कुळें आहेत. एकाच कुळांतील स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. आतेबहिणीशीं, मामेबहिणीशीं किंवा मावसबहिणीशीं लग्न करतां येत नाहीं. भावाभावांस बहिणीबहिणींशीं लग्न करतां येतें. विधवाविवाहास मोक-

ळीक आहे. विधवेस मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न करतां येतें. अविवाहितास विधवेशीं लग्न करावयाचें असल्यास त्याला प्रथम बोरीच्या अथवा शमीच्या झाडाबरोबर लग्न लावावें लागतें. जातीच्या पंचांच्या परवानगीनें नवऱ्यास बायकोस काडी मोडून देतां येते. दोघांनाही पंचांस प्रत्येकीं दहा रुपये दंड द्यावा लागतो. व्यभिचाराशिवाय इतर कारणामुळें स्त्रीस सोडचिठ्ठी दिलेली असल्यास तिला दोन वर्षें जातीबाहेर ठेवतात. नंतर तिच्याकडून जेवण अथवा दंड घेऊन तिला जातींत घेतात. मग तिला पहिल्या लग्नाच्या विधीनें दुसरें लग्न करतां येतें.

तिर्गर बिजपंथी आहेत. ते मुख्यतः कृष्णास भजतात. त्यांची कुलदेवी चामुंडा. त्यांचे उपाध्ये गारुडा असतात. मृतांस जाळतात अथवा पुरतात.

ते गोमांसासुद्धां सर्व प्रकारचें मांस खातात व दारू पितात.

**तिर्माळी**—महाराष्ट्रांत बहुतेक ठिकाणीं आढळतात. त्यांना काशी कापडी असेंही म्हणतात. ते मूळचे तेलगू असून घरीं ते तेलगू भाषाच बोलतात. ते मुलांमुलींस नांवेंही तेलगूच ठेवतात.

त्यांच्यांत पुष्कळ आडनांवें आहेत. आडनांव एकच असलें म्हणजे शरीरसंबंध होत नाहीं. विधवाविवाहास मोकळीक आहे. त्यांचीं लग्नें बहुधा श्रावण महिन्यांत होतात.

ते शैव आहेत. त्यांचीं कुलदवतें अंबाबाई, तुळजापूरची चर्तलजी, दुर्गा, भवानी, बालाजी आणि तेलंगणांतील गणपति हीं आहेत. त्यांचे उपाध्ये तेलंगू ब्राह्मण असतात. ते न मिळाल्यास ते देशस्थांस बोलावितात. ते मृतांस जाळतात अथवा पुरतात, आणि त्यांच्या तृप्त्यर्थ पितृपक्षांत पक्ष करतात.

त्यांचा परंपरागतधंदा भिक्षा मागण्याचा आहे. ते नंदीबैल बरोबर घेऊन गांवोगांव भिक्षा मागत फिरत असतात. ते जानवीं, रुद्राक्ष, चंदनाचे तुकडे, तुळशीच्या माळा, धार लावण्याचे दगड वगैरे जिनसाही विकतात.

ते मांस खातात व दारू पितात.

**तुडुग वडर**—भामटा जातीचें दुसरें नांव.

**तुरी**—मुख्यत्वेंकरून अहमदाबाद, खेडा, काठेवाड आणि पालनपूर येथें आढळतात. आपली उत्पत्ति एका भाटापासून झाली आहे असें ते सांगतात. ते एका मुसलमान कलावंतिणीस एका भंग्यापासून झालेल्या संततीचे वंशज आहेत असेंही कित्येक सांगतात. त्यां[illegible] धेड आणि भंगी यांच्या दरम्यान आहे. धेड तुरींच्या हातचें अन्न घेत नाहींत आणि तुरी भंग्यांच्या हातचें अन्न घेत नाहींत. त्यांच्यांत विधवाविवाह रूढ आहे. मृत पतीस धाकटा भाऊ असला तर विधवेनें त्याच्याशींच लग्न केलें पाहिजे असा नियम आहे. सोडचिठ्ठी देतां येते. ते मुख्यत्वेंकरून उमिया आणि हर्शिद या देवींस भजतात. त्यांचे उपाध्ये गारुडा असतात. मृतांस पुरतात. ते ढोलकीं वाजविण्याचा धंदा करून उपजीविका करतात.

ते मांस खातात व दारू पितात.

**तेलगू**—कामाठ्यांचें दुसरें नांव.

**तेली**—ह्या जातीचे लोक महाराष्ट्रांत सर्वत्र आढळतात. ते नारळ, तीळ आणि दुसऱ्या अनेक प्रकारच्या बियांचें तेल काढतात. ते आपली उत्पत्ति शनीपासून झाली आहे असें सांगतात. त्यांच्यांत पंचम किंवा लिंगायत, कानडे, लाड, गुजर, आयर, कडू किंवा अकरमासे, कंडी, शनवार ( हे बेने इस्राएल आहेत ) शुक्रवारी, राठोड, परदेशी, तिळवण सोमवार किंवा मराठा आणि गंधी असे पोटभेद आहेत. यांतील शेवटच्यांस अर्धा पोटभेद मानतात. यांचा परस्परांशीं रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. यांत तिळवणांची संख्या सर्वांत अधिक आहे. ते सोमवारीं काम करीत नाहींत म्हणून त्यांस सोमवार असें म्हणतात. त्यांच्यांत आडनांवांनीं दर्शविलीं जाणारीं अनेक कुळें आहेत. एकाच कुळांतील स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. रत्नागिरी जिल्ह्याच्या दक्षिण भागांत, एकाच खेड्यांत राहाणारांस एकाच कुळाचे समजण्यांत येत असल्यामुळें त्यांच्यांत शरीरसंबंध होत नाहीं. पुणें जिल्ह्यांतील तेल्यांचें देवक पहार आणि तेलाचा घाणा हें आहे. साताऱ्यांत प्रत्येक कुळाचें पूर्वीं निरनिराळें देवक होतें असें दिसतें. उदाहरणार्थ, चव्हाण आणि वाकचवडे यांचें देवक वासनवेल, आणि विभूते आणि चिचकर ह्यांचें देवक पांचपालवी आहे.

नाशिक जिल्ह्यांत पांचपालवी हें एकच देवक आढळतें. रत्नागिरी जिल्ह्यांत कळंब, उंबर, आपटा आणि अंजन अशीं देवकें आढळतात. चिपळूणच्या आजूबाजूस एकच देवक असलेल्या लोकांत शरीरसंबंध होत नाहीं. ह्या जिल्ह्यांत देवकास अतिशय पूज्य मानण्यांत येतें आणि त्यानें दर्शविलें जाणारें झाड कापण्यांत अथवा जाळण्यांत येत नाहीं, अथवा त्याचा दुसऱ्या कोणत्याही कामीं उपयोग केला जात नाहीं.

तेल्यांच्या चालीरीति मराठा कुणब्यांप्रमाणेंच आहेत. त्यांच्यांत विधवा-विवाह रूढ आहे. सोडचिठ्ठी देतां येते. ते मांस खातात व दारू पितात. नाशिक जिल्ह्यांतील तेली ब्राह्मणांशिवाय इतरांच्या हातचें अन्न घेत नाहींत असें सांगतात.

**थवी**—सुतार (कोंकणी) जातीचें दुसरें नांव.

**थोरले घरचे**—महार जातीचें दुसरें नांव.

**थोरी**—मुख्यत्वेंकरून पंचमहाल आणि रेवाकांठा येथें आढळतात. त्यांची गणना अस्पृश्यांत होते. त्यांच्यांत गराशिया आणि मकवाणा असे दोन पोटभेद आहेत. त्यांचा रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. मुलींचीं लग्नें त्या वयांत आल्यानंतर करतात. विधवाविवाहास मोकळीक आहे. विधवेस मृत पतीच्या भावाशीं लग्न करतां येतें.

ते फक्त बेचरा नांवाच्या देवीस भजतात, व तिला दसऱ्याच्या दिवशीं रेड्यांचे व बकऱ्यांचे बळी देतात. देवीनें मेलेल्या मनुष्यांस व ज्यांस कधींच देवी आल्या नसतील त्यांस पुरतात. इतरांस जाळतात.

ते वर्षांतून आठ महिने गांवोगांव भटकत असतात. ते लांकडाच्या खाटा करून विकतात. त्यांच्या बायका टोपल्या करून विकतात.

**दर्जी**—गुजराथ, काठेवाड आणि कच्छ येथें सर्वत्र आढळतात. त्यांना मेराई, पिपावासी, सई, सुई, सई सुतार आणि थालावाडी अशींही नांवें आहेत. ते त्यांचा परंपरागत कपडे शिवण्याचाच धंदा करितात. तथापि कच्छमध्यें कांहीं दर्जी सुतारकाम करितात व काठेवाडांत शेती करितात. त्यांच्यांत धंधया, डोसी, डुंगरपुरा, गजर, मरी, राजकळी, रामदेशी आणि

शिंपी असे आठ पोटभेद आहेत. त्यांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. त्यांच्यांत आडनांवांनीं दर्शविलीं जाणारीं अनेक कुळें आहेत. त्यांतील बहुतेकांचीं नांवें रजपुतांच्या कुळांच्या नांवांसारखींच आहेत. कांहीं स्थानिक स्वरूपाचीं आहेत.

एकाच कुळांतील स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. मामेबहिणीशीं लग्न करतां येतें, पण आतेबहिणीशीं अथवा मावसबहिणीशीं करतां येत नाहीं. मुलींचीं लग्नें अकरा ते चौदा व मुलांचीं बारा ते वीस वर्षांच्या दरम्यान करतात. खेडा जिल्ह्यांतील कांहीं भाग शिवाय करून इतर ठिकाणीं विधवा-विवाहास मोकळीक आहे. अहमदाबाद आणि कच्छ शिवाय करून इतर ठिकाणीं विधवेस मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न करतां येतें. खेडा आणि पंचमहालांतील कांहीं भाग शिवाय करून इतर ठिकाणीं सोडचिठ्ठी देतां येते.

दर्जी मुख्यत्त्वेंकरून रामानंद, मध्वाचार्य, स्वामीनारायण आणि मातापंथाचे अनुयायी आहेत. त्यांची कुलदेवी हिंगलाज. कित्येकांची पीठळदेवी. त्यांचे उपाध्ये पुष्कर्ण ब्राह्मण असतात. मृतांस जाळतात. त्यांचे सर्व धर्मविधि कणब्यांप्रमाणें असतात.

सुरतचे दर्जी मांस खातात व दारू पितात. इतर ठिकाणचे दर्जी शुद्ध शाकाहारी आहेत.

**दर्लिंगर**—जिनगर जातीचें दुसरें नांव.

**दास**—मुख्यत्त्वेंकरून कर्नाटकांत आढळतात. ते धार्मिक भिक्षेकरी असून त्यांच्यांत अनेक हलक्या जातींचे हिंदु व लिंगायत यांचा समावेश होतो. हिंदु दास वैष्णव असतात, लिंगायत शैव असतात. कित्येक वंशपरंपरागत दास असतात आणि कित्येक तिरुपतीच्या व्यंकटरमणाच्या सेवेस आपणास वाहण्याचा नवस करून दास होतात. प्रत्येक दासास दर वर्षीं तिरुपतीच्या यात्रेस जावें लागतें. एखादा दास मेला म्हणजे त्याची ही वारी त्याच्या वारसास करावी लागते. दासांचा पंथ जरी एकच आहे तरी त्यांच्यांतील निरनिराळ्या जातींचे लोक परस्पर रोटीबेटीव्यवहार करीत नाहींत. दास भिक्षा मागून उपजीविका करतात आणि शनिवारीं आणि अमावास्येस मद्यमांस सेवन करीत नाहींत.

भिक्षेशिवाय कांहीं दास नाचगाणें करतात आणि कांहीं नाटकें करतात त्यांच्यांतील स्त्रिया बहुधा वेश्यावृत्तीनें राहतात. कांहीं देवळांत वंशपरंपरागत नोकर असतात. त्यांच्या नोकरीबद्दल त्यांस जमिनी इनाम दिलेल्या असतात.

प्रत्येक जातीच्या [illegible] तिर्मळ आणि गौड असे दोन पोटभेद आहेत. त्यांचा परस्पर रोटीव्यवहार होतो पण बेटीव्यवहार होत नाहीं. तिर्मळ दास आपल्या स्त्रियांस वेश्यावृत्तीनें राहूं देतात व नाटकांत स्त्रियांची भूमिका त्यांसच देतात. गौड दास स्त्रियांची भूमिका पुरुषांस देतात. त्यांच्यांत मुलीस अविवाहित ठेवीत नाहींत. जेव्हां एखाद्या दासास सर्व मुलीच असतात तेव्हां तो त्यांपैकीं एकीस अविवाहित ठेवून तिला बसवी म्हणजे वेश्या बनवितो. जेव्हां एखाद्या बसवीस सर्व मुलीच असतात तेव्हां तीही त्यांपैकीं एकीस अविवाहित ठेवून वेश्याचारास लाविते.

**दिगवान**—जिनगर जातीचें दुसरें नांव.

**दुबला**—मुख्यत्त्वेंकरून भडोच, सुरत आणि ठाणें जिल्ह्यांत आढळतात. कोळ्यांतील निरनिराळ्या समुदायांप्रमाणें त्यांची जातही अनेक जातींच्या मिश्रणानें बनली आहे असें दिसतें. अजूनही ते आपल्या जातींत रजपूत, कणबी, काच्छिया, कोळी, धोडिया इत्यादि जातींच्या लोकांस कांहींही विधि न करितां घेतात. कोकणा, चोधरा, आणि नाइकडा यांस जातींत घेते वेळीं जमणाऱ्या वीसपंचवीस खेड्यांतील लोकांस जेवण देण्याचें त्यांनीं कबूल केलें तरच जातींत घेतात. कांहीं ठिकाणीं जातींत येणाऱ्या इसमाकडून दहा ते पंचवीस रुपयेंपर्यंत रक्कम घेण्यांत येते.

दुबल्यांत एकंदर वीस पोटभेद आहेत. ते असे:—बाबा, वलसारिया, बारुणिया, चोरिया, दमणी, हराविया, इस्त्रिया, खर्चा, मांडविया, नर्डा, ओपाडिया, पाटलेया किंवा खोडिया, राठोडिया, सर्विया किंवा सराविया, सिप्रिया, तळाविया, उखरिया, उमरिया, वासावा किंवा वासवडा, वोन्हिया. यांतील बरेचसे प्रांतिक स्वरूपाचे आहेत. तळाविया हे सर्वांत श्रेष्ठ आहेत. ते सराविर्यांच्या मुली करतात, पण आपल्या मुली त्यांस देत नाहींत. तळाविया आणि मांडविया यांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होतो. हे अपवाद सोडून दिले

तर बाकीच्या पोटभेदांत क्वचित् रोटीव्यवहार होतो, पण बेटीव्यवहार मुळींच होत नाहीं. ज्यांच्यांत पूर्वींचें नातें कांहीं लागत नाहीं. त्यांच्यांत शरीरसंबंध होऊं शकतो. मुलांचीं लग्नें बहुधा दहा ते वीस आणि मुलींचीं दहा ते अठरा वर्षांच्या दरम्यान होतात. त्यांच्यांत खंडाळि[illegible] लग्न करण्याचा प्रघात आहे. ह्या पद्धतींत लग्न करणारास नवरीच्या आईबापांची कांहीं वर्षें नोकरी करावी लागते. विधवाविवाहास मोकळीक आहे. विधवेस मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न करतां येतें. सोडचिठ्ठी देतां येते.

दुबले हनुमान आणि शिकोत्री, अगशी, हिमरिओ इत्यादि देवींस व भूत-पिशाचादिकांस भजतात. थोड्याशा अगदीं जंगली गांवांतील दुबल्यांखेरीज बाकीचे दुबले ब्राह्मणास मान देतात. लग्नें चालविण्यास व कधीं कधीं मुलांचीं नांवें ठेवण्यास ते त्यांस बोलावितात. ते मृतांस जाळतात. जे अगदींच गरीब असतात ते मात्र पुरतात. दर वर्षी चैत्र अगर माघ महिन्यांत मृतांच्या तृप्त्यर्थ एक विधि करण्यांत येतो. हा विधि चालू असतां एखाद्या जंगियाच्या ( भक्ताच्या ) अंगांत मृतांचीं पिशाचें संचार करतात. त्यास जेऊं घालतात व दारू पाजतात. कांहीं ठिकाणीं मृतांच्या नांवानें लांकडी पुतळ्यांची स्थापना करण्यांत येते. त्यांची गुरुवारीं व रविवारीं पूजा करितात व त्यांस कोंबडीं, बकरें, दारू आणि ताडी अर्पण करितात.

ते मांस खातात व दारू पितात.

**देवदिग**—सप्पलिग जातीचें दुसरें नांव.

**देवळी**—पहा–भाविण.

**देवांग**—ह्या जातीस कोष्टी, हटगर, जाड, साळी, विणकर, नेकार नेगार आणि नेयकार असेंही म्हणतात. ह्या जातीची वस्ती महाराष्ट्रांत आणि कर्नाटकांत सर्वत्र आहे. ही जात उद्योगप्रधान असून कापसाचीं व रेशमाचीं वस्त्रें विणण्याचा धंदा करिते. वस्त्रें विणण्याच्या कलेच्या प्रथमावस्थेंत बहुधा मेंढयांच्या लोंकरीच्या घोंगड्या विणण्यांत येत असाव्या. हा धंदा प्रथमतः धनगर करीत, आणि त्यामुळेंच ह्या जातीस धनगरांच्या हटकर ह्या पोटविभागा-वरून हटकर हें नांव पडलें असावें. पुढें जसजशी शेतीची लागवड होऊं

लागली तसतसा कापूस, व त्यानंतर रेशीम, वस्त्रें विणण्याच्या कामांत उपयोगांत येऊं लागलीं; व तदनंतर विणकरांची स्वतंत्र जात निर्माण झाली. त्या जातीचे पुष्कळ लोक विजयानगर येथें स्थायिक झाल्याचें दिसून येतें. तेथें अजूनही त्या जातींचे [illegible] आहे आणि मुरसंगय्या नांवाचे प्रमुख राहतात.

देवांगांत तेहतीस पोटभेद आहेत ते येणेंप्रमाणें:—(१) अहिर, (२) अरसिनपटला, ( ३ ) बांगड, ( ४ ) चामार, ( ५ ) चिक कुर्विन, ( ६ ) देव, ( ७ ) देवांग किंवा खतावण, ( ८ ) हळबे, ( ९ ) हिरे कुर्विन, ( १० ) जैन, ( ११ ) जुनरे, ( १२ ) कुलाचारी किंवा जानव देवांग, ( १३ ) कुरड, ( १४ ) कुर्णवाळ* ( १५ ) मराठा, सकुळ, सहकुळ किंवा स्वकुळ साळी, ( १६ ) मिस्किन, ( १७ ) नाग, ( १८ ) नकुल किंवा लकुल, ( १९ ) पदम किंवा पद्म साळी, ( २० ) पद साळी,* ( २१ ) पटणावळ,* ( २२ ) पट्ट किंवा पट साळी, ( २३ ) सगुण किंवा समय साळीं, ( २४ ) शकुन किंवा सकुन साळी, ( २५ ) शिवाचारी,* ( २६ ) शुभ्र साळी, ( २७ ) शुद्ध साळी, ( २८ ) सोम साळी, ( २९ ) सुख साळी, ( ३० ) सुंता साळी, ( ३१ ) सूत साळी, ( ३२ ) तिकले, ( ३३ ) तोगटी.

वर दिलेल्या पोटभेदांत ज्यांच्या नांवावर फुली आहे ते लिंगायत आहेत. पदम साळ्यांत हिंदु आणि लिंगायत असे दोन भेद आहेत. कानडा जिल्ह्यांतील पदम साळी जानवीं आणि लिंगें दोन्ही परिधान करितात. इतर प्रांतांतील पदम साळी फक्त जानवीं घालतात. बाटून मुसलमान झालेले जे साळी पुनः हिंदु धर्मांत आले, ते अजूनही सुंता करीत असल्यामुळें त्यांना सुंता साळी असें म्हणतात.

देवांगांतील बहुतेक पोटभेदांतील कुळें आडनांवांनीं दर्शविलीं जातात. कर्नाटकांतील देवांगांत तेथील इतर जातींप्रमाणें बेडगू आहेत. कांहीं ठिकाणीं कुळांशिवाय गोत्रेंही असतात. कूळ अथवा गोत्र एकच असेल तर शरीरसंबंध होत नाहीं. पण गोत्र माहीत नसल्यास फक्त कुळाचाच विचार केला जातो. पुष्कळ ठिकाणीं आतेबहिणीशीं अथवा मामेबहिणीशीं लग्न करण्याचा प्रघात आहे. पण मावसबहिणीशीं लग्न करण्याचा प्रघात कोठेंही नाहीं. भावाभावांस

बहिणीबहिणींबरोबर लग्न करतां येतें. लग्नें लहानपणीं अथवा वयांत आल्या-नंतरही करितात. विधवाविवाह रूढ आहे. जातीच्या पंचांच्या परवानगीनें सोडचिठ्ठी देतां येते. देवांगांच्या कुलदेवता खंडोबा, बहिरोबा, [illegible]तिबा, नरसोबा, भवानी, जोगाई, केदारलिंग इत्यादि [illegible] त्यांचे उपाध्ये ब्राह्मण असतात. मृतांस जाळण्यांत अगर पुरण्यांत [illegible].

ते मांस खातात व दारू पितात.

**धनगर**—यांस सातारा जिल्ह्यांत गावड असेंही म्हणतात. ते महाराष्ट्रांत सर्वत्र आढळतात. मध्यप्रांत, वऱ्हाड आणि मध्य हिंदुस्थान येथेंही त्यांची बरीच वस्ती आहे. ते मेंढयाबकऱ्यांची व गुरांची पैदास्त करून विकतात आणि घोंगडया विणतात. उत्तर हिंदुस्थानांत आढळून येणारे धनगर मजुरी व झाडू-वाल्याचें काम करितात. तेथें त्यांची अत्यंत हीन जातींत गणना होते. असें आहे तरी ते व दक्षिणेंतील धनगर मूळचे एक नव्हत, असें कांहीं निश्चयानें सांगतां येत नाहीं. परंतु ते एकच आहेत हें सिद्ध करण्यास अजून जास्त पुराव्याची गरज आहे. अहमदनगर जिल्ह्यांत मैदानांत राहणारे कांहीं धनगर घोडयांचीही पैदास्त करितात. त्यांच्या उत्पत्तीविषयीं अनेक दंतकथा प्रचलित आहेत. परंतु त्यांच्यांत आढळून येणारे देवकांचे अवशेष, त्यांचा कृष्ण वर्ण व बळकट, पण कृश अंगयष्टि यावरून त्यांच्यांत येथील मूळ रहिवाशांचा कांहीं तरी अंश असावा, असें दिसतें. पूर्वी धनगर हा शब्द केवळ जातिवाचक होता, धंदेवाचक नव्हता असें दिसतें. परंतु महाराष्ट्रांत त्याच्या मूळ जातिवाचकत्वाचा लोप होऊन तो धनगरांचा धंदा करणाऱ्या विविध प्रकारच्या लोकांसही लाव-ण्यांत येऊं लागला. धनगरांत जो अस्सल अथवा मराठा धनगर म्हणून पोट-भेद आहे तेच बहुधा महाराष्ट्रांतील मूळ धनगर असावे. हटगर या नांवाचा त्यांच्यांत जो एक दुसरा मोठा पोटभेद आहे त्यास, बसीमच्या भोंवतालच्या डोंगराळ प्रदेशांत जेव्हां त्यांचा अंमल होता तेव्हां, बरेंच महत्त्व प्राप्त झालें होतें असें दिसतें. हे हटगर आपणास बरगे म्हणजे भाला वापरणारे धनगर असें म्हणवितात; परंतु अहमदनगर आणि सोलापूर जिल्ह्यांत ह्या दोन अगदीं पृथक पोटजाती आहेत. धनगरांच्या कांहीं पोटजाती जरी शेती व लोंकर

विणण्याचा धंदा स्वीकारून स्थायिक झाल्या आहेत, तरी त्यांच्यांतील खिल्लार वगैरे पुष्कळ पोटजातींनीं त्यांचा गांवोगांव भटकण्याचा मूळचा रिवाज अजून सोडलेला नाहीं.

धनगरांत बावीस पोटभेद आहेत. ते असे:—अहिर, अस्सल किंवा मराठा, बनजी, बरगे बंदे किंवा मेठकरी, [illegible], गडगे, गवळी, धोगत्तुन्य, हटकर किंवा झेंडेवाले, होळकर, कंगर, खिक्री, खिल्लारी किंवा थिलारी, खुटे किंवा खुटेकर, कुकटेकर, लाड, मेंढे, म्हसकर, सनगर, शेगर, शिळोत्या, उटेगर. ह्यांतील पुष्कळांत कडू नांवाचा एक पोटभेद आहे. त्यांत त्यांच्या अनौरस संततीचा समावेश होतो. त्यांच्यांत आडनांवांनीं दर्शविलीं जाणारीं अनेक कुळें आहेत. कूळ आणि देवक एकच असेल तर शरीरसंबंध होत नाहीं. त्यांच्यांत सूर्यफूल, कमळ, पांचपालवी इत्यादि देवकें आहेत. मामेबहिणीशीं लग्न करतां येतें. आतेबहिणीशीं व मावसबहिणीशीं करतां येत नाहीं. भावाभावांस बहिणी-बहिणींबरोबर लग्न करतां येतें. मुलींचीं लग्नें चार महिन्यांपासून बारा वर्षांच्या वयापर्यंत करितात; मुलांचीं चौदा ते पंचवीस वर्षांच्या दरम्यान करितात. लग्नाचा मुहूर्त ब्राह्मणाकडून ठरवून घेतात. ब्राह्मण न मिळाल्यास पुढें सांगित-ल्याप्रमाणें मुहूर्त ठरविण्यांत येतो.

एका दंपत्यास झोंपडीच्या बाहेर बसवितात. मग त्या झोंपडींतून प्रथम एका गाईस बाहेर सोडतात व नंतर तिच्या वासरास सोडतात. वासरूं जर त्या दंपत्याच्या उजवीकडून गाईकडे धांवत गेलें तर तो शुभ मुहूर्त असें सम-जतात; डावीकडून गेलें तर लग्न एक दोन तास पुढें ढकलतात. नंतर पुनः पूर्वींप्रमाणेंच करतात. याप्रमाणें वासरूं त्या दंपत्याच्या उजवीकडून जाईपर्यंत करण्यांत येतें.

विधवाविवाह व सोडचिठ्ठी यांस मोकळीक आहे.

धनगर सर्व देवतांस भजतात. त्यांचे उपाध्ये ब्राह्मण असतात. ब्राह्मण नच मिळाल्यास जातींतील जाणते धर्मविधि चालवितात. कांहीं ठिकाणीं उत्तरक्रिया कुंभारांकडून अथवा जंगमांकडून चालवितात. मृतांस जाळण्यांत अगर पुर-ण्यांत येतें. ते श्राद्धें करितात.

ते मांस खातात आणि दारू पितात.

**धरणीचे पूत**—महारांचें दुसरें नांव.

**धिवर**—मांगेला जातीचें दुसरें नांव.

**धुळधोया**—झारेकरी जातीचें दुसरें नां[illegible]

**धेड**—गुजराथेंत सर्वत्र आढळतात. [illegible] जिल्ह्यांतील धेड असें सांगतात कीं, सत्ययुगांत त्यांना सत्य असें म्हणत असत, द्वापारयुगांत मेघा असें म्हणत असत, व त्रेतायुगांत एलिया असें म्हणत असत. त्यांना धेड हें नांव या कलियुगांतच मिळालें. पुढें आपणास अत्यंत श्रेष्ठ दर्जा प्राप्त होईल, अशीही त्यांची समजूत आहे. नवीन युगांत होणारा कायमराय नांवाचा राजा धेडकन्येबरोबर लग्न करील व तो त्यांस ब्राह्मणांच्या दर्जास चढवील, असें भविष्य करण्यांत आलें आहे असें ते सांगतात. ते ओचवा ( धार्मिक मेळे ) भरवितात. त्यांत ह्या आपणास पुढें प्राप्त होणाऱ्या श्रेष्ठ स्थितीसंबंधानें अत्यंत उत्साहानें गाणीं गातात.

ते आपण क्षत्रियकुलोत्पन्न आहों असें मानतात. सिंधमधील धेड तर आपण रजपूत आहों असें सांगतात. त्यांच्या चालीरीति, व महारमांगांप्रमाणें त्यांस जडलेली अस्पृश्यता, यांवरून ते येथील मूळ रहिवासी आहेत हें स्पष्ट दिसतें.

जाडयाभरडया कापसाचें सूत काढून त्याचें कापड विणणें हा आपला मूळ धंदा आहे अशी त्यांची समजूत आहे. ते पूर्वी वाटाडयाचें काम करीत आणि सीमेच्या खुणाही दाखवीत. हल्लीं मुख्यत्त्वेंकरून ते शेतावर मजुरी करितात. त्यांच्यापैकीं पुष्कळ लोक पाटीदारांचे वंशपरंपरागत नोकर आहेत. मेलेल्या गुरांस ओढून नेण्याशिवाय दुसरें कोणतेंच घाणेरडें काम त्यांस करावें लागत नाहीं.

धेडांत चौदा पोटभेद आहेत. ते असे:—भालिया, चारणिया, चासिया, चरोतरिया किंवा तळबदा, चोरासिया, गुजर गुर्जर किंवा गोजिया, हाडिया, काहनुमिया, कुसिया, महेश्री किंवा कच्छी, मारू किंवा मारवाडी, पाटणिया, सुरती, वनकर. त्यांच्यांत अनेक कुळें आहेत. त्यांतील मांतग हें कूळ, त्यांच्या जातीच्या संस्थापकानें स्थापिलें असल्यामुळें, सर्वांत श्रेष्ठ समजण्यांत येतें.

जवळच्या नातलगांत लग्न करतां येत नाहीं. लग्नें बहुधा वयांत आल्यावर होतात. विधवाविवाहास मोकळीक आहे. विधवेस मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न करतां येतें. सोडचिठ्ठी देतां येते. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रीस पुनः लग्न करतां येतें.

घेड मुख्यत्वेंकरून, गणेश, मार्तंड, हनुमान आणि नरसिंगजी ह्यांस भजतात. त्यांचे उपाध्ये गारुडा असतात. मृतांस बहुधा पुरण्यांत येतें. त्यांच्या तृप्त्यर्थ दर वर्षीं दिवाळीस कावळ्यांस अन्न घालितात.

घेड मेलेल्या गाईम्हशींचेंही मांस खातात. ते दारू पितात. ते मुसलमानांच्या हातचें अन्न खातात.

**घेड**—महारांचें दुसरें नांव.

**घेढ**—मेघवाळ जातीचें दुसरें नांव.

**घोडिया**—मुख्यत्त्वेंकरून सुरत व ठाणें जिल्ह्यांत आढळतात. त्या प्रांतांत आढळणाऱ्या मूळ जातींत त्यांची संख्या सर्वांत अधिक आहे. ते हाळी (वंशपरंपरागत नोकर) असून शेतावर मजुरी करितात. ते आपल्याहून वरिष्ठ जातींच्या लोकांस आपल्या जातींत घेतात. तसेंच त्यांच्यांतील पुष्कळ कुळांचीं नांवें दुसऱ्या जातींवरून पडलेलीं आहेत. यावरून त्यांच्यांत दुसऱ्या अनेक जातींच्या लोकांचा भरणा झाला असावा असें दिसतें.

आतेबहिणीशीं, मामेबहिणीशीं अथवा मावसबहिणीशीं लग्न करतां येत नाहीं. भावाभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करतां येतें. मुलांमुलींचीं लग्नें पांच ते वीस वर्षांच्या दरम्यान करतात. मुलाच्या बापास मुलीच्या बापास साडे सोळापासून साडेबावीस रुपयेपर्यंत रक्कम द्यावी लागते. त्यांच्यांत खंडाळियाचाही प्रघात आहे. ह्या प्रघाताप्रमाणें नवऱ्या मुलास आपल्या भावी सासऱ्याकडे पांच वर्षें काम करावें लागतें. मग तो जर मुलीस पसंत पडला तर त्याच्याशीं तिचें लग्न लावतात. कधीं कधीं मुलाचा बाप आपल्या मुलासाठीं मुलगी विकत घेतो, व मग तीं दोघें लग्न न करतांच नवराबायकोच्या नात्यानें राहतात. घोडियांचीं लग्नें फक्त गुरुवारींच होतात. लग्नविधि जातीच्याच दोन स्त्रिया चालवितात. त्यांस वेर्णो असें म्हणतात. विधवाविवाहास मोकळीक

आहे. विधवेस मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न करतां येतें. सोडचिठ्ठी देतां येते.

धोडिया भरम देव, हरिया देव, दिवाळी देवी, का[illegible]ज्या, मावली माता इत्यादि देवतांस भजतात. ते धर्मविधि [illegible]ण्यास ब्राह्मणांस बोलावीत नाहींत. मृतांस जाळतात अगर पुरतात. प्रत्येक सणांच्या दिवशीं मृतांच्या नांवानें कावळ्यांस अन्न चारण्यांत येतें.

ते मांस खातात व दारू पितात.

**धोबी**—गुजराथ, काठेवाड व कच्छमधील सर्व लहानमोठ्या शहरांत आढळतात. ते अस्पृश्यांखेरीज इतर सर्व जातींच्या व धर्मांच्या लोकांचे कपडे धुतात. अगदीं जवळच्या नातलगांबरोबर लग्न करतां येत नाहीं. भावाभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करतां येतें. मुलींचीं लग्नें बहुधा अकरा वर्षांच्या आंत व मुलांचीं पंधरा ते सतरा वर्षांच्या दरम्यान करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. विधवेस मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न करतां येतें. सोडचिठ्ठी देतां येते. धोबी सर्व देवतांस भजतात. त्यांचे उपाध्ये ब्राह्मण असतात. ते मृतांस जाळतात व श्राद्धें करितात. ते मांस खातात व दारू पितात.

**धोबी**—परीट जातीचें दुसरें नांव.

**नट**—मुख्यत्वेंकरून गुजराथेंत आढळतात. ते मूळचे मारवाडांतील असून भोरपें करीत गांवोगांव भटकत असतात.

**नंदीवाले**—हे धार्मिक भिक्षेकरी असून शृंगारलेले बैल बरोबर घेऊन गांवोगांव भिक्षा मागत हिंडत असतात. ते महाराष्ट्रांतील बहुतेक भागांत आढळतात.

**नाईक**—नायकडा जातीचें दुसरें नांव.

**नाईक मक्कलू**—बेरड जातीचें दुसरें नांव.

**नाईकवाडी**—बेरड जातीचें दुसरें नांव.

**नाडिग**—न्हावी जातीचें कानडी नांव.

**नाडोर**—फक्त कानडा जिल्ह्यांतच आढळतात. त्यांच्यांत टोकें नाडोर आणि उप्पू नाडोर असे दोन पोटभेद आहेत. उप्पू नाडोर एके काळीं मीठ

(उप्पू-मीठ) पिकविण्याचा धंदा करीत असल्यामुळें त्यांचा दर्जा नेहमीं शेतीचा धंदा करीत असलेल्या टोकें नाडोरांपेक्षां कमी समजण्यांत येतो. नाडोरांत पुढें दिल्याप्रमाणें [illegible] बळी आहेत:—

| | | |
|---|---|---|
| १ अज्जन बळी | ... ... ... | अज्ज=एका झाडाचें फळ |
| २ अने बळी | ... ... ... | अने=हत्ती |
| ३ चेंडी बळी | ... ... ... | चेंडी=एक प्रकारचें झाड |
| ४ गंगा बळी | ... ... ... | गंगा=गंगावळी नदी |
| ५ होले बळी | ... ... ... | |
| ६ होन्ने बळी | ... ... ... | होन्ने=एक प्रकारचें झाड |
| ७ नाग बळी | ... ... ... | नागचांफा |
| ८ सल्यण बळी | ... ... ... | सलेर=साळू |
| ९ शेट्टी बळी | ... ... ... | शेट्टी=मासा |
| १० शिगे बळी | ... ... ... | शिगे=एक प्रकारचें झाड |
| ११ शिरे वळी | ... ... ... | शिरे=एक प्रकारचें झाड |
| १२ तोळण बळी | ... ... ... | तोळा=लांडगा |

बळी स्त्रीवंशाकडून गणला जातो. यावरून ह्या जातींत पूर्वी बहुपतित्वाची चाल होती असें दिसतें. हल्लीं ही चाल नष्ट झाली आहे. प्रत्येक बळीचे लोक, ज्या झाडावरून अगर प्राण्यावरून त्यांच्या बळीचें नांव पडलें आहे, त्या झाडास अथवा प्राण्यास पूज्य मानतात व त्यास कोणत्याही प्रकारें इजा करीत नाहींत. उदाहरणार्थ, नागबळीच्या बायका नागचांफ्याचीं फुलें डोकींत घालीत नाहींत. तसेंच अनेबळीचे लोक हत्तीची पूजा करून त्यास नारळ वाहतात. मुलींचीं लग्नें पांच ते बारा वर्षांच्या दरम्यान करतात; मुलांचीं दहा वर्षांच्या पुढें करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे; पण त्याचा फारसा प्रचार नाहीं. अविवाहितास विधवेशीं लग्न करतां येत नाहीं. सोडचिठ्ठी देतां येते. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रीस नवरा जिवंत असेपर्यंत दुसरें लग्न करतां येत नाहीं.

नाडोरांचा कुलदेव तिरुपतीचा व्यंकटरमण. त्यांचे उपाध्ये हविक ब्राह्मण. ते मृतांस जाळतात व श्राद्धें करितात.

ते मांस खातात, पण दारू पीत नाहींत.

**नापीत**—न्हावी जातीचें दुसरें नांव.

**नायकडा**—ह्यांस नाईक असेंही म्हणत[illegible] ते [illegible]त्वेकरून पंचमहाल, रेवाकांठा आणि सुरत जिल्ह्यांत आढ[illegible] भडोच जिल्ह्यांतील तळबदा कोळ्यांस पूर्वी नाईक म्हणत असत. [illegible]पासून ते वेगळे आहेत हें दर्शविण्या-साठीं त्यांस नायकडा म्हणजे छोटे नाईक हें नांव पडलें असावें. हे लोक येथील मूळ रहिवाशांपैकीं असून त्यांच्यांत दुसऱ्या पुष्कळ जातींच्या लोकांचें मिश्रण झालें आहे यांत संशय नाहीं. गेल्या शतकाच्या सुरवातीस ते अगदीं रानटी स्थितींत असून त्यांच्यांत सामाजिक निर्बंध बिलकूल नव्हते. त्यानंतर हळू हळू ते स्थायिक होऊन शेतावर मजुरी करून व लांकडें तोडून उपजीविका करूं लागले. हल्लीं कित्येकांजवळ बैल व नांगर असून ते शेतीही करितात.

दोनपासून सात पिढयांच्या आंत लग्नें होत नाहींत. आतेबहीण, मामे-बहीण अथवा मावसबहीण यांच्याशीं लग्न करतां येत नाहीं. भावाभावांस बहि-णीबहिणींबरोबर लग्न करतां येतें. लग्नें वयांत आल्यावर करितात. कित्येक वेळां लग्नविधि मुळींच करण्यांत येत नाहीं. सोळा वर्षांच्या वयापर्यंत जर एखाद्या मुलीचा वाङ्निश्चय झालेला नसेल तर तिला तिच्या पसंतीप्रमाणें वाटेल त्या पुरुषाजवळ जाऊन राहतां येतें. त्या पुरुषानें सतरा रुपये देण्याचें मात्र कबूल केलें पाहिजे. एखाद्या मुलीचें जातींतील एखाद्या पुरुषाबरोबर दुर्वर्तन घडलें तर तिचें त्याच्याशीं लग्न लावून देतात. त्यानें लग्न करण्याचें नाकारल्यास जातींतील चारपांच जाणत्यांस एकत्र बोलावून त्यांच्या समक्ष त्या पुरुषास त्या मुलीस मांडीवर घ्यावयास लावतात. नंतर तो तिला सात वेळां 'आई' असें म्हणतो आणि ती त्यास मुलाप्रमाणें पाजते. त्यानंतर तो तिला आपल्या आईप्रमाणें मानतो.

विधवाविवाहास मोकळीक आहे. सोडचिठ्ठी देतां येते. विधवेस आपल्या मृत पतीच्या धाकटया भावाशीं लग्न करतां येतें.

नायकडा कालिका, अंबामाता, महाकाली इत्यादि देवींस भजतात. ते वाघास पूज्य मानतात आणि त्याच्या नांवानें शपथ घेतात. मृत पूर्वजांचे

ओबडधोबड पुतळे करून ते लहान लहान अंगणांतून (खत्री) बसवितात व त्यांची पूजा करितात. ते ब्राह्मणांस मुळींच मान देत नाहींत. मृतांस जाळतात. त्यांच्या तृप्त्यर्थ कोणतेच विधि करण्यांत येत नाहींत.

नायकडा गोमांसासुद्धां [illegible] प्रकारचें मांस खातात व दारू पितात. ते मुसलमानांच्या हातचें अन्न खातात. [illegible], चमार, अथवा भंग्याच्या हातचें अन्न कोणी खाल्ल्यास, त्यानें जातीस जेवण दिलें म्हणजे त्यास जातींत घेण्यांत येतें.

**नायडू**—मुख्यत्वेंकरून पुणें व बेळगांव येथें आढळतात. ते मद्रास इलाख्यांतून आलेले आहेत.

**नायर**—फक्त कानडा जिल्ह्यांतच थोडेसे आढळतात. ते मद्रास इलाख्यांतून आलेले असून शेती करून उदरनिर्वाह करितात.

**न्हावी**—इलाख्यांत सर्वत्र आढळतात. त्यांस हजाम, नाडिग, वारिक, क्षौरक, नापीत, कारागीर, सन्मुख, वालंद, घायजो, मटको, केळासी आणि वावडीचसकी असेंही म्हणतात. हजाम हें नांव कानडा जिल्ह्याशिवाय इतर सर्व ठिकाणीं प्रचारांत आहे. कानडा जिल्ह्यांत न्हाव्यांस नाडिग म्हणतात. न्हावी हें गुजराथ शिवाय करून इतर ठिकाणीं प्रचारांत आहे. कानडा जिल्ह्यांतील न्हाव्यांस क्षौरक आणि केळासी अशींही नांवें आहेत. इतर नांवांपैकीं कांहीं नांवें महाराष्ट्रांत आढळतात, कांहीं गुजराथेंत आढळतात.

महाराष्ट्रांत न्हाव्यांच्या उत्पत्तीसंबंधीं अनेक दंतकथा प्रचलित आहेत. त्यांत एक अशी आहे कीं, शिवाच्या मानेस ज्या शेषाचें वेष्टण आहे त्यापासून त्यांची उत्पत्ति झाली आहे. दुसऱ्या एका दंतकथेंत त्यांची उत्पत्ति शिवाच्या नाभीपासून झाली आहे असें सांगण्यांत येतें. गुजराथेंतील हजाम आपण क्षत्रियकुलोत्पन्न आहों असें म्हणतात. महाराष्ट्रांतील न्हाव्यांचीं नांवें, आडनांवें, चालीरीति, धर्म वगैरे सर्व कांहीं मराठ्यांप्रमाणेंच असल्यामुळें ते आणि मराठे मुळांत एकच असावे असें दिसतें. कांहीं ठिकाणीं हल्लींही उच्च दर्जाच्या मराठ्यांत जेवतांना पाणी वाढण्याचें काम न्हावी करतात, आणि नाशिक आणि खानदेश जिल्ह्यांत तर ते स्वयंपाकही करतात.

न्हाव्यांचा परंपरागत धंदा हजामत करणें, केंस कापणें व नखें काढणें हा होय. ते अस्पृश्यांची हजामत करीत नाहींत. मराठा न्हाव्यांचा जुंनरी न्हावी म्हणून जो पोटभेद आहे ते ख्रिश्चनांची व मुसलमानांचीही हजामत करीत असल्यामुळें त्यांना कमी दर्जाचे समजण्यांत येतें. गुजराथेंतील हजाम लग्नें जुळविण्याच्या कामींही मध्यस्ती करितात व मशाली धरतात आणि सुखवस्तु कुटुंबांत घरकामास नोकरीस राहतात. पूर्वी न्हावी शस्त्रानें गळवें व क्षतें फोडीत व जळवा लावून रक्त काढीत. महाराष्ट्रांत आणि गुजराथेंत न्हाव्यांच्या बहुतेक स्त्रिया सुइणीचें काम करतात.

मुंबई इलाख्यांतील न्हाव्यांत मराठा, गुजराथी, आणि कानडी असे प्रांतिक स्वरूपाचे तीन मुख्य पोटभेद आहेत. त्यांचा धंदा काय तो एक आहे. त्याशिवाय त्यांच्यांत सर्वसाधारण असें कांहींच नाहीं.

मराठा न्हाव्यांत मराठा किंवा देशी आणि कोंकणी असे दोन पोटभेद आहेत. त्यांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. ठाणें जिल्ह्यांत ह्या दोन्ही पोटभेदांतील लोक आढळतात. त्यांत कोंकणी आपणांस श्रेष्ठ समजतात व देशांच्या हातचें अन्न खात नाहींत. देशी मात्र त्यांच्या हातचें अन्न खातात.

देशी न्हाव्यांत आठ पोटभेद आहेत. ते असे:—

१ गंगातीरकर किंवा गोदावरी म्हणजे गोदावरी नदीच्या तीरावर राहणारे.

२ घाटी म्हणजे सह्याद्रि घांटावर राहणारे.

३ जुनरी किंवा परदेशी म्हणजे पुणें जिल्ह्यांतील जुन्नरचे.

४ कुणबी म्हणजे शेती करणारे.

५ खानदेशी म्हणजे खानदेशांत राहणारे. हे मशाली धरण्याचा धंदा करीत असल्यामुळें ह्यांस मशालजी असेंही म्हणतात.

६ वांईदेशी म्हणजे वांईचे.

७ वाजंत्री म्हणजे वाद्यें वाजविणारे.

८ येलमार.

ह्यांपैकीं कुणबी आणि घाटी यांचा परस्पर रोटीव्यवहार होतो. बेटीव्यवहार कोणाचाच होत नाहीं. वांईदेशांस सर्वांत श्रेष्ठ समजण्यांत येतें, आणि

जुनरी युरोपियन, मुसलमान जिनगर इत्यादिकांची हजामत करीत असल्यामुळें त्यांना सर्वांत कनिष्ठ समजण्यांत येतें.

देशी न्हाव्यांच्या चालीरीति, धर्मसमजुती वगैरे सर्व कांहीं मराठ्यांप्रमाणेंच आहे.

कोंकणी न्हाव्यांत त्यांच्या अनौरस संततीचा शिंदे म्हणून एक पोटभेद आहे. त्यांस पंक्तिपावन करून पंक्तीस घेण्यांत येतें. रत्नागिरी जिल्ह्याच्या दक्षिण भागांत आणि सावंतवाडी संस्थानांत बंदे म्हणून आणखी एक पोटभेद आहे. ते सुंता करितात म्हणून त्यांस हलके समजण्यांत येतें.

कोंकणी न्हाव्यांत मराठ्यांप्रमाणें कुळें व देवकें आहेत. त्यांतील जीं उपलब्ध झालीं आहेत तीं पुढें दिलीं आहेत.

| कुळाचें नांव. | | देवक. |
|---|---|---|
| १ बागकर | ... ... ... | पाणकणीस. |
| २ भागवत | ... ... ... | पांचपालवी. |
| ३ बिडे | ... ... ... | आंबा आणि कुऱ्हाड. |
| ४ चव्हाण | ... ... ... | गुळवेल. |
| ५ गायकवाड | ... ... ... | झाग, उंबर, आंबा, जांभूळ आणि पिंपळाचीं पानें. |
| ६ जाधव | ... ... ... | पाणकणीस. |
| ७ कदम | ... ... ... | कळंबाचें झाड |
| ८ कारडे | ... ... ... | पांचपालवी. |
| ९ लाड | ... ... ... | उंबर. |
| १० पवार | ... ... ... | तरवारीची धार. |
| ११ राऊत | ... ... ... | घोडा आणि उंबर. |
| १२ शिंदे | ... ... ... | वेळू. |
| १३ बाघ | ... ... ... | सूर्यफूल. |
| १४ वाघचवरे | ... ... ... | पांचपालवी. |

सावंतवाडी संस्थानांत कळंब, उंबर, वड, आंबा, फणस आणि पिंपळ हीं देवकें असतात. देवकांनीं दर्शविल्या जाणाऱ्या वस्तूस स्पर्श करीत नाहींत, तोडीत नाहींत किंवा दुसऱ्या कोणत्याही प्रकारें [illegible] उपयोग करण्यांत येत नाहीं. देवक एकच असलें तर शरीरसं[illegible]त नाहीं.

कोंकणी न्हाव्यांच्या चालीरीति भंडाऱ्यांप्रमाणें असतात.

खानदेशी न्हाव्यांत अहिर आणि तायडे असे दोन पोटभेद आहेत. त्यांचा परस्पर रोटीव्यवहार होतो, पण बेटीव्यवहार होत नाहीं. अहिरांत पुढें दिल्या-प्रमाणें देवकें आहेत.

| कुळाचें नांव | | | | देवक. |
|---|---|---|---|---|
| १ बाविसकर | ... | ... | ... | गोंवण |
| २ बोरसा | ... | ... | ... | निंब |
| ३ चितळे | ... | ... | ... | शमी |
| ४ निकुंभ | ... | ... | ... | निंब |
| ५ कुलपगर | ... | ... | ... | पचना |
| ६ सोननिस | ... | ... | ... | निंब |
| ७ ठाकरे | ... | ... | ... | हळद |

कानडी न्हाव्यांच्या चालीरीति त्यांच्या समान दर्जाच्या जातींच्या चाली-रीतींहून भिन्न नाहींत. फक्त त्यांच्यांत सोडचिठ्ठी देतां येत नाहीं.

गुजराथी हजामांत ववर किंवा मारवाडी, भाटिया, लिंबचिया, मला आणि मसुरिया किंवा मटकिया असे पांच मुख्य पोटभेद आहेत. त्यांत लिंबचिया सर्वांत श्रेष्ठ आहेत. बाकीचे सर्व लिंबचियांच्या हातचें अन्न खातात, पण लिंब-चिया कोणाच्याच हातचें अन्न खात नाहींत. इतर पोटभेदही परस्परांच्या हातचें अन्न खात नाहींत. विधवाविवाह व सोडचिठ्ठी यांस मोकळीक आहे. विधवेस मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न करतां येतें. दक्षिण गुजराथचे मसुरिया मांस खातात व दारू पितात. बाकी कोणी मांसाहार करीत नाहींत. ते उच्च जातींच्या हातचें आणि कणब्यांच्या हातचेंच अन्न खातात. मटकिया

मात्र कोळ्यांच्या हातचें अन्न खातात. लिंबचिया आणि भाटिया हजाम कच्छ-मधील भाटियांच्या हातचेंही अन्न खात नाहींत; कारण ते पूर्वी मासे खात असत. उलट पक्षीं कित्येक अस्पृश्य जातींतील लोकही लिंबचियांच्या हातचें अन्न खात नाहींत.

गुजराथी हजामांच्या चालीरीति आणि धर्मसमजुती कणब्यांप्रमाणें आहेत.

**निराळी**—निळारी जातीचें दुसरें नांव.

**निळारी**—यांस निराळी, रंगारी, आणि निळगर असेंही म्हणतात. हे दक्षिण महाराष्ट्रांत सर्वत्र आढळतात. निळारी शब्दाचा अर्थ निळीनें रंगविणारा असा आहे. निळारी आपण मूळचे उत्तर हिंदुस्थानांतील क्षत्री असें सांगतात. त्यांच्यांत अशी दंतकथा चालत आली आहे कीं, त्यांचे मूळ पुरुष दोन जुळे भाऊ होते. परशुराम त्यांचा पाठलाग करूं लागला तेव्हां ते अंबाबाईच्या देवळांत लपले आणि आपलें रक्षण करण्याविषयीं त्यांनीं तिला विनंती केली. देवीनें एका भावास दोरा आणि सुई दिली आणि दुसऱ्यास रंग दिला, आणि तिनें त्यांस शिवण्याचें आणि रंगविण्याचें काम करण्यास सांगितलें. तेव्हांपासून शिवणारा भाऊ शिंपी झाला आणि रंगविणारा रंगारी झाला. निळाऱ्यांत आणि शिंप्यांत असलेला हा संबंध कोल्हापूर संस्थानांत निदर्शनास येतो. तेथील निळारी शिंपी जातीचे आहेत असें म्हणतात आणि त्यांच्या चालीरीतीही शिंप्यांच्या चालीरीतीप्रमाणेंच आहेत. शिंप्यांप्रमाणें निळारीही आपणांस नामदेव म्हणवितात.

निळाऱ्यांचा परंपरागत धंदा कापड आणि सूत रंगविण्याचा आहे. त्यांच्या-पैकीं पुष्कळ लोक लुगडीं आणि उपरणीं विणण्याचाही धंदा करितात. त्यांच्या रीतिभाती मराठा कुणब्यांप्रमाणें आहेत.

**नीळगर**—निळरी जातीचें दुसरें नांव.

**नेकार**—देवांग जातीचें दुसरें नांव.

**नेगार**—देवांग जातीचें दुसरें नांव.

**नेयकार**—देवांग जातीचें दुसरें नांव.

**पगी**—कानडा जिल्ह्यांतील कारवार तालुक्यांतच आढळतात. [illegible]गी हा शब्द कोंकणी भाषेंतील पाग म्हणजे मासे मारणें ह्या शब्दावरून निघाला आहे. ते मूळचे गोव्यांतील असावे असें दिसतें. तेथें मल्लिकार्ज[illegible]पुरु परदेशी आणि महाभाई ह्या त्यांच्या देवतांचीं देवस्थानें आ[illegible]त्यांचा परंपरागत धंदा मासे मारण्याचा आहे; पण हल्लीं ते हा धंदा [illegible]चित्च करितात. त्यांचा हल्लींचा धंदा म्हणजे काळीनदींत नावा चालविणें, शेती करणें आणि मजुरी करणें हा होय. त्यांचे रीतरिवाज हरकंत्यांप्रमाणें आहेत.

**पटवेकरी**—किंवा पटवेगर मुख्यत्त्वेंकरून दक्षिण महाराष्ट्रांत आढळतात. ते आपण गुजराथेंतून आलों आहों असें सांगतात. ते घरीं अपभ्रष्ट गुजराथी भाषा बोलतात यावरून त्यांचें म्हणणें खरें दिसतें. ते गळ्यांत घालावयाच्या माळांसाठीं आणि इतर दागिन्यांसाठीं रेशमी दोरे, गोंडे, मुंजी वगैरे करितात. एकच आडनांव असलेल्या लोकांत शरीरसंबंध होत नाहीं. विधवाविवाहास मोकळीक आहे. ते सर्व देवतांस भजतात, मृतांस जाळतात व श्राद्धें करितात. ते मांस खातात व दारू पितात. ते दुसऱ्या जातीच्या लोकांच्या हातचें अन्न खात नाहींत.

**पटवेगार**—पटवेकरी जातीचें दुसरें नांव.

**पट्टार**—सोनारांचें दुसरें नांव.

**पडती**—फक्त कानडा जिल्ह्यांत आढळतात. ते सहासात पिढ्यांपूर्वीं गोव्यांतून इकडे आले असावे असें दिसतें. परंतु मीठ पिकविण्याचा अगदीं हलकी जात करीत असलेला धंदा त्यांनीं स्वीकारल्यामुळें गोव्यांतील त्यांच्या लोकांनीं त्यांच्याशीं सर्व संबंध तोडला, व त्यामुळें त्यांची एक स्वतंत्रच जात बनली. हल्लीं त्यांनीं मीठ करण्याचा धंदा सोडला असून ते खंडानें शेती करितात. त्यांच्यांत स्थानिक स्वरूपाचीं अनेक कुळें आहेत. प्रत्येक कुळाची कुलदेवता निराळी असते. आतेबहिणीशीं व मामेबहिणीशीं लग्न करतां येतें. मुलींचीं लग्नें बहुधा नऊ ते तेरा व मुलांचीं चौदा ते अठरा वर्षांच्या दरम्यान करितात. जातीच्या बुधवंताच्या ( पुढारी ) परवानगीनें विधवेस लग्न करतां येतें. सोडचिठ्ठी देतां येते.

पडती सर्व मुख्य देवतांस व ग्रामदेवतांस भजतात. त्यांचे उपाध्ये कर्नाटकी ब्राह्मण असतात. मृतांस जाळण्यांत अगर पुरण्यांत येतें. मृतांच्या तृप्त्यर्थ दर वर्षी आश्विन शुद्ध नवमीस महालय करितात.

ते मांस खातात व दारू पितात.

**पडियार**—फक्त कानडा जिल्ह्यांतच आढळतात. पडियार हें पडिवाळ ह्या तामिळ शब्दाचें एक रूप आहे. पडिवाल हा शब्द पडी ( धान्य मोजण्याचें एक माप ) ह्या शब्दावरून निघाला असून त्याचा अर्थ धान्याच्या रूपानें मजुरी दिलेला नोकर असा आहे.

पडियार ही वेश्यांची एक जात असून व्यभिचार केल्यामुळें जातीबाहेर टाकलेल्या स्त्रियांपासून ती बनली आहे. ह्या जातींतील मुली वेश्यावृत्तीनें राहतात. बऱ्याच गाणें नाचणें करितात. त्यांच्यांतील पुरुष त्यांस साथ करितात. मुलगी दहा वर्षांची झाल्यावर तिचा शेस म्हणजे सुरीबरोबर लग्न करण्याचा विधि करितात. गोकर्ण येथील महाबळेश्वराबरोबरही मुलींचीं लग्नें करितात असें सांगतात. त्यांचा कुलदेव तिरुपतीचा व्यंकटरमण. त्यांचा धर्मगुरु म्हैसूरमधील रामचंद्रपूरचा हविक स्वामी. भाविणी व देवळ्यांप्रमाणें त्यांच्यांतील कांहीं स्त्रीपुरुषांस देवळांत नोकरी असते. कांहीं शेती करितात.

पडियार मांस खातात व दारू पितात.

**पधरिया**—अहमदाबाद जिल्हा आणि काठेवाड यांच्या दरम्यान असलेल्या नलच्या कांठावरील प्रत्येक खेड्यांत थोडथोडे आढळतात. मृत जनावरांचें मांस खाल्ल्यामुळें जातीबाहेर टाकलेल्या कोळ्यांची ही जात आहे. ते गवत कापण्याचा व बीर नांवाच्या मुळ्या खणून काढण्याचा धंदा करितात.

**परदेशी**—हें नांव साधारणपणें संयुक्त प्रांतांतून येणाऱ्या सर्व लोकांस लावण्यांत येतें. उत्तर हिंदुस्थानांतील पुरुषांस इकडील स्त्रियांपासून होणाऱ्या अनौरस संततीसही हें नांव लावण्यांत येतें.

**परदेशी अलिटकर**—अलिटकर ह्या जातीचें दुसरें नांव.

**परदेशी चांभार**—कटाई ह्या जातीचें दुसरें नांव.

**परदेशी मोची**—कटाई ह्या जातीचें दुसरें नांव.

**परवारी**—महारांचें दुसरें नांव.

**परीट**—ह्यांस धोबी असेंही म्हणतात. ते महाराष्ट्रांत सर्वत्र आढळतात. त्यांना मराठा अथवा कुणबी परीट असेंही म्हणतात. ते मूळचे मराठेच असून त्यांच्या धंद्यामुळें त्यांची स्वतंत्र जात बनली असावी असें दिसतें. त्यांच्यांत देशी आणि कोंकणी असे प्रांतिक स्वरूपाचे दोन पोटभेद आहेत. कोंकणी परिटांस मडिवाळ किंवा मडवळ असेंही म्हणतात. देवक एकच असलें म्हणजे शरीरसंबंध होत नाहीं. देशी परटांत सूर्यफूल, चांफ्याचीं पानें, चिंचेचीं पानें, पांचपालवी वगैरे देवकें आहेत. कोंकणी परटांत कळंब, नाग, कुऱ्हाड वगैरे आहेत. ते कपडे धुण्याचा धंदा करितात. त्यांच्या रीतिभाती व धर्मसमजुती मराठा कुणब्यांप्रमाणें आहेत, पण त्यांचा समाजांतील दर्जा कुणब्यांच्या खालीं आहे.

**पस्तागिया**—काच्छिया जातीचें दुसरें नांव.

**पंचोळी**—ही एक शेतीचा धंदा करणारी लहान जात असून ती काठेवाडांत आढळते.

**पंडित**—वैदू जातीचें दुसरें नांव.

**पाटीदार**—कणबी जातीचें दुसरें नांव.

**पात्रदवा**—ही एक कलावंतिणींची व वेश्यांची जात असून ती मुख्यत्वेंकरून धारवाड जिल्ह्यांत आढळते. ह्या जातींतील पुरुष पात्रदवा गाऊं नाचूं लागल्या म्हणजे तबला व सारंगी वाजवून त्यांस साथ करितात. मुलींचीं लग्नें तवल्याबरोबर करतात. नंतर त्या वेश्यावृत्ती स्वीकारतात. मुलगे जातीबाहेरील मुलींबरोबर लग्नें करितात. त्यांना ज्या मुली होतात त्या कलावंतिणी होतात अथवा जातींतील पुरुषांबरोबर लग्नें करितात. पात्रदवांच्या चालीरीति कलावंतिणींप्रमाणें आहेत.

**पाथरवट**—मुख्यत्वेंकरून दक्षिण महाराष्ट्रांत व कर्नाटकांत सर्वत्र आढळतात. ते दगडाचें घडींव व कोरींव काम करितात. तसेंच मूर्ति, जातीं वगैरेही करतात. त्यांच्या रीतिभाती व धर्मसमजुती मराठा कुणब्यांप्रमाणें आहेत.

**पानबाले**—बारी जातीचें दुसरें नांव.

**पारधी**—किंवा शिकारी मुख्यत्वेंकरून खानदेश, नाशिक, सोलापूर आणि विजापूर जिल्ह्या व गुजराथेंतील कांहीं भागांत आढळतात. त्यांना महाराष्ट्रांत फांसे पारधी व विजापुरांत अडवी चिंचर (अरण्यांत संचार करणारे) अशींही नांवें आहेत. ह्या जातींत इतर जातींतून बहिष्कृत केलेल्या लोकांचा भरणा बराच असवा असें दिसतें. रजपूत, कोळी, वाघ्री, धनगर, कब्बलिगर आणि कोर्चर ह्या जातींच्या लोकांस त्यांत सामील करून घेतल्याचें स्पष्ट दिसतें. ते पुष्कळ भाषा बोलतात, आणि त्यांची एक गुप्त भाषाही आहे. ती गुजराथी, मराठी, अथवा कानडी जाणणारांनाही बिलकूल समजत नाहीं. ते मुख्यत्वेंकरून डुकरें, मोर, कवडे, लावे आणि पोपट पकडून विकतात. कांहीं जातीं करितात. चोऱ्यामाऱ्या करण्याबद्दलही त्यांची प्रसिद्धि आहे.

पारध्यांत ( १ ) पारधी, ( २ ) फांसे पारधी, ( ३ ) हरण पारधी किंवा चिग्रीबेटकर, ( ४ ) मीर, ( ५ ) कोर्चार आणि ( ६ ) वाघ्री असे सहा पोटभेद आहेत. त्यांच्यांत पांच कुळें आहेत असें सांगतात; परंतु लग्नें ठरवितांना बहुधा देवकच पाहाण्यांत येतें. ज्यांचें देवक एक असतें त्यांच्यांत शरीरसंबंध होत नाहीं. त्यांच्यांत ( १ ) अरई, ( २ ) बोर, ( ३ ) शमी, ( ४ ) आंबा, ( ५ ) जांभूळ, ( ६ ) उंबर इत्यादि देवकें आहेत. आतेबहिणीशीं, मामेबहिणीशीं अथवा मावसबहिणीशीं लग्न करितां येतें. भावाभावांस बहिणींबहिणींबरोबर लग्न करतां येतें. लग्नें अगदीं लहानपणीं अथवा वयांत आल्यानंतरही करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. विधवेस मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न करितां येतें. सोडचिठ्ठी देतां येते.

पारधी विशेषतः जरीमरी, अंबा, भवानी आणि खंडोबा यांस भजतात. त्यांच्यांतील एका कुलाची कुलदेवी गुजराथेंतील प्रसिद्ध पावागडाची देवी आहे. त्यांचीं लग्नें ब्राह्मण चालवितात. अंत्यविधि जातींतील जाणते चालवितात. मृतांस पुरतात. मृतांच्या तृप्त्यर्थ कित्येक महालय करितात, कित्येक कांहींच करीत नाहींत.

पारधी मांस खातात व दारू पितात. फांसे पारधी गोमांसही खातात असें म्हणतात.

**पारधी**—टकारी जातीचें दुसरें नांव.

**पार्सी**—मुख्यत्वेंकरून मुंबई शहर, गुजराथ प्रांत व ठाणें व पुणें येथें आढळतात. पर्शिया म्हणजे इराणांत राहणारे ते पार्सी. ते झोरोस्ट्रियन धर्माचे अनुयायी आहेत. मुसलमानांनीं इराण देश जिंकून बहुतेक पार्श्यांस बाटवून मुसलमान केलें. तेव्हां धर्मरक्षणासाठीं कांहीं पार्सी इ. स. ७५१ च्या सुमारास हिंदुस्थानास यावयास निघाले. ते प्रथम काठेवाडांत दीव येथें येऊन तेथें एकोणीस वर्षें राहिले. तेथून ते संजानास गेले. त्या वेळीं तेथें जादी राणा नांवाचा राजा राज्य करीत होता. त्यानें त्यांस कांहीं अटींवर राहण्यास परवानगी दिली. तेथें ते सरासरीं तीनशें वर्षें राहिले आणि मग हळू हळू इतर भागांत पसरले.

पार्सी लोक एकेश्वरमतवादी आहेत. त्यांच्या देवाचें नांव अहुरमझ्द. ते अग्नीस देवाचें प्रतीक मानतात व अग्यारींत ( देवळांत ) अग्नीची विधिपूर्वक स्थापना करून त्याची पूजा करितात.

पार्सी सर्व प्रकारचे धंदे करितात. व्यापार व इतर सर्व प्रकारच्या व्यवसायांत ते सर्वांत पुढें असून दानशूरत्वाबद्दल त्यांची फार प्रसिद्धि आहे.

पार्सी मांसाहारी आहेत, पण ते गोमांस खात नाहींत. ते दारू पितात.

**पावैय्या**—ह्यांस फाटडा किंवा हिजडा असेंही म्हणतात. हे गुजराथेंत सर्वत्र आढळतात. पावैय्या हिंदु असतात आणि मुसलमानही असतात. दोघेही आपणांस बहुचरा देवीची प्रजा अथवा गृहें किंवा मंदिरें समजतात. हिंदु आणि मुसलमान पावैय्यांचा अन्नव्यवहार होत नाहीं. बाकी ते सर्व बाबतींत सारखेच असतात. असें सांगतात कीं, चांपानेरास बारिया नांवाचा एक राजा होता. त्यांस पुत्रसंतान नसल्यामुळें तो फार कष्टी असे. तो बहुचराजीचा परम भक्त होता. तिच्या प्रसादानें त्यास एक मुलगा झाला. त्याचें नांव जेटो असें ठेवण्यांत आलें. हा मुलगा नपुंसक असल्यामुळें बारियानें त्याला बहुचराजीच्या सेवेस वाहिलें. एकदा बहुचराजीनें जेटोस स्वप्नांत येऊन सांगितलें कीं, तूं

आपलें जननेंद्रिय कापून टाकून स्त्रीवेश धारण कर. जेटोनें त्याप्रमाणें केलें आणि तेंव्हांपासून ही चाल पावैय्यांत प्रचलित आहे.

ह्या जातींत नपुंसकांसच सामील करून घेण्यांत येतें. सामील करून घेण्यांत येणाऱ्या प्रत्येकास जननेंद्रिय कापण्याचा विधि करावा लागतो. ह्या विधीस गायकवाड सरकारनें आपल्या राज्यांत सन १८८० त बंदी केली. तेव्हां पावैय्यांस फार दुःख झालें. कारण त्यांची समजूत अशी आहे कीं, हा विधि न केल्यास देवीचा रोष होतो व पुढील सात जन्मांत त्यांना नपुंसकत्व प्राप्त होतें.

पावैय्या बहुचराजीच्या स्तुतिपर गाणीं गात भिक्षा मागून उदरनिर्वाह करितात.

**पालवडा कोतवालिया**—विंटोळिया जातीचें दुसरें नांव.

**पांगुळ**—मुख्यतः दक्षिण महाराष्ट्रांत आढळतात. त्यांची उत्पत्ति देवास वाहिलेल्या एका पांगळया मनुष्यापासून झाली आहे असें सांगतात. ते गांवोगांव भिक्षा मागत भटकत असतात. त्यांच्या रीतिभाती मराठा कुणब्यां-प्रमाणें आहेत.

**पांचकळशी**—मुख्यत्त्वेंकरून ठाणें व कुलाबा जिल्ह्यांत व मुंबई शहरांत आढळतात. त्यांना सोमवंशी क्षत्रिय पाठारे असेंही म्हणतात. ते बिंब किंवा भीम राजाबरोबर गोदावरीच्या तीरावरील पैठणाहून इसवी सनाच्या तेराव्या शतकाच्या अखेरीस ठाण्या-मुंबईकडे आले. ते मूळ क्षत्रिय होते, पण हल्लीं ते बहुधा शेती, सुतारकाम व दुसरीं कारागिरीचीं कामें करून उदरनिर्वाह करि-तात. मुंबईंत राहणाऱ्या पांचकळशांपैकीं पुष्कळ लोक कारकुनी करितात व कांहीं वकील व डॉक्टर आहेत. त्यांच्यांत ( १ ) बाडवळ आणि ( २ ) साष्टीकर आणि अष्टागरकर असे दोन मुख्य पोटभेद आहेत. त्यांचा परस्पर रोटीव्यवहार होतो, पण बेटीव्यवहार होत नाहीं. माळेकर अथवा माळी या नांवाचा तिसराही एक पोटभेद आहे. तो चौलच्या माळभागांत आढळतो. वरील दोन्ही पोटभेदांचा ह्या तिसऱ्या पोटभेदाशीं कोणत्याही प्रकारचा व्यवहार होत नाहीं. त्याचप्रमाणें जंजिरा संस्थानांतील पांचकळशी हा

एक स्वतंत्र पोटभेद असून त्यांचा इतर पांचकळशांशीं कोणत्याही प्रकारचा संबंध नाहीं.

पांचकळशांच्या सर्वही पोटभेदांत गोत्रें आहेत. सगोत्रियां[illegible]रीरसंबंध होत नाहीं. मामेबहिणीशीं किंवा मावसबहिणीशीं लग्न करतां येतें; परंतु आतेबहिणीशीं करतां येत नाहीं. भावाभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करतां येतें. विधवाविवाहास मोकळीक आहे, पण असे विवाह फारसे होत नाहींत. सोडचिठ्ठी देतां येत नाहीं.

पांचकळशी सर्व देवतांस भजतात. प्रत्येक कुळाची महालक्ष्मी, एकवीरा, वज्रेश्वरी, जोगेश्वरी, वगैरे एक एक कुळदेवी असते. त्यांचे उपाध्ये माध्यंदिन शाखेचे यजुर्वेदी देशस्थ ब्राह्मण असतात.

ते मांस खातात व दारू पितात. ते ब्राह्मणांशिवाय इतरांच्या हातचें अन्न खात नाहींत.

**पांचाळ**—मुख्यत्वेंकरून कर्नाटकांत आणि दक्षिण महाराष्ट्रांतील कांहीं भागांत आढळतात. म्हैसूर संस्थानांत आणि मद्रास इलाख्यांतही त्यांची संख्या बरीच आहे. पांचाळ हा शब्द 'पंच चाळ' म्हणजे 'पांच हुन्नर' ह्या शब्दावरून निघाला आहे, आणि त्यांत सोनार, सुतार, लोहार, तांबट आणि पाथरवट इतक्या शिल्पकारांचा समावेश होतो. ह्या सर्वही शिल्पकारांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होतो. पांचाळांशिवाय हे धंदे करणाऱ्या दुसऱ्या पांच स्वतंत्र जाती आहेत, त्यांचा आणि पाचाळांचा कोणत्याच प्रकारचा संबंध नाहीं. पांचाळांचा त्यांच्याशीं रोटीबेटीव्यवहार होत नाहीं.

देवांचा शिल्पकार विश्वकर्मा याचे जे पांच पुत्र मनू, मया, त्वष्टा, शिल्पी आणि दैवज्ञ त्यांजपासून आपली उत्पत्ति झाली आहे असें पांचाळ सांगतात. त्यांच्यांत सानक, सनातन, अहभुवन, प्रत्न आणि सुपर्ण अशीं पांच गोत्रें आहेत. ते आपण ब्राह्मण आहों असें प्रतिपादितात. हें त्यांचें म्हणणें खरें दिसतें. कारण, जेव्हां जेव्हां त्यांच्या ब्राह्मणत्वाबद्दल वाद उपस्थित झाले आहेत तेव्हां तेव्हां धर्मगुरूंनीं त्यांच्याच तर्फे निकाल दिलेला आहे. ते ब्राह्मणांचे संस्कार पाळतात. त्यांचे उपाध्ये त्यांचेच ब्राह्मण असतात.

पांचाळांत ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मणांप्रमाणें भाचीबरोबर लग्न करितां येतें. मुलींचीं लग्नें त्या वयांत येण्यापूर्वी करितात, मुलांचीं मुंज झाल्यानंतर केव्हांही करितात. विधवाविवाहास मोकळीक नाहीं, पण ब्राह्मणांप्रमाणें केशवपन करीत नाहींत. सोडचिठ्ठी देतां येत नाहीं.

पांचाळांत स्मार्त आणि वैष्णव ह्या दोन्ही पंथांचे अनुयायी आहेत. त्यांची कुलदेवी कालिका. तिचें पवित्र स्थान बेळगांव जिल्ह्यांतील सिरसंगी गांवीं आहे. त्यांचे सर्व संस्कार ब्राह्मणांप्रमाणेंच होतात.

ते शाकाहारी असून दारू पीत नाहींत. ते दुसऱ्या कोणत्याही जातीच्या लोकांच्या हातचें अन्न खात नाहींत.

**पिल्ले** किंवा पिल्लाई मुख्यत्वेंकरून बेळगांव, धारवाड आणि विजापूर येथें थोडथोडे आढळतात. तामिल देशांतील शेती करणारी मोठी जात जी वेल्लाळा तिचेंच पिल्ले हें एक नांव आहे. इकडे आढळणारे पिल्ले तिकडूनच इकडे आलेले आहेत. ते कारकुनी करून उदरनिर्वाह करितात.

**पिपावासी**—दर्जी जातीचें दुसरें नांव.

**पिंजारी**—किंवा पिंजारा इलाख्यांत सर्वत्र आढळतात. त्यांत हिंदूंपेक्षां मुसलमानांचा भरणा जास्त आहे. ते कापूस पिंजून गाद्या, उशा वगैरे भरण्याचा धंदा करितात. हिंदू पिंजाऱ्यांच्या चालीरीति कुणब्यांप्रमाणें असून मुसलमान पिंजाऱ्यांच्या त्यांच्या दर्जाच्या इतर मुसलमान जातींप्रमाणें आहेत.

**पुरभय्या**—संयुक्त प्रांतांतून महाराष्ट्रांत व गुजराथेंत आलेले लोक.

**पेंढारी**—किंवा पिंढारी मुख्यत्वेंकरून दक्षिण महाराष्ट्रांतील कांहीं भागांतून आढळतात. मराठा सत्तेच्या काळांत त्यांच्या लष्कराबरोबर लुटालूट करणारें जें बाजारबुणगें असे, त्यांतून ही जात निर्माण झाली आहे असें दिसतें. अजूनही पेंढारी दुसऱ्या जातीच्या लोकांस आपल्या जातींत घेतात. ते पूर्वी लुटालूट करून उदरनिर्वाह करीत. परंतु इंग्रजांनीं शांतता प्रस्थापित केल्यापासून ते स्थायिक झाले असून लहानसहान व्यापारउदीम करून पोट भरतात. कांहीं दिवसमजुरी करितात व कांहीं गवंडीकाम करितात.

त्यांच्यांत पांच कुळें आहेत. एकाच कुळांतील स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. मामेबहिणीशीं लग्न करितां येतें. आतेबहिणीशीं व मावसबहिणीशीं करतां येत नाहीं. भावाभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करितां येतें. लग्नें वयांत आल्यावर करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. अविवाहितास विधवेशीं लग्न करितां येत नाहीं. नवऱ्यास बायकोस काडी मोडून देतां येते. काडी मोडून दिलेल्या स्त्रीस दुसरें लग्न करतां येतें.

पेंढारी मुख्यत्त्वेंकरून मरीआई, म्हसोबा आणि खंडोबा यांस भजतात. ते मृत पूर्वजांचे टाक करून पुजतात. त्यांचीं लग्नें ब्राह्मण चालवितात. इतर विधि जातींतील जाणते चालवितात. मृतांस पुरतात. दर वर्षीं मृततिथीच्या दिवशीं, अक्षतृतीयेस आणि भाद्रपद महिन्यांत पितरांस जेऊं घालतात.

ते मांस खातात व दारू पितात.

**प्रभू**— मुख्यत्त्वेंकरून ठाणें व कुलाबा जिल्हा व मुंबई शहर येथें आढळतात. त्यांच्यांत चांद्रसेनीय कायस्थ आणि पाठारे किंवा पाताणे असे दोन पोटभेद आहेत. त्यांच्यांत रोटीबेटीव्यवहार होत नाहीं.

**चांद्रसेनीय कायस्थ प्रभू**—औधचा क्षत्रिय राजा चंद्रसेन याजपासून आपली उत्पत्ति झाली आहे असें सांगतात. हें त्यांचें म्हणणें ऐतिहासिक पुराव्यानें सिद्ध झालेलें आहे. ते त्रैवर्णिकांपैकीं क्षत्रिय असून ब्राह्मणांप्रमाणेंच त्यांच्यांत उपनयन संस्कार करितात. त्यांच्यांत दवणे ह्या नांवाचा एक पोटभेद होता. त्यांजबरोबर अलीकडे त्यांचा सर्रास रोटीबेटीव्यवहार होऊं लागल्यामुळें तो लुप्तप्राय झाला आहे. त्यांच्यांत पंचवीस गोत्रें आहेत. प्रत्येक गोत्राचे लोक, ज्या ऋषीचें नांव त्या गोत्रास पडलेलें आहे त्या ऋषीचे शिष्य आहेत असें मानण्यांत येतें. सगोत्र्यांचा विवाह होत नाहीं. तसेंच पुरुषाच्या बाजूनें सहा पिढ्यांच्या आंत व स्त्रीच्या बाजूनें चार पिढ्यांच्या आंत शरीरसंबंध करतां येत नाहीं.

चांद्रसेनीय कायस्थ प्रभू विष्णूपेक्षां शिवाची भक्ति विशेष करितात. ते इतर हिंदूंप्रमाणें खंडोबा, भैरव इत्यादि गौण देवतांसही भजतात. त्यांचा लग्नविधि विवाहमंडपांत होतो, तसेंच लग्न लावते वेळीं नवरानवरीच्या मस्तकावर

दोन तरवारी एकमेकींवर आडव्या धरतात. ही एक गोष्ट शिवाय करून त्यांचे सर्व धर्मविधि ब्राह्मणांप्रमाणेंच असतात. ब्राह्मणांप्रमाणेंच त्यांच्यांत विधवाविवाह व सोडचिठ्ठी यांस प्रतिबंध आहे. त्यांचे उपाध्ये ब्राह्मण असतात.

चांद्रसेनीय कायस्थ प्रभू मूळचे क्षत्रिय, पण हल्लीं त्यांनीं कारकुनी पेशा पतकरला असून, ते ब्रिटिश अमलांत व संस्थानांत निरनिराळ्या दर्जाच्या नोकरीवर आहेत.

ते मांस खातात. ते फक्त महाराष्ट्र ब्राह्मणांच्याच हातचें अन्न खातात.

**पाठारे** किंवा **प्राताणे प्रभू**—हेही चांद्रसेनीय कायस्थांप्रमाणेंच क्षत्रिय असून त्यांचें क्षत्रियत्व शृंगेरी मठाच्या शंकराचार्यांनींही कबूल केलें आहे.

पाठारे प्रभू हे कनोज आणि राजपुताना येथील प्रतिहार राजांचे वंशज आहेत असें ऐतिहासिक पुराव्यावरून दिसून येतें. त्यांचें मूलस्थान सौराष्ट्रांत आणि संयुक्त प्रांतांत असून तेथून ते इसवी सनाच्या अकरा आणि बाराव्या शतकाच्या दरम्यान गोदावरीच्या तीरावर पैठणास गेले, आणि तेराव्या शतकाच्या अखेरीस ते उत्तर कोंकणांत आले.

पाठारे प्रभूंत ध्रुव प्रभू नांवाचा एक लहानसा पोटभेद आहे, त्यांच्याशीं त्यांचा रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. त्यांच्यांत ब्राह्मणांप्रमाणें गोत्रें आहेत. सगोत्र्यांचा विवाह होत नाहीं. विधवाविवाह व सोडचिठ्ठी यांस प्रतिबंध आहे.

पाठारे प्रभू बहुधा स्मार्त पंथाचे अनुयायी आहेत. त्यांचा धर्मगुरु शृंगेरा मठाचा शंकराचार्य. पूर्वीं त्यांचे उपाध्ये शुक्ल यजुर्वेदी देशस्थ ब्राह्मण होते, पण हल्लीं बहुधा ऋग्वेदी देशस्थ, कऱ्हाडे किंवा चित्पावन असतात.

पाठारे प्रभू मुख्यत्वेंकरून कारकुनीचा धंदा करितात. एके काळीं मुंबईंतील कारकुनीचा धंदा सर्वस्वीच त्यांच्या ताब्यांत होता, इतका कीं, प्रभू हें नांव इंग्रजी कारकुनाशीं समानार्थक झालें होतें.

ते मांस खातात, पण दारू पिण्यास त्यांच्या जातींत प्रतिबंध आहे. ते फक्त ब्राह्मणांच्याच हातचें अन्न खातात.

**पोमला**—मुख्यत्वेंकरून अहमदाबाद, सुरत आणि भडोच जिल्ह्यांत आढळतात. त्यांच्या भाषेचें तेलगू भाषेशीं बरेंच साम्य असल्यामुळें ते तेलगू

प्रांतांतून इकडे आले असावेत असें दिसतें. ते हिंदुस्थानांतील मूळ रहिवाशां-पैकीं असावेत असें दिसतें. बायको बाळंतीण झाली म्हणजे बाळंतिणीचे सर्व संस्कार नवऱ्यास करावयाची चाल त्यांच्यांत प्रचलित आहे. ते लक्ष्मी मातेचे मोठे भक्त आहेत. पूर्वी ते नाडेभोरीप करीत, पण हल्लीं टोपल्या विणून पोट भरतात.

**फाटडा**—पावैय्या जातीचें दुसरें नांव.

**फांसे पारधी**—पारधी जातीचें दुसरें नांव.

**फुदगी**—मुख्यत्वेंकरून ठाणें जिल्ह्यांत माहिम आणि वसई तालुक्यांत आढळतात. आपली उत्पत्ति हनुमंतापासून झाली आहे अशी त्यांची समजूत असून ते त्याची अतिशय भक्ति करितात. पूर्वी ते चोऱ्या करीत व भिक्षा मागत गांवोगांव भटकत असत. पण हल्लीं तें स्थायिक झाले असून क्वचित प्रसंगीं लहानसहान चोऱ्या करतात. आपण मारुतीला प्रिय असल्यामुळें, रानां-तील भुईकमलें, पाण्यांतील कमळें आणि सर्व प्रकारचीं फळझाडें यांचे आपण जन्मसिद्ध मालक आहों अशी विलक्षण समजूत त्यांच्यांत प्रचलित आहे. त्यामुळें त्यांची चोरी करतांना जर कोणी त्यांस पकडलें, तर माळी अथवा सरकार आपणास इतक्या कडक रीतीनें कां वागवतें याचें त्यांस आश्चर्य वाटतें. ते म्हणतात, "वानर आणि कोल्हे केळींच्या झाडांची आणि उंसांची नासाडी करतात. मग आम्हीं जर पोटासाठीं कांहीं फळें अथवा भाज्या नेल्या तर त्यांत काय बिघडतें ?"

फुदग्यांमध्यें शिनवारी फुदगी आणि किरपाल फुदगी असे दोन पोटभेद आहेत. त्यांत शिनवारी मुख्य आहेत. शनिवार हा मारुतीचा दिवस असल्या-मुळें त्यांस शिनवारी हें नांव पडलें असावें. पोर्तुगीजांनीं ज्यांस जबरदस्तीनें ख्रिश्चन धर्माची दीक्षा दिली व माहिम आणि वसई मराठ्यांनीं जिंकल्यानंतर जे हिंदुधर्मांत परत आले त्या फुदग्यांचे किरपाळ फुदगी हे वंशज आहेत.

फुदग्यांत लग्नें वयांत आल्यानंतर करितात. विधवाविवाहास व सोडचिठ्ठीस मोकळीक आहे. ते मुख्यत्वेंकरून हनुमान, चेडा आणि बीरा ह्यांस भजतात. त्यांचे उपाध्ये माध्यंदिन शाखेचे यजुर्वेदी देशस्थ ब्राह्मण असतात. ते मृतांस

जाळतात. मृत्यूच्या तिसऱ्या दिवशीं प्रेत जाळलेल्या जागेवर मृताच्या तृप्तीसाठीं अन्न, कोंबडीं व दारू ठेवितात.

फुदगी मुख्यतः दिवसमजुरी करून पोट भरतात.

ते मांस खातात व दारू पितात.

**बजानिया**—ह्यांस ढोली असेंही म्हणतात. ते गुजराथेंत सर्वत्र आढळतात. आपलें नांव आपली कुलदेवी बजई माता हिच्यावरून पडलें असून आपल्या जातीचा संस्थापक शामळिया नायक होता असें ते सांगतात. ते नाडेभोरपें करीत व वाजंत्रें वाजवीत दहा दहा बारा बारा जणांच्या टोळ्या करून आपल्या नाईकाच्या हुकमाप्रमाणें गांवोगांव भटकत असतात. भटकत असतांना ते तंबूंत राहतात. पावसाळ्यांत तात्पुरत्या झोंपड्या बांधून त्यांत राहतात. ते एके ठिकाणीं फक्त एक पंधरवडाच राहतात. प्रत्येक टोळीस निरनिराळी हद्द नेमून दिलेली असते. तिच्या आंतच तिनें फिरलें पाहिजे. एका टोळींतले लोक जर दुसरीच्या हद्दींत गेले तर त्यांस जातीबाहेर टांकतात.

बजानियांत बजानिया आणि माळवी असे दोन पोटभेद आहेत. माळवी दोरावर कसरतीचें काम करीत असल्यामुळें त्यांस बजानियांपेक्षां हलके समजण्यांत येतें. ह्या दोन्ही पोटभेदांचा रोटीव्यवहार होतो, पण बेटीव्यवहार होत नाहीं. त्यांच्यांत तीन कुळें आहेत. एकाच कुळांतील स्त्रीपुरुषांत, तसेंच सात पिढ्यांच्या आंत शरीरसंबंध होत नाहीं. आतेबहिण, मामेबहिण अथवा मावसबहिणीबरोबर लग्न करतां येत नाहीं. भावाभावांस बहिणीवहिणींबरोबर लग्न करतां येतें. लग्नें बहुधा अगदीं लहानपणींच करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. विधवेस मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न करतां येतें. सोडचिठ्ठी देतां येते.

बजानिया बिजमार्गी पंथाचे अनुयायी आहेत. ते विशेषेंकरून शिकोतरिया आणि खोडियार देवींस भजतात. त्यांचे उपाध्ये त्यांच्याच जातीचे असतात. विवाहविधी नवरीचा चुलता किंवा तिच्या कुटुंबांतील कोणी तरी जाणता पुरुष चालवितो. मृतांस पुरतात. त्यांच्या शांत्यर्थ कोणतेच विधी करण्यांत येत नाहींत.

ते मांस खातात व दारू पितात.

**बढाई**—मुख्यत्वेंकरून पुणें शहरांत आढळतात. ते निजामचें राज्य व मध्यप्रांत येथून आलेले असून तेथील बढायांप्रमाणेंच सुतारकाम करून पोट भरतात.

**बहुरुपी**—किंवा भोरपी हे नानातऱ्हेचीं सोंगें घेऊन लोकांची करमणूक करून उपजीविका करितात. ते इलाख्यांत बहुतेक सर्व ठिकाणीं फिरत असतात. ते मराठा कुणब्यांप्रमाणें दिसतात आणि त्यांच्या चालीरीतीही त्यांच्याचप्रमाणें आहेत. ते मुख्यत्वेंकरून बहिरोबा, जनाई, जोखाई आणि खंडोबा यांस भजतात. त्यांच्यापैकीं पुष्कळ लोक त्यांच्या मुख्य धंद्याशिवाय गुरांचीही पैदास्त करितात.

**बंजारा**—लमाणी जातीचें दुसरें नांव.

**बंजारी**—लमाणी जातीचें दुसरें नांव.

**बंधारा**—किंवा गलियारा गुजराथेंत सर्वत्र आढळतात. ते मारवाडांतून आले आहेत अशी समजूत आहे. परंतु हल्लीं त्यांचा मारवाडांतील त्यांच्या जातीच्या लोकांशीं शरीरसंबंध होत नाहीं. सात पिढ्यांच्या आंत लग्न करण्यास प्रतिबंध आहे. मुलींचीं लग्नें अकरा वर्षांच्या आंत करितात. मुलांच्या लग्नास वयाची मर्यादा नाहीं. विधवाविवाहास मोकळीक आहे. विधवेस मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न करतां येतें. सोडचिठ्ठी देण्याचा प्रघात नाहीं.

बंधारा राधावल्लभ पंथाचे अनुयायी आहेत. त्यांचे उपाध्ये ब्राह्मण असतात.

त्यांचा मुख्य धंदा चिटें रंगविण्याचा व छापण्याचा आहे. कांहीं विणकामही करितात.

ते मद्यमांस सेवन करीत नाहींत.

**बाकड**—किंवा बाकडिग कानडा जिल्ह्यांत फक्त अंकोला तालुक्यांत आढळतात. ते आपणास बांट म्हणजे योद्धे म्हणवितात आणि दक्षिण कानड्यांतील बांट नांवाच्या शेती करणाऱ्या जातीचेच आपण आहों असें सांगतात. परंतु ते बांटानीं जातींबाहेर टाकलेले लोक असावे असें दिसतें, व त्यांच्यांत

जे पोटभेद आहेत त्यांवरून त्यांच्यांत इतर जातींच्या लोकांचीही भरती झाली असावी असें दिसतें. हे पोटभेद पुढें दिल्याप्रमाणें आहेत:—(१) कोंकण, (२) जैन, (३) कुणबी, (४) करे वक्कल, (५) शेरगी वक्कल, (६) बोंट, (८) मराठा.

मुलींचीं लग्नें पांच वर्षांपासून त्या वयांत येईपर्यंत करितात, मुलांचीं सोळा ते पंचवीस वर्षांच्या दरम्यान करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. सोड-चिठ्ठी देतां येते. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रीस दुसरें लग्न करतां येतें.

बाकड सर्व ग्रामदेवतांस भजतात. ते तिरुपतीच्या व्यंकटरमणाची विशेष भक्ति करतात. त्यांचे उपाध्ये हविक ब्राह्मण असतात. मृतांस जाळतात अथवा पुरतात.

ते शेतीचा धंदा करून उपजिवीका करितात.

ते मांस खातात व दारू पितात.

**बाकडिग**—बाकड जातीचें दुसरें नांव.

**बागडो**—ही एक गांवोगांव भटकणारी जात असून त्यांचें मूलस्थान कोल्हापूर संस्थानांत आहे. ते आपली उत्पत्ति वाल्मिकीपासून झाली असून आपण कोळी आहों असें सांगतात. कोळ्यांशीं त्यांचें बरेंच साम्य आहे. ते बहुधा मूळचे पश्चिम घांटांतील महादेव कोळी असावे.

त्यांच्यांत आडनांवांनीं दर्शविलीं जाणारीं अनेक कुळें आहेत. एकाच कुळां-तील स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. आतेबहिणीशीं अथवा मामेबहिणीशीं लग्न करतां येतें. मावसबहिणीशीं लग्न करतां येत नाहीं. भावांभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करतां येतें. लग्नें लाहानपणीं अथवा वयांत आल्या-नंतरही करितात. विधवाविवाहास मोकळिक आहे. सोडचिठ्ठी देतां येते. सोड-चिठ्ठी दिलेल्या स्त्रीस विधवाविवाहविधीनें दुसरें लग्न करतां येतें.

बागडी मुख्यत्वेंकरून म्हसोबास भजतात. त्यांचे उपाध्ये ब्राह्मण असतात. ज्यांस शक्ति असते ते मृतांस पुरतात; इतर जाळतात.

बागड्यांचा परंपरागत धंदा घोंगड्या विणण्याचा व मासे मारण्याचा आहे. ते भिक्षा मागतात आणि भविष्यही सांगतात. कांहीं मजुरी करतात.

ते मांस खातात व दारू पितात.

**बागडे ठाकर**—बागडी जातीचें दुसरें नांव.

**बाब्रिया**—मुख्यत्वेंकरून काठेवाडांत सोरठ प्रांतांतील बाब्रियावाडांत आढळतात. त्यांच्या मालकीच्या गांवांतील रहिवाशी त्यांस दरबार किंवा घरदेरा असें म्हणतात. ते सर्व लहान मोठे जमीनदार असून त्यांचा मुख्य देदनचा तालुकदार आहे.

बाब्रिया हे काठी आणि अहिर यांस जोडणारा दुवा आहे. ते साखायत काठ्यांस आपल्या मुली देतात आणि अहिरांच्या मुली आपल्या मुलांस करितात. त्यांच्यांत ढांकला, कोटिला आणि वरू अशीं तीन कुळें आहेत. एकाच कुळांतील स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. आतेबहिणीशीं व मामेबहिणीशीं लग्न करतां येतें. मावसबहिणीशीं करतां येत नाहीं. भावाभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करतां येतें. मुलांचीं लग्नें पंधरा ते वीस आणि मुलींचीं बारा ते पंधरांच्या दरम्यान करितात. विधवाविवाहास मोकळिक आहे. विधवेनें मृत पतीच्या धाकट्या भावाशीं, त्याची इच्छा असल्यास, लग्न केलेंच पाहिजे असा निर्बंध आहे. सोडचिठ्ठी देतां येते.

बाब्रिया रामदासी, रामानुज आणि स्वामीनारायण पंथाचे अनुयायी आहेत. प्रत्येक कुळाची एक एक कुलदेवता असते. त्यांत चामुंडा मुख्य आहे. त्यांचे उपाध्ये ब्राह्मण असतात. ते मृतांस जाळतात व श्राद्धें करितात.

ते मांस खातात व दारू पितात.

**बारकर**—कव्वलिगर जातीचें दुसरें नांव.

**बारवाशिया**—भंगी जातीचें दुसरें नांव.

**बारी**—यांस पानवाले असेंही म्हणतात. हे मुख्यत्वेंकरून खानदेश व ठाणें जिल्ह्यांत आढळतात. बारी हें नांव कधीं कधीं तांबोळ्यांसही लावण्यांत येतें. बारी ह्या नांवाची एक जात संयुक्त प्रांतांतही आहे. ते पत्रावळी व द्रोण करून विकतात, मशाली धरतात व घरकामास नोकरीस राहतात. बेहारमधील बारी विड्याचीं पानेंही विकतात. ठाणें जिल्ह्यांतील शेती

करणारे वाणी गुजराथेंतून आलेले आहेत असें सांगतात. त्यांच्या बायकांचा पेहराव गुजराथी स्त्रियांप्रमाणें असतो व ते गुजराथी भाषाही बोलतात. या सर्व गोष्टींवरून बाऱ्यांचें मूलस्थान उत्तर हिंदुस्थानांत असून ते गुजराथ आणि वऱ्हाड प्रांतांतून खानदेशांत आले असावे असें दिसतें.

बाऱ्यांत देशी आणि नेमाडी किंवा घाटोळे असे दोन पोटभेद आहेत. त्यांच्यांत पुष्कळ कुळें आहेत. तीन पिढ्यांच्या आंत लग्न करतां येत नाहीं. आतेभाऊ, मामेभाऊ अथवा मावसभाऊ, यांच्याशीं लग्न करतां येत नाहीं. भावांभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करतां येतें. विधवाविवाहास मोकळिक आहे. विधवेस मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न करतां येतें. जातीच्या पंचांच्या परवानगीनें नवऱ्यास बायकोस काडी मोडून देतां येतें.

बारी विड्यांच्या पानांची लागवड करून तीं घाऊक विकण्याचा धंदा करितात.

ते मांस खातात व दारू पितात.

त्यांच्या चालीरीति आणि धर्मसमजुती मराठा कुणब्यांप्रमाणें आहेत.

**बारेकरी**—कब्बलिगर जातीचें दुसरें नांव.

**बालसंतोषी**—मुख्यत्वेंकरून दक्षिण महाराष्ट्रांत आढळतात. ते भविष्य कथन करीत आणि भिक्षा मागत गांवोगांव भटकत असतात. त्यांची भिक्षा मागण्याची वेळ अगदीं पहाटेस असते. ते मुलांना आशीर्वाद देतात व प्रत्येक आशीर्वादाच्या शेवटीं 'बालसंतोष' असें म्हणतात. त्यावरूनच त्यांस बालसंतोषी हें नांव पडलें आहे. त्यांच्या रीतिभाती व धार्मिक आचार कुणब्यांप्रमाणें आहेत.

**बावचा**—मुख्यत्वेंकरून अहमदाबाद जिल्ह्यांत व बडोदें संस्थानांत आढळतात. आपण पूर्वी वाणी असून शिरी किंवा वर्षादोडीचीं सफेत फुलें खाल्ल्यामुळें आपणांस सध्यांची हीन स्थिति आली असें ते सांगतात. बहुधा सात पिढ्यांच्या आंत ते लग्नें करीत नाहींत. आतेभाऊ, मामेभाऊ, अथवा मावसभावाशीं लग्न करतां येत नाहीं. भावांभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न

करतां येतें. मुलांमुलींचीं लग्नें सात ते पंधरा वर्षांच्या दरम्यान करितात. विधवाविवाहास मोकळिक आहे. जातीच्या पंचाच्या परवानगीनें सोडचिठ्ठी देतां येते.

बावचा बालासुंद्री पंथाचे अनुयायी आहेत. त्यांचे सर्व धर्मविधी जातीचे कातवाल ( पुढारी ) चालवितात. मृतांस पुरतात. त्यांच्या शांत्यर्थ कोणतेच विधी केले जात नाहींत.

ते गवत विकून व मोतद्दाराचें काम करून पोट भरतात. कांहीं मजुरीही करितात.

ते मांस खातात व दारू पितात.

**बावा**—किंवा बैरागी इलाख्यांत सर्वत्र आढळतात. ते वैष्णव पंथाचे अनुयायी असून दारोदार भिक्षा मागून उदरनिर्वाह करितात. बावा अनेक जातींचे असतात. त्यांची स्वतंत्र अशी जात नाहीं.

**बांदी**—मुख्यत्वेंकरून कानडा जिल्ह्यांत आढळतात. ब्राह्मण आणि दुसरे उच्च जातीचे लोक त्यांस घरकामास नोकरीस ठेवितात. लढाईंत पकडून आणलेल्या अथवा विकत घेतलेल्या स्त्रियांपासून, किंवा वाईट मार्गानें गेल्यामुळें जातीबाहेर टाकलेल्या स्त्रियांपासून त्यांची उत्पत्ति झाली आहे असें दिसतें. अजूनही ह्या जातींत दुसऱ्या प्रकारच्या लोकांची भरती केली जाते. परंतु उच्च जातींच्या लोकांचे विधी व निर्बंध पाळण्याची चळवळ त्यांच्यांत सुरू झाली असल्यामुळें, कालेंकरून त्यांच्या उत्पत्तीची हकीगत विसरली जाण्याचा संभव आहे. हल्लींच ते आपणास कोंकण देवदिग किंवा भंडारी म्हणूं लागले आहेत.

ह्या जातींत अजून व्यवस्थित कुळांची रचना झालेली नाहीं. तरी पण ते आपण अमुक कुळाचे अथवा बळीचे आहों असें सांगतात. त्यांच्यांत लग्नें क्वचितच होतात. सर्व स्त्रिया बहुधा वेश्यावृत्तीच स्वीकारतात. ज्या लग्न करितात त्याही सन्मार्गीनें चालत नाहींत. त्यांच्या चालीरीति व धार्मिक आचार भाविणींप्रमाणें आहेत.

**बुट्टाल्**—फक्त कानडा जिल्ह्यांत आढळतात. त्यांचें नांव कानडींतील ' बुट्टी ' म्हणजे ' टोपली ' ह्या शब्दावरून पडलेलें आहे. त्यांची गणना अस्पृश्यांत होते. ते सर्व ग्रामदेवतांस भजतात, परंतु जतगांच्या ठिकाणीं त्यांची भक्ति विशेष आहे. ते ब्राह्मणांस मान देतात, परंतु धर्मविधी चालविण्याचे कामीं त्यांची योजना करीत नाहींत. त्यांचे सर्व विधी जातीचे कोलकार ( प्रमुख ) चालवितात. त्यांचा परंपरागत धंदा टोपल्या विणण्याचा आहे. ते शेतावर मजुरीही करितात. ते मांस खातात व दारू पितात.

**बुडबुडकी**—जोशी जातीचें दुसरें नांव.

**बुंदेली भोई**—कहार जातीचें दुसरें नांव.

**बुरूड**--दक्षिण महाराष्ट्रांत आणि कर्नाटकांत सर्वत्र आढळतात. कर्नाटकांत त्यांस मेडर असें म्हणतात. त्यांचा आणि महाराष्ट्रांतील बुरुडांचा धंदाच काय तो एक आहे. बाकी त्या अगदीं स्वतंत्र जाता आहेत. बुरूड हिंदू जाहेत. मेडर बहुतांशीं लिंगायत आहेत. त्यांचें मेडर हें नांवही बसवाचा शिष्य मोडरकेट ह्याच्या नांवावरून पडलें आहे असें सांगतात. त्यानेंच त्यांस लिंगायत धर्माची दिक्षा दिली असावी. बुरुडांचा सामाजिक दर्जा अगदीं हलका आहे. मेडरांचा त्याहून उच्च प्रतीचा आहे. बुरूड आणि मेंडर वेळूच्या चटया, टोपल्या, सुपें व दुसऱ्या अनेक वस्तू करितात. हाच त्यांचा परंपरागत धंदा असून त्यांनीं तो अजून सोडलेला नाहीं.

बुरुडांत आडनांवानें दर्शविलीं जाणारीं अनेक कुळें आहेत. प्रत्येक कुळाचें एक एक देवक असतें. अशीं कांहीं देवकें पुढें दिलीं आहेत.

| कुळाचें नांव | | | | देवक |
|---|---|---|---|---|
| मोरे | ... | ... | ... | मोराचा पंख. |
| जगताप | ... | ... | ... | होळा. |
| पवार | ... | ... | ... | कोंबडा. |
| सुरवसे | ... | ... | ... | डुकर. |
| सोनवणे | ... | ... | ... | तरवड. |
| कोरडे | ... | ... | ... | रुई. |

| कुळाचें नांव | | | | देवक |
|---|---|---|---|---|
| खैरे | ... | ... | ... | खैर. |
| चिंचवले | ... | ... | ... | पिंपळ. |
| वडतळे | ... | ... | ... | वड. |

सात पिढ्यांच्या आंत लग्नें करितां येत नाहींत. मामेबहिणीशीं लग्न करितां येतें. विधवाविवाहास मोकळीक आहे. सोडचिठ्ठी देतां येते.

बुरूड मुख्यत्वेंकरून खंडोबा, जोतिबा, बहिरोबा, भवानी, राम, मारुती आणि विठोबा यांस भजतात. त्यांचे उपाध्ये देशस्थ ब्राह्मण असतात. मृतांस जाळण्यांत अगर पुरण्यांत येतें. मृतांच्या शांत्यर्थ मृततिथीच्या दिवशीं ब्राह्मणास आणि जंगमास शिधा देतात.

ते मांस खातात व दारू पितात.

**बेड**—बेरड जातीचें दुसरें नांव.

**बेडर**—बेरड जातीचें दुसरें नांव.

**बेने इस्रायल**—मुख्यत्वेंकरून मुंबई शहर, ठाणें आणि कुलाबा जिल्हा आणि जंजिरें संस्थानांत आढळतात. त्यांना यहुदी, ज्यू आणि शनवार तेली असेंही म्हणतात.

बेने इस्रायल हिंदुस्थानांत कधीं आले याबद्दल जरी निश्चित माहिती उपलब्ध नाहीं, तरी ते सहाव्या शतकांत आले असावे असा तर्क आहे. सरासरी चौदाशें वर्षांपूर्वीं आपण उत्तरेकडून हिंदुस्थानांत आलों अशीं दंतकथा त्याच्यांत प्रचलित आहे. मुंबई बंदराच्या दक्षिणेस नांवगांवच्या समोर त्यांचें गलबत फुटून त्यांच्यापैकीं सात पुरुष व सात स्त्रिया बचावल्या. हिंदु आणि मुसलमान राजांच्या अमलांत ते आपला काळ शांततेनें कंठीत होते असें दिसतें तसेंच त्यांनीं येथील स्त्रियांबरोबर लग्नेंही केलीं असावीं. कांहीं शतकांपूर्वीं डेविड रहबी नांवाचा एक ज्यू पुरोहित अरबस्थानांतून मुंबईस आला होता. त्यानें येथील ज्यूंस हिब्रू धर्माच्या मुख्य तत्त्वांचीं आणि आचार विचारांची माहिती करून दिली. तेव्हांपासून ते लोक आपला धर्म आस्थापूर्वक पाळूं लागले आहेत.

इस्रायल पुरुष बहुधा यूरोपियन पद्धतीचा पोशाख करितात. त्यांच्या बायका हिंदु स्त्रियांप्रमाणें लुगडीं नेसतात. ते मराठी भाषा बोलतात.

बेने इस्रायलांत गोरे व काळे असे दोन पोटभेद आहेत. त्यांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं.

बेने इस्रायल मुख्यत्वेंकरून शेतीचा आणि तेल काढण्याचा धंदा करितात. कांहीं सुतारकाम व मेस्त्रीकामही करितात. कित्येकांनीं इंग्रजी शिक्षण संपादन करून कारकुनी पतकरली आहे. त्यांच्यांतील बऱ्याच स्त्रिया नर्स आणि मिडवाइफचें काम करितात.

बेने इस्रायल एकेश्वरी मताचे अनुयायी आहेत. ते मूर्तिपूजा करीत नाहींत. त्यांच्या देवळांस सिनेगॉग म्हणतात. त्यांत त्यांचा धर्मग्रंथ जो जुना करार त्याच्या हस्तलिखित प्रती ठेवलेल्या असतात.

बेने इस्रायल गोमांस खातात. डुकर खात नाहींत. ते दारू पितात.

**बेरड**—बेडर किंवा बेड मुख्यत्वेंकरून कर्नाटकांत आढळतात. ते आपणास नाईकमक्कळू म्हणजे नाईकाचीं मुलें असें म्हणतात. त्यांना नाइकवाडी, तलवार आणि वाल्मिक अशींही नांवें आहेत. ह्यांपैकीं पहिलें व तिसरें नांव रामोशांसही आहे. बेरड आणि रामोशी ह्यांचा धंदाही एकच आहे. शिवाय दोघांतही हळगे नांवाचा एक पोटभेद आहे. या सर्व गोष्टींवरून बेरड आणि रामोशी मूळ एक असून पुढें भाषा व वास्तव्य यांमुळें त्यांच्या दोन जाती झाल्या असें दिसतें. तेलगू बोया आणि तामिल वेडन ह्यांच्याशींही बेरडांचा अगदीं निकट संबंध आहे असें वाटतें. रामोशी शिवाय करून ह्या सर्वही जाती आपली उत्पत्ति कनय्या नांवाच्या पुरुषापासून झाली आहे असें सांगतात. विजयनगरचा नाश झाल्यानंतर बरेच दिवस बेरड तें शहर लुटीत होते असें इतिहासांत वर्णन आहे. त्यांची स्वामिनिष्ठा अद्वितीय असल्यामुळे हैदर अल्लीनें त्यांस मुसलमानी धर्माची दीक्षा देऊन आपल्या सैन्यांत त्यांचीं स्वतंत्र पथकें बनविलीं होतीं. निजामच्या राज्यांतील शोरापूर संस्थानांत बेरडांचें राज्य होतें असें मेडोज टेलरचें म्हणणें आहे. इंग्रजी अमलाच्या सुरवातीच्या काळीं बेर-

डांपासून लोकांस बराच उपद्रव होत असे. त्याचा बंदोबस्त सन १८२०, साली करण्यांत आला. तथापि अजूनही ते मधून मधून चोऱ्यामाऱ्या करितात व दरवडेही घालतात. कांहीं बेरड शेती करितात, कांहीं तलवार ( गांवचे रखवालदार ) असून त्याबद्दल त्यांस इनाम जमिनी आहेत, कांहीं पाटील आहेत, कांहीं मजुरी करितात व कांहीं पारध करितात व जाळीं लावून पक्षी धरितात.

बेरडांत बेरड, दुर्गीमुर्गी, हळगे, जस किंवा म्यास, नाईकमक्कलू आणि रामोशी असे सहा पोटभेद आहेत. त्यांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं त्यांच्यांत पुष्कळ बेडगू (कुळें) आहेत. त्यांत म्हैसूर संस्थानांतील बेरडांच्या बेडगूंपैकीं बरेच आढळतात, व त्यावरून ह्या दोन्ही बेरडांचें मूळचें ऐक्य निदर्शनास येतें. बेडगू एकच असेल तर शरीरसंबंध करतां येत नाहीं. भाचीशीं व मामेबहिणीशीं लग्न करतां येतें. लग्नें बहुधा अगदीं लहानपणींच करितात. कधीं कधीं मुलींचीं लग्नें न करितां त्यांस मारुतीस किंवा यल्लम्मा देवीस अर्पण करितात. त्यांना बसवी किंवा जोगती म्हणतात. अशा मुली बहुधा वेश्यावृत्तीनें राहतात. विधवाविवाहास मोकळिक आहे. सोडचिठ्ठी देतां येते.

बेरड मुख्यत्वेंकरून दुर्गव्वा, मल्लिकार्जुन, मारुती, यल्लम्मा आणि खंडोबा यांस भजतात. त्यांचे उपाध्ये ब्राह्मण असतात. कांहीं अंत्यविधी चालविण्याच्या कामीं लिंगायत मठपतींची योजना करितात. मृतांस जाळण्यांत अगर पुरण्यांत येतें. मृताच्या शांत्यर्थ भाद्रपद, आश्विन अथवा फाल्गुन महिन्याच्या अमावास्येस जातीच्या लोकांना जेवण देतात.

विजापूर जिल्ह्याशिवाय इतर ठिकाणीं रहाणारे बेरड डुकराचें व गाईचेंही मांस खातात. ते दारू पितात. ते मुसलमानांच्या हातचें अन्न खातात, पण मुसलमान त्यांच्या हातचें अन्न खात नाहींत.

**बेलदार**—ओड जातीचें दुसरें नांव.

**बैरागी**—पहा–बावा.

**बैलने कुंबार**—घिसाडी जातीचें दुसरें नांव.

**ब्रह्मक्षत्री**—मुख्यत्वेंकरून सुरत, भडोच व अहमदाबाद जिल्ह्यांत आढळतात. परशुरामानें जेव्हां क्षत्रियांचा संहार केला तेव्हां कांहीं क्षत्रिय स्त्रियांचा

जीव त्या ब्राह्मण आहेत असें सांगून बचावण्यांत आला. ब्रह्मक्षेत्री ह्या स्त्रियांचे वंशज आहेत असें सांगतात. ते पंजाबांतून गुजराथेंत आले आहेत असें समजण्यांत येतें. पंजाबांतील क्षत्र्यांप्रमाणें त्यांनाही खारवा क्षत्री असें म्हणतात, त्यांच्या कांहीं चालीरीति पंजाबांतील क्षत्र्यांप्रमाणें आहेत, दोघांचेही उपाध्ये सारस्वत ब्राह्मण आहेत, तसेंच ज्याप्रमाणें पंजाबांत त्याप्रमाणें गुजराथेंतही त्यांचे उपाध्ये त्यांच्या हातचें अन्न खातात, ह्या गोष्टींवरून वरील समजूत बरोबर आहे असें दिसतें.

ब्रह्मक्षत्र्यांत ( १ ) ब्रह्मक्षत्री ( २ ) दसा, ( ३ ) पंचा, ( ४ ) नात्रावाला आणि ( ५ ) चुडगर असे पांच पोटभेद आहेत. त्यांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. दसा आणि पंचा हे ब्रह्मक्षत्र्यांस दुसऱ्या जातीच्या स्त्रियांपासून झालेली संतति होय असें मानण्यांत येतें. नात्रावाला आणि चुडगर हे धंद्यावरून झालेले पोटभेद आहेत. पहिले मूर्तींचे डोळे करण्याचा धंदा करितात आणि दुसरे बांगड्या करितात.

ब्रह्मक्षत्र्यांत ब्राह्मणांप्रमाणें गोत्रें आहेत. सगोत्र्यांचा शरीरसंबंध होत नाहीं, तसेंच सात पिढयांच्या आंतही लग्नें करतां येत नाहींत. विधवाविवाह व सोडचिठ्ठी यांस प्रतिबंध आहे.

काठेवाडांतील जमीनदार ब्रह्मक्षत्री वल्लभाचार्य संप्रदायाचे वैष्णव आहेत. बाकीचे शिव व शक्ति यांचे उपासक आहेत. प्रत्येक कुळाची एक एक कुलदेवी असते. त्यांचे धार्मिक आचार ब्राह्मणांप्रमाणेंच आहेत. मुलांची मुंज करण्याचा प्रघात त्यांच्यांत रूढ आहे.

ब्रह्मक्षत्री मुख्यत: कारकुनी पेशाचे आहेत. कांहीं पिढीजात देसाई आहेत. कांहीं सावकारीही करितात.

पुष्कळ ब्रह्मक्षत्री शाकाहारी असून दारूही पीत नाहींत. असें जरी आहे तरी त्यांच्यांत मांसाहारास व मद्यपानास प्रतिबंध नाहीं.

**ब्राह्मण**—इलाख्यांत सर्वत्र आढळतात. वैदिक काळांत वेद पठण करणारांस ब्राह्मण ही संज्ञा लाविली जात असे. आरंभीं चार वेदांचें अध्ययन कर-

णारे ब्राह्मणांचे चार वर्ग असावेत असें दिसतें. परंतु या चौघांचेही परस्परांशीं शरीरसंबंध होत असत. पुढें ज्या कालीं वेदांच्या शाखा केल्या गेल्या व गृह्य-सूत्रें निर्माण झालीं त्या कालीं ह्या वेदमूलक भेदांस दृढता आली असावी. पण भारतीय युद्धकाळापर्यंत ब्राह्मणांची स्वतंत्र जात बनली होती असें दिसत नाहीं. त्या काळापर्यंत क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे वर्णही पृथक झाले होते. परंतु क्षत्रियांस व वैश्यांस गुणोत्कर्षानें ब्राह्मण होतां येत असे. तसेंच ब्राह्मणांस क्षत्रिय व वैश्य कन्यांशीं व क्षत्रियांस वैश्य कन्यांशीं विवाह करितां येत असे, इतकेंच नव्हे तर कांहीं विशिष्ट शूद्रांदिकांशीं अन्नपानादि व्यवहारासही प्रत्य-वाय नसे.

वर वर्णन केलेली स्थिति युद्धकालापर्यंत असावी असें दिसतें. तदनंतर आहार, आचार, उपास्य, परमार्थमत इत्यादिकांमुळें ब्राह्मणांत भेद झाले असावेत. "ब्राह्मणांतील पंचद्राविड व गौड हा भेद आहारमूलक असून तो बाराव्या शतकानंतरचा आहे. ब्राह्मणांमध्यें पूर्वी आडनांवें नव्हतीं. तींही मध्ययुगांत गोत्रांवरून पडलीं. बुद्धपूर्व व बुद्धोत्तर कालांत शक, यवन, हूण यांच्या उत्पातामुळें ब्राह्मणांना देशत्याग करावा लागला, म्हणून प्रादेशिक भेदही उत्पन्न झाले. उत्तरेकडचे बरेचसे क्षत्रिय विंध्य ओलांडून दक्षिणेस वस्तीकरतां आले. त्यांबरोबर राजपुरोहित म्हणून आलेल्या व राज्य स्थापल्यावर धर्माधिकारी बनलेल्या ब्राह्मणांच्या वसाहती याच काळांत झाल्या. अशा या पळापळीच्या काळांतच जेवढे जेवढे समुदाय एका भागांतून दुसऱ्या भागांत आले तेवढ्या तेव-ढ्यांनीं आपली शुद्धि दृढ रहावी म्हणून स्वसमूहबाह्यांशीं शरीरसंबंध वर्ज्य केले. त्यामुळें जातिबद्धता अधिकच दृढ झाली. नागर ब्राह्मणांनीं एका अविज्ञात संबंधामुळें स्वजातिबाह्यांशीं लग्नव्यवहार करण्याचें टाळलें असें श्री. वैद्य मध्ययुगीन भारतांत लिहितात. मध्ययुगांत काश्मीरापासून मत्स्याळापर्यंत देशभेदानें ब्राह्मणांत एकोणतीस पोटजाती होत्या असा पत्ता लागतो. या एको-णतीस जातींतच बंगालच्या बल्लाळसेनाबरोबर आलेले व ओरिसाच्या केसरी-राज्याबरोबर आलेले पण राहाणी निराळी म्हणून स्वतंत्र पोटजात करून राहिलेले ब्राह्मण आहेत. तात्पर्य, मध्ययुगीन काळाच्या अखेर ब्राह्मणांमध्यें

आहार, आचार, उपास्य, देश, अशा विविध कारणांनीं पोटजाती उत्पन्न होऊं लागल्या होत्या."

ब्राह्मणांत गौड व द्राविड असे दोन स्थूल भेद आहेत. विन्ध्य पर्वताच्या उत्तरेस राहणारे ते गौड, व दक्षिणेस राहणारे ते द्राविड. ह्या दोन्ही भेदांत प्रत्येकीं पुनः पांच पोटभेद आहेत, ते असे:—

( १ ) गौड :—सारस्वत, कान्यकुब्ज, गौड, उत्कल, मिथिल.

( २ ) द्राविड :—महाराष्ट्र, आन्ध्र, द्रविड, कर्नाटक, गुर्जर.

वरील पोटभेदांतील गुर्जर, महाराष्ट्र, सारस्वत, गौड आणि कर्नाटक हे पोटभेद मुंबई इलाख्यांत मुख्यत्वेंकरून आढळतात. त्यांचें वर्णन अनुक्रमवार पुढें दिलें आहे.

## गुर्जर अथवा गुजराथी ब्राह्मणः—

ह्या ब्राह्मणांत पुढील पोटजाती आहेत: ( १ ) अगरसिंधवाल, ( २ ) अगर्वाल, ( ३ ) अनावळा, ( ४ ) अनोधिया, ( ५ ) अशपुरा, ( ६ ) अक्षमंगल, ( ७ ) इंधवाल ( इधवाल ), ( ८ ) उदंब्रा, (९) ओस्वाल, (१०) औदिच, ( ११ ) कपिल ( कपोल ), ( (१२) कर्खेलिया, (१३) कर्बेलिया, ( १४ ) कलिंग, ( १५ ) खदायता, ( १६ ) खेडवाळ ( खेडवा ), ( १७ ) खंडोलिया, ( १८ ) गयावळ, ( १९ ) गरोडा, ( २० ) गंगापुत्र, ( २१ ) गड्डियाळी, ( २२ ) गिर्नारा, ( २३ ) गुगली, ( २४ ) गुर्जर, ( २५ ) गुरू, ( २६ ) गोडमाळवी, ( २७ ) गोधवाल, ( २८ ) गोमतीवाल, ( २९ ) गोमित्र, ( ३० ) गौडा ( घोडा ), ( ३१ ) घोगरी, ( ३२ ) चोविसा ( चोरिसा ), ( ३३ ) चौन, ( ३४ ) जमू ( जंबुवंत ), ( ३५ ) झारोला, ( ३६ ) तपोधन, ( ३७ ) तंगमोडिया, ( ३८ ) दधीच ( दधीची ), (३९) दरोदा, ( ४० ) दहैमा ( दयमा ), ( ४१ ) देशवाल, ( ४२ ) नपल, ( ४३ ) नमल, ( ४४ ) नर्डिक, ( ४५ ) नर्सिंगपुरा ( नसिंपुरा ), ( ४६ ) नंदोरा ( नंदोद्रा ), ( ४७ ) नंद्राणा ( नंद्रैणा ) ( ४८ ) नंधाणा, ( ४९ ) नागर, ( ५० ) पर्जा ( परासर ), ( ५१ ) पर्सोलिया; ( ५२ ) पलिवाल

( पलेवाल ), ( ५३ ) पुवावाल, ( ५४ ) पुष्कर्ण ( पोखर्ण ) ( ५५ ) पुंडवाल, ( ५६ ) पोर्वाल ( पोर्वाड ) ( ५७ ) पंजोरा ( पंगोरा ), ( ५८ ) प्रेतेवाल, ( ५९ ) बलम ( बलम ), ( ६० ) बोर्सादा, ( ६१ ) भथीना, ( ६२ ) भलवी, ( ६३ ) भार्गव, ( ६४ ) भुकणिया, ( ६५ ) मधमैत्र, ( ६६ ) मध्याचल ( ६७ ) मलिकवाल, ( ६८ ) मेवाडा, ( ६९ ) मोताला, ( ७० ) मोध, ( ७१ ) यज्ञिकवाल, ( ७२ ) रजवाल ( रंगवाल ), (७३) रायकवाल, (७४) रायकुला, (७५) रायपुरा, (७६) रायस्थल, (७७) रोधवाल (रोतवाल), (७८) ललत, (७९) वायडा, (८०) वैशवध्रा, (८१) श्रीगौड, (८२) श्रीमाळी, (८३) सनोथिया, (८४) सनोदिया, सनाथ किंवा सनावळा, (८५) सनोध्रा, (८६) सर्वग्या, (८७) साचोरा, (८८) सारस्वत, (८९) सिंधवाल, (९०) सेवक, (९१) सोनपुरा (सोमपुरा), (९२) सोरठिया, (९३) हर्सोलिया (हर्सोरा).

वरील पोटजातींत परस्पर बेटीव्यवहार होत नाहीं. त्यांतील बहुतेक स्थानिक स्वरूपाच्या अगर राजकीय परिस्थितीमुळें उत्पन्न झालेल्या असून तत्सम पुष्कळ पोटभेद वाण्यांत आणि इतर मोठमोठ्या उद्योगप्रधान जातींत आढळतात. कित्येक उत्तर हिंदुस्थानांतून आलेल्या आहेत, कित्येक आपली उत्पत्ति ऋषींपासून झाली आहे असें सांगतात आणि कित्येक प्राचीन काळीं वसाहतीकरितां जे ब्राह्मण उत्तर हिंदुस्थानांतून कांहीं पवित्र ठिकाणीं येऊन राहिले त्या ठिकाणांशीं आपला संबंध जोडतात. वरील पोटजातींपैकीं फक्त अनावळाच काय ते सर्व गृहस्थ आहेत. इतर पोटजातींपैकीं कांहीं सर्वस्वी भिक्षुक असून कांहींत भिक्षुक आणि गृहस्थ असे दोन भोटभेद आहेत. भिक्षुक आणि गृहस्थ हे भेद वंशजात आहेत. त्यांचा धंद्याशीं कांहीं संबंध नाहीं. भिक्षुकाच्या पोटीं जन्मास आलेला तो भिक्षुक आणि गृहस्थाच्या पोटीं जन्मास आलेला तो गृहस्थ.

बहुतेक गुजराथी ब्राह्मण यजुर्वेदी आहेत. फक्त भार्गव, नागर आणि दुसऱ्या थोड्या पोटजाती यांतच काय ते यजुर्वेदाशिवाय इतर वेदांचे थोडेसे अनुयायी आहेत. प्रत्येक जातींत पांचांपासून पंचविसांपर्यंत गोत्रें असतात.

फक्त नागर ब्राह्मणांत भिक्षुक आणि गृहस्थ यांच्यांत परस्पर शरीरसंबंध होत नाहीं, इतर पोटजातींत होतो.

थोडेसे स्वामीनारायण पंथाचे अनुयायी शिवायकरून बाकीचे सर्व गुजराथी ब्राह्मण शैव आहेत. त्यांचे सामाजिक आणि धार्मिक आचार मुख्यतः मयूख, मिताक्षरा, धर्म आणि निर्णयसिंधूच्या आधारें चालतात.

वर दिलेल्या पोटजातींपैकीं ज्या मुख्य आहेत त्यांचें वर्णन पुढें थोडक्यांत दिलें आहे.

**अनावळा**—ह्यांस मास्तान आणि भाटेला अशींहीं नांवें आहेत. ते सुरत जिल्हा व बडोदें संस्थानच्या आजूबाजूचा प्रदेश येथें आढळतात. अनावळा हें नांव सुरतेच्या पूर्वेस सरासरी चाळीस मैलांवर बडोदें संस्थानच्या हद्दींत असलेल्या अनावळ ह्या गांवावरून पडलेलें आहे. दक्षिण गुजराथेंत इतर ब्राह्मणांपूर्वीं ह्या ब्राह्मणांनीं वसाहत केली अशी समजूत आहे, आणि त्यांच्याच परिश्रमानें तेथील जमिनीवरील जंगल साफ केलें जाऊन ती लागवडीस आणण्यांत आली. ऐशींनव्वद वर्षांपूर्वीं बहुतेक सर्व अनावळे शेतीच करीत आणि अजूनही त्यांच्यांतील बहुतेक लोक शेतीच करितात. तथापि त्यांच्यांतील बरेच लोक हल्लीं कुळकर्णी, शाळामास्तर, वकील व सरकारी नोकर आहेत. कांहीं व्यापारी आहेत.

अनावळा ब्राह्मणांत भाटेला आणि सजोद्रा किंवा सघोडिया असे दोन पोटभेद आहेत.

**उदंब्रा**—मुख्यत्वेंकरून खेडा आणि पंचमहाल जिल्ह्यांत आढळतात. उदंम्रा हें नांव उदंबर ऋषीवरून पडलें आहे असें सांगतात. त्यांच्यांत अभुआंकर, लाड आणि पोटाचोर असे तीन पोटभेद आहेत. ते भिक्षुकी करून आणि भिक्षा मागून पोट भरतात. थोडेसे शेती करितात.

**औदिच**—किंवा औदिच्य ब्राह्मण सर्व गुजराथभर आढळतात. औदिच्य ह्या शब्दाचा अर्थ 'उत्तरेकडचा' असा असून तो हे ब्राह्मण उत्तर हिंदुस्थानांतून गुजराथेंत आले असें दर्शवितो. अन्हिलवाड्याचा राजा मूलराज ( इ. स.

९६१-९९६ ) ह्यानें आपणांस एक यज्ञ करण्यासाठीं उत्तरेंतून आणिलें अशी दंतकथा ह्या जातींत प्रचलित आहे. यज्ञसमाप्तीनंतर मूळराजानें त्या ब्राह्मणांस तेथेंच कायमची वस्ती करून राहाण्यासाठीं त्यांना जमिनी आणि इतर देणग्या देऊं केल्या. त्यांचा स्वीकार करून त्यांपैकीं कित्येक तेथें राहाण्यास कबूल झाले. बाकीचे प्रथम राहण्यास कबूल होइनात, तेव्हां त्यांस मूळराजानें मही नदीच्या मुखाजवळील अतिशय पवित्र जमीन देऊं केली. त्यामुळें तेही राहण्यास कबूल झाले. जे राहण्यास प्रथम कबूल झाले त्यांची संख्या एक हजार होती, म्हणून त्यांस सहस्र किंवा सहस्रवदी औदिच्य असें नांव मिळालें. जे पहिल्यांदा कबूल झाले नाहींत त्यांची एक टोळी होती म्हणून त्यांस टोळकिया औदिच्य असें नांव मिळालें.

औदिच ब्राह्मणांत पुढील पोटभेद आहेतः—( १ ) आचार्य, ( २ ) बरड, ( ३ ) बाविसा, ( ४ ) मोतीनाथ, ( ५ ) मरू किंवा मारवाडी, ( ६ ) परदेश्वरी, ( ७ ) सहस्र, ( ८ ) वांझागोर. बाविसांत भवसागरगोर, दर्भि-या, कयातिया ( कराटिया ), काठीगोर, खत्रीगोर, अणि लुहारगोर असे पोटभेद आहेत. मरूंत मोचीगोर नांवाचा एक पोटभेद आहे. परदेश्वरींत राजगोर आणि सईगोर किंवा दर्जीगोर असे दोन पोटभेद आहेत. सहस्रांत अहमदाबादी, सिधपुरी आणि सिहोरी असे तीन पोटभेद असून, सिहोरींत गोहिलवाडी, जढिया, खरेडी, सिमरिया, तळगिया, सिहोरी आणि उनेवाल असे पोटभेद आहेत. यांतील पुष्कळ भेद स्थानिक स्वरूपाचे असून काठीगोर, लुहारगोर, मोचीगोर इत्यादि भेद ज्या जातींचीं नांवें त्यांस पडलीं आहेत त्या जातीचे उपाध्ये असतात. कांहीं ठिकाणीं हीन जातींचें पौरोहित्य स्वीकारल्या-मुळें त्यांस हलकें मानण्यांत येऊन त्यांच्याशीं अन्नव्यवहार करण्यांत येत नाहीं, तर कांहीं ठिकाणीं त्यामुळें त्यांस कमीपणा आला आहे असें न मानतां त्यांच्याशीं अन्नव्यवहार होतो. कांहीं ठिकाणीं ह्या पोटभेदांच्या अगदीं स्वतंत्र जातीच बनल्या असून त्यांचा परस्परांशीं अथवा आपल्या मूळ जातीशीं कोणत्याच प्रकारचा व्यवहार होत नाहीं.

पुष्कळ औदिच ब्राह्मण भिक्षा मागून उदरनिर्वाह करितात. सरकारी नोकरींतही पुष्कळ आहेत. थोडे शेती करितात. बाकीचे सर्व उपाध्ये किंवा ग्रामजोशी आहेत.

**कपिल**—मुख्यत्वेंकरून भडोच जिल्ह्यांत आढळतात. ते आपली उत्पत्ति कपिल ऋषीपासून झाली आहे असें सांगतात. त्यांचा मुख्य धंदा शेतीचा आहे.

**खदायता**—मुख्यत्वेंकरून खेडा जिल्ह्यांत आढळतात. अहमदाबाद जिल्ह्यांतील प्रांतिज जवळील खदात ह्या गांवावरून त्यांस खदायता हें नांव पडलेलें आहे. ते खदायता वाण्यांचे पुरोहित असून फक्त त्यांच्याचकडून दानें घेतात.

**खडवाळ**—मुख्यत्वेंकरून खेडा जिल्ह्यांत आढळतात. खेडा ह्या शहरावरून त्यांस खेडवाळ हें नांव पडलेलें आहे. त्यांची मुख्य वसाहत उमरेठ येथें आहे. म्हैसूर संस्थानांतील एका ब्राह्मणसमुदायापासून आपली उत्पत्ति झाली आहे, अशी दंतकथा त्यांच्यांत प्रचलित आहे, ती संभवनीय दिसते. कारण, श्रीरंगपट्टणाशीं त्यांचा अजूनही संबंध आहे. त्यांच्यांत बाज म्हणजे बाहेरचे, भित्रा म्हणजे आंतले आणि धर्मरिया असे तीन पोटभेद आहेत. महीकांठयामध्यें खेडवळांची एक वसाहत आहे, त्यांत बाज आणि भित्री हे दोन पोटभेद आहेत. ह्या वसाहतीचा मूळ जातीशीं कांहींही संबंध राहिलेला नाहीं. भित्रा हे गरीब असून ते लाड वाण्यांचे उपाध्ये आहेत. बाज हे आपण कधींही दान घेत नाहीं अशी प्रौढी मिरवितात. ते मोठे जमीनदार आणि सावकार असून व्यापारही करितात.

**खंडोलिया**—मुख्यत्वेंकरून काठेवाडांत आणि बडोद्यांत आढळतात. काठेवाडांतील झालावाड प्रांतांतील ढाणजवळील खंडोल गांवावरून त्यांस खंडोलिया हें नांव पडलेलें आहे. ते कपोल आणि सोरठिया वाण्यांचे पुरोहित असून रजपूत राजांच्या पदरीं आचाऱ्यांचेंही काम करितात.

**गिर्नारा**—मुख्यत्वेंकरून कच्छ व काठेवाडमध्यें आढळतात. कृष्णानें गिरनार येथें आपली वसाहत करविली अशी दंतकथा त्यांच्यांत प्रचलित आहे. प्रभासखंडांत ते मूळ हिमालयाच्या पायथ्यापासून आले असें म्हटलें

आहे. त्याच्यांत बरढी, चोवीडी, दामोदरजी, माधवपुरा आणि सखो बरडी असे पांच पोटभेद आहेत. ते वैष्णवांच्या देवळांतून पुजाऱ्यांचें काम करितात, भिक्षा मागतात, शेती करतात, सावकारी व व्यापारी करितात आणि आचाऱ्यांचेही काम करितात. गिरनार आणि सोमनाथ पाटण येथें जाणाऱ्या यात्रेकरूंचें पौरोहित्य करण्याचा अधिकार फक्त त्यांसच आहे.

**गुगली**—मुख्यत्वेंकरून द्वारकेंत आढळतात. त्यांचें नांव मथुरेजवळील गोकुळावरून पडलें आहे असें सांगतात. द्वारकेंत वसाहत करण्यास त्यांस एक पिशाच्च प्रतिबंध करूं लागलें. त्यास गुग्गळ जाळून त्यांनीं पिटाळून लावलें म्हणून त्यांस गुगली हें नांव पडलें असेंही म्हणतात. डाकूर आणि बेट द्वारका येथील कृष्णाच्या देवळांतील पुजारी गुगली आहेत. पुष्कळ गुगली वल्लभाचार्य महाराजांकडे नोकरीस राहातात.

**गोमतीवाल**—अहमदाबाद आणि रेवाकांठा येथें आढळतात. काठेवाडांतील बर्डा टेंकडींतील गोमती नांवाच्या जुन्या शहरावरून त्यांस गोमतीवाल हें नांव पडलें आहे असें सांगतात. बहुतेक गोमतीवाल भिक्षा मागून उदरनिर्वाह करितात.

**चोविसा**—काठेवाडांत आणि बडाद्यांत आढळतात. त्यांच्यांत मोठा आणि लहान असे दोन पोटभेद आहेत.

**जमू**—भडोच जिल्ह्यांतील जंबूसर शहरावरून जमू हें नांव पडलेलें आहे. ते मुख्यत्वेंकरून भडोच आणि बडोदें येथें आढळतात. याज्ञवल्क्यापासून आपली उत्पत्ति झाली आहे असें ते म्हणतात. ताम्रपटांवरून असें दिसतें कीं, इ. स. च्या चवथ्या शतकाच्या सुरवातीस त्यांनीं जंबूसर येथें वसाहत केली असावी. ते पौरोहित्य करितात व फलज्योतिष सांगतात.

**झारोला**—सर्व गुजराथभर आढळतात. त्यांचें नांव मारवाडांतील झालोर ह्या गांवावरून पडलेलें आहे. त्यांच्यापैकीं बहुतेक झालोरा वाण्यांचें पौरोहित्य करितात.

**तपोधन**—ह्यांस भर्डा असेंही म्हणतात. ते सर्व गुजराथभर आढळतात. ते महादेव आणि माता यांच्या व जैनांच्या देवळांत पुजाऱ्यांचें काम करितात.

ते पौरोहित्य करीत नाहींत. जे पुजाऱ्याचें काम करीत नाहींत ते शेती आणि मजुरी करितात. कांहीं गवंडीकाम करितात. त्यांच्यांत विधवाविवाह रूढ आहे.

**दधीचि**—हे मुख्यत्वेंकरून भडोच आणि खेडा जिल्ह्यांत आढळतात. आपण मूळचे औदिच, परंतु विजापूरजवळील देहवान गांवात वसाहत केल्यामुळें आपली निराळी पोटजात बनली आणि तेथें असलेल्या दधीचीच्या आश्रमावरून आपणांस दधीच हें नांव पडलें असें ते सांगतात. बरेच दधीच ब्राह्मण पाटील आहेत. शिवाय ते शेती आणि सावकारीही करितात.

**देशवाल**—मुख्यत्वेंकरून सुरत आणि अहमदाबाद जिल्ह्यांत आढळतात. पालनपूर संस्थानांतील दीसा ह्या शहरावरून त्यांस देशवाल हें नांव पडलेलें आहे. ते देशवाल वाण्यांचें पौरोहित्य करितात.

**नपल**—हें नांव खेडा जिल्ह्यांतील बोर्सद तालुक्यांतील नापा ह्या गांवावरून पडलेलें आहे. नपल आपण मूळ औदिच ब्राह्मण होतों असें सांगतात. ते मुख्यत्वेंकरून शेतीचा धंदा करितात.

**नंदोरा**—खेडा जिल्ह्यांत आणि राजपुतान्यांत आढळतात. राजपिपळाची राजधानी नांदोद ह्या शहरावरून नंदोरा हें नांव पडलेलें आहे. राजपिपळा आणि धरमपूर संस्थानाच्या रजपूत राजांचे पुरोहित नंदोरा आहेत. थोडे शेती करितात व बाकीचे भिक्षेवर उदरनिर्वाह करितात.

**नंद्राणा**—मुख्यत्वेंकरून कच्छ आणि काठेवाडांत आढळतात. नांदी नांवाच्या ऋषीपासून आपली उत्पत्ति झाली आहे असें ते सांगतात. एकदा अश्वमेधांत पौरोहित्य करीत असतां ह्या ऋषीस ब्रह्मदेवाची पत्नी सावित्री हिनें शाप दिला. ह्या शापामुळें त्याच्या वंशजांचें सर्व शास्त्रज्ञान नष्ट झालें. परंतु मारवाडांतील विराणी येथील त्यांची कुलदेवी वांकळ हिच्या प्रसादानें तें त्यांस पुनः प्राप्त झालें, अशी दंतकथा आहे. नंद्राणा पौरोहित्य, व्यापार व शेती करितात.

**नागर**—मुख्यत्वेंकरून सुरत आणि अहमदाबाद जिल्ह्यांत आणि काठेवाडांत आढळतात. शंकरानें पार्वतीबरोबर लग्न करण्याच्या वेळीं लग्नविधी चालविण्यासाठीं सहा ब्राह्मण उत्पन्न केले व त्यांचे विवाह नागकन्यांशीं केले.

त्यांचे वंशज ते नागर अशी एक दंतकथा आहे. एका नागानें वडनगरच्या एका ब्राह्मण कन्येबरोबर लग्न केलें. त्यांची संतति ते नागर ब्राह्मण अशी दुसरी दंतकथा आहे. एका तिसऱ्या दंतकथेनें त्यांचा संबंध नागजातीशीं जोडला जातो. ह्या सर्व दंतकथा नागर शब्दावरील कोटया आहेत हें अगदीं स्पष्ट आहे. गुजराथेंतील इतर ब्राह्मणांप्रमाणें हे ब्राह्मणही उत्तरेकडूनच आले आहेत असें दिसतें.

नागर ब्राह्मणांत सात पोटभेद आहेत. ते असेः-(१) बारोट, (२) चित्रोदा, (३) कृष्णोरा, (४) प्रश्नोरा, (५) साथोद्रा, (६) वडनगरा, (७) विसनगरा. चित्रोदांत चित्रोदा आणि बारड असे दोन पोटभेद आहेत, प्रश्नोरांत प्रश्नोरा आणि बारड असे दोन पोटभेद आहेत, साथोद्रांत साथोद्रा, बारड आणि भिक्षुक असे तीन पोटभेद आहेत, वडनगरांत वडनगरा, भिक्षुक, डुंगरपुरा आणि बारड असे चार पोटभेद आहेत, कृष्णोरांत कृष्णोरा आणि बारड असे दोन पोटभेद आहेत आणि विसनगरांत विसनगरा, अहमदाबादी, भिक्षुक आणि बारड असे चार पोटभेद आहेत. ह्या पोटभेदांत परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. फक्त वडनगरांच्या हातचें अन्न मात्र इतर पोटभेदांतील लोक खातात.

पुष्कळ नागर लोक ब्रिटिश सरकारच्या व संस्थानांच्या नोकरींत आहेत. वकिली, डॉक्टरी वगैरे धंदे करणारेही बरेच आहेत. कांहीं जमीनदार आहेत व कांहीं सावकारी करितात. नागर ब्राह्मण गुजराथेंत सर्व बाजूंनीं सर्वांत पुढें आलेले असून त्यांचा सामाजिक दर्जा फार श्रेष्ठ आहे.

**पर्जा**—ह्यांस पराशर किंवा अहिरगोर असेंही म्हणतात. ते कच्छ व काठेवाडमध्यें आढळतात. त्यांचें नांव जुनागडजवळील परज ह्या गांवावरून पडलेलें आहे. ते मुळांत औदिच ब्राह्मण होते. त्यांच्यांत पर्जा आणि पाटणिया असे दोन पोटभेद आहेत. ते अहिर आणि चारणांचे पुरोहित असून त्यांच्या हातचें अन्न खातात. त्यांच्यांत विधवाविवाह रूढ आहे. त्यांस पतित मानण्यांत येतें.

**पलिवाल**—अहमदाबाद जिल्हा, कच्छ व काठेवाड येथें आढळतात. ते कान्यकुब्ज ब्राह्मणांपैकीं असून मारवाडांतील पाली नांवाच्या प्रख्यात

व्यापारी शहरावरून त्यांचें नांव पडलेलें आहे. बहुतेक पलिवाल व्यापारी आहेत. पण थोडेसे शेतीही करितात.

**पुष्कर्ण**—किंवा पोकर्ण मुख्यत्वेंकरून कच्छ व काठेवाडमध्यें आढळतात. अजमीरजवळील पुष्कर सरोवरावरून त्यांचें नांव पडलेलें आहे. ते भाटियांचें पौरोहित्य करितात आणि त्यांच्याप्रमाणें सर्व प्रकारचे धंदे करितात. मुख्यत्वें-करून ते हलवायांचें काम करितात, कंत्राटें घेतात, शेती करितात आणि कारकुनी करितात. ते वल्लभाचार्यांचे अनुयायी असून त्यांच्या कुलदेवी मारवाडांतील लक्ष्मी आणि चामुंडा ह्या होत. ते भाटियांच्या हातचे लाडू व पोळ्या खात असल्यामुळें इतर गुजराथी ब्राह्मण त्यांच्याशीं अन्नव्यवहार करीत नाहींत.

**बलम**—किंवा वलम मुख्यत्वेंकरून अहमदाबाद आणि खेडा जिल्ह्यांत आढळतात. त्यांचें नांव बडोदें संस्थानांतील पाटण तालुक्यांतील वलम ह्या गांवावरून पडलेलें आहे. ते भिक्षा मागून आणि शेती करून उदरनिर्वाह करितात.

**बोर्सादा**—मुख्यत्वेंकरून खेडा जिल्ह्यांत आढळतात. त्यांचें नांव बोर्सद ह्या शहरावरून पडलेलें आहे. ते पिढीजात शेतकरी असून कांहीं पाटील आहेत.

**भार्गव**—मुख्यत्वेंकरून भडोच आणि सुरत जिल्ह्यांत आढळतात. भडोच शहराचा संस्थापक जो भृगु ऋषि त्यापासून आपली उत्पत्ति झाली आहे असें ते सांगतात. त्यांच्यांत दसा व विसा असे दोन पोटभेद आहेत. त्यांचा परस्पर बेटीव्यवहार होत नाहीं. भडोचमधील आणि मांडवींतील भार्गवांचाही परस्पर बेटीव्यवहार होत नाहीं.

**मेवाडा**—सर्व गुजराथभर आढळतात. त्यांचें नांव राजपुतान्यांतील मेवाड प्रांतावरून पडलेलें आहे. त्यांच्यांत भाट, चोरासी, रहदुरी, रावळ आणि त्रिवेदी असे पांच पोटभेद आहेत. ते पौरोहित्य करून, भिक्षा मागून आणि शेती करून उदरनिर्वाह करितात.

**मोताला**—मुख्यत्वेंकरून सुरत जिल्ह्यांत आढळतात. सुरतपासून सोळा मैलांवर असलेल्या मोता ह्या खेड्यावरून त्यांचें नांव पडलेलें आहे. मोताला हे मूळ देशस्थ ब्राह्मण होते असा कित्येकांचा तर्क आहे. ते दिसण्यांत गुजराथी ब्राह्मणांप्रमाणें न दिसतां देशस्थांप्रमाणें दिसतात. त्यांची कुलदेवी कोल्हापुरची महालक्ष्मी. त्यांची शाखा काण्व. ते मलिक काफरच्या ( इ. स. १३०८ ) जुलमास कंटाळून गुजराथेंत आले अशी एक दंतकथा आहे. दुसरी एक दंतकथा अशी आहे कीं, दुर्गादेवीच्या दुष्काळांत ते गुजराथेंत आले. जंबू आणि कपिल ब्राह्मणही त्यांच्याच बरोबर आले असें सांगतात. मुळांत ह्या तिन्ही पोटजाती एकच होत्या हें संभवनीय दिसतें. कारण, ह्या तिन्ही पोटजातींचे रीतरिवाज सारखे असून शंभर सवाशें वर्षांमागें मोताला आणि जंबू ब्राह्मणांचा परस्पर शरीरसंबंध होत असे. मोताल्यांतील लग्नें दर चौथे वर्षीं एकाच दिवशीं होतात. ते स्वज्ञातीयांचेंच पौरोहित्य करितात. जे पौरोहित्य करीत नाहींत ते सरकारी आणि खासगी आफिसांत कारकुनी करितात.

**मोध**—सर्व गुजराथभर आढळतात. वात्रक नदीच्या तीरावरील मोदेरा गांवावरून त्यांचें नांव पडलेलें आहे. त्यांच्यांत अग्यान अयर किंवा अगंसा, चतुर्वेदी, धिनोजा, जेठीमल, खिचड्या, तंडल्या, तंगलिया, त्रिवल आणि त्रिवेदी असे नऊ पोटभेद आहेत. ह्यापैकीं जेठीमल देशी संस्थानांत पेहेलवानांची नोकरी करितात, व त्यांच्यांत विधवाविवाह रूढ आहे. इतर पोटभेदांतील बहुतेक पौरोहित्य करितात आणि भिक्षा मागतात. थोडे शेतीही करितात.

**रायकवाल**—मुख्यत्वेंकरून अहमदाबाद जिल्ह्यांत आढळतात. बडोद्यांतही त्यांची थोडी वस्ती असून तेथें ते शास्त्री म्हणून प्रसिद्ध आहेत. अहमदाबादेपासून पन्नास मैलांवर असलेल्या धंडुकाजवळील रायका ह्या गांवावरून त्यांचें नांव पडलेलें आहे. त्यांच्यांत मोठा आणि न्हाना असे दोन पोटभेद आहेत. बहुतेक रायकवाल शेती आणि भिक्षुकी करून पोट भरतात. थोडे नोकर आहेत.

**रायस्थल**—मुख्यत्वेंकरून लुनावाडा, पाटण आणि हर्सोल येथें आढळतात. ते मारवाड्यांतून गुजराथेंत आले आहेत असें म्हणतात. ते बहुधा भिक्षुकी करितात.

**वायडा**—सर्व गुजराथभर आढळतात. त्यांचें नांव पाटण जवळील वायड गांवावरून पडलेलें आहे. ते पश्चिम खानदेशांतील बेटांतून आले आहेत असें म्हणतात. ते वायडा वाण्यांचें पौरोहित्य करितात.

**श्रीगौड**—सर्व गुजराथभर आढळतात. ते पंचगौडांपैकीं असून त्यांच्यांत जुना, खंबाती, खरोला, माळवी, मेदतवाल किंवा मेतवाल, नवा, पर्वलिया तंबोली, त्रिवेदी आणि बेरोला असे दहा पोटभेद आहेत. ते पौरोहित्य आणि वैद्यकी करितात.

**श्रीमाळी**—सर्व गुजराथभर आढळतात. अबू पर्वताच्या पश्चिमेस पन्नास मैलांवर असलेल्या श्रीमाळवरून त्यांचें नांव पडलेलें आहे. त्यांच्यांत अबोटी, भोजक, दसकोशी, सामवेदी आणि यजुर्वेदी असे पांच पोटभेद आहेत. ते ओस्वाल आणि पोर्वाड जैन आणि श्रीमाळी वाणि व श्रीमाळी सोनी ह्यांचें पौरोहित्य करितात.

वरील पोटभेदांपैकीं भोजक यांस मग असेंही नांव आहे. ते ओस्वाल वाण्यांच्या हातचें अन्न खातात म्हणून त्यांस भोजक म्हणतात. त्यांनीं जैन धर्माचा स्वीकार केला असून त्यांची आतां एक स्वतंत्र जातच बनली आहे. त्यांच्यांत विधवाविवाह रूढ आहे असें म्हणतात.

**साचोरा**—मुख्यत्वेंकरून कच्छ व काठेवाडमध्यें आढळतात. त्यांचें नांव दक्षिण मारवाडांतील साचोर गांवावरून पडलेलें आहे. त्यांच्यांत दसा आणि विसा असे दोन पोटभेद आहेत. बहुतेक साचोरा शेती करून उदरनिर्वाह करितात. कांहीं वल्लभाचार्यांच्या देवळांत आचारी आहेत, कांहीं भिक्षुकी करितात आणि कांहीं व्यापार करितात.

**सारस्वत**—मुख्यत्वेंकरून कच्छकाठेवाडांत व भडोच, सुरत आणि अहमदाबाद येथें आढळतात. त्यांच्यांत सोरठिया सारस्वत आणि सिंधवा सारस्वत असे दोन मुख्य पोटभेद असून त्यांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं.

सोरठिया सारस्वतांची संख्या अगदीं अल्प आहे. त्यांच्यांत विधवाविवाह करण्यास मोकळीक आहे, पण तसें करणें इष्ट मानीत नाहींत. ते ब्रह्मक्षत्र्यांचें पौरोहित्य करितात.

सिंधवा सारस्वतही मुख्यत्वेंकरून ब्रह्मक्षत्र्यांचेंच पौरोहित्य करितात. ते ब्रह्मक्षत्र्यांच्या हातचें अन्न खातात. त्यांच्यांत कच्छी, इलाई, घोगरी आणि भडोची असे चार पोटभेद आहेत. त्यांतील पहिल्या तिहींत रोटीबेटीव्यवहार होतो. ब्रह्मक्षत्र्यांशिवाय ते लोहाणा, कायस्थ व देपला ह्यांचें पौरोहित्य करितात. ह्या तीनही पोटभेदांत विधवाविवाहास मोकळीक आहे, पण तसें करणें प्रशस्त मानीत नाहींत. भडोची सारस्वतांत विधवाविवाह रूढ नाहीं.

सिंधवा सारस्वत फार धाडसी असून ते सर्व तऱ्हेचा धाऊक व्यापार करितात. फक्त घोगरीच कायते नुसतें पौरोहित्य करितात.

भडोची सारस्वतांचा इतर गुजराथी सारस्वतांशीं कोणत्याच प्रकारचा संबंध नाहीं. ती एक स्वतंत्र जातच आहे. ते मूळ पंजाबांतून गुजराथेंत आले असून त्याबद्दल ऐतिहासिक पुरावा उपलब्ध आहे. ते मुख्यत्वेंकरून कारकुनी करितात, तरी त्यांनीं ब्रह्मक्षत्र्यांचें पौरोहित्य सोडलेलें नाहीं. जरूर पडल्यास ते त्या कामावर दुसऱ्या ब्राह्मणांस नेमितात.

**सेवक**—हे वैष्णवांच्या देवळांत नोकरी करितात. इतर ब्राह्मण त्यांना कमी प्रतीचे समजतात.

**सोमपुरा**—मुख्यत्वेंकरून काठेवाडांत आढळतात. दक्षिण काठेवाडांतील सोमनाथावरून त्यांचें नांव पडलेलें आहे. सोमनाथाच्या प्रसिद्ध देवालयांतील पुजाऱ्यांचे ते वंशज आहेत असें म्हणतात. ते भिक्षुकी करितात व भिक्षा मागतात.

**सोरठिया**—मुख्यत्वेंकरून काठेवाडांत आढळतात. ते अंगांत कपडे घालून जेवतात व ब्राह्मणांचे आचार पाळीत नाहींत म्हणून त्यांस हलकें मानण्यांत येतें. ते मजुरी करितात, पाणी भरतात आणि नोकरी करितात.

**हर्सोला**—मुख्यत्वेंकरून अहमदाबाद व सुरत जिल्ह्यांत आढळतात. अहमदाबाद जिल्ह्यांतील हर्सोद गांवावरून त्यांचें नांव पडलेलें आहे. ते हर्सोला वाण्यांचें पौरोहित्य करितात.

**महाराष्ट्र ब्राह्मण**—ह्या ब्राह्मणांत पुढील पोटजाती आहेतः—( १ ) अथर्वण. ( २ ) उत्तर कोंकणस्थ माध्यंदिन, ( ३ ) कण्व, ( ४ ) कऱ्हाडे

(५) कात्यायन (कास्त), (६) किस्ती, (७) क्रमवंत, (८) गोवर्धन (९) चरक, (१०) चित्पावन, (११) जवळ (खोत), (१२) जंबू कण्व, (१३) तिरगूळ, (१४) देवरुखे, (१५) देशस्थ–स्मार्त, (१६) देशस्थ–वैष्णव, (१७) नार्मदीय, (१८) पद्ये, (१९) पल्लेवाळ, (२०) भट्ट प्रभू, (२१) माध्यंदिन, (२२) मैत्रायणी, (२३) वाज माध्यंदिन, (२४) सहवासी, (२५) सामवेदी.

**अथर्वण**—हे महाराष्ट्रांत कोठें कोठें क्वचित् आहेत. जे आहेत ते अध्ययन व पौरोहित्य यांच्या अनुपपत्तीमुळें पूर्ण ऋग्वेदी देशस्थ बनले असून आडनांवालाच अथर्वण राहिले आहेत.

**उत्तर कोंकणस्थ माध्यंदिन**—हे ब्राह्मण मूळचे देवगिरीचे अल्लाउद्दीनाच्या स्वारीचे वेळीं राजपुत्र बिंबराजाबरोबर राजपुरोहित पुरुषोत्तमपंत कावळे या नांवाचा शुक्ल यजुर्वेदी ब्राह्मण उत्तर कोंकणांत आला. रामदेवरायानें आपला पुत्र बिंबराज यास कांहीं निवडक मंडळीसह उत्तर कोंकणांत वंशरक्षणार्थ व स्थिरस्थावर करण्याकरितां पाठविलें होतें. बिंबराजानें थोडक्याच दिवसांत कोंकणांत आपला अम्मल चांगलाच बसविला. त्या कामीं पुरुषोत्तमपंतांची चांगली मदत झाली. म्हणून बिंबराजाच्या मध्यस्थीनें गोवर्धन ब्राह्मणांतील विधवा चांगुणाबाई इजला एक लक्ष रुपये देऊन पुरुषोत्तमपंतानें उत्तर कोंकणांतील जोशी वृत्ति विकत घेतली व ती स्वकीय आप्तांस वांटून दिली. या वृत्तीमुळें लौकरच शेंदोनशें कुटुंबें उत्तर कोंकणांत वैद्यक, ज्योतिष व जोशीपणाची वृत्ति यांवर राहूं लागलीं. उत्तर कोंकणांत कांहीं काळानें मुसलमान व पोर्तुगीज यांचा अंमल सुरू झाला. या दोन्ही राजवटींत या यजुर्वेदी ब्राह्मणांनीं आपली वृत्ति कायम ठेविली. पोर्तुगीजांनीं हिंदू लोकांचा छळ मांडल्यावर या यजुर्वेद्यांनीं हिंदुत्वरक्षणाकरितां जिवापाड श्रम करून भ्रष्ट झालेलीं कुटुंबें शुद्ध करून घेतलीं. पोर्तुगीजांच्या असह्य जाचास कंटाळूनच अंताजीपंत कावळ्यांनीं शाहू छत्रपतीकडे वसईवर स्वारी करण्याबद्दल विनंति केली. पुढें चिमाजीआप्पानीं स्वारी करून वसईप्रांत आपल्या राज्यास जोडला. या वेळेपासून चित्पावन

उत्तर कोंकणांत येऊं लागले. त्यांचा व यजुर्वेद्यांचा पंक्तिव्यवहार होत नसे. कारण त्या वेळीं चित्पावनांबद्दल विपरीत समजुती होत्या. यजुर्वेदी हे वृत्तिवंत, अधिकारी व आपल्या पंक्तीस न बसणारे हें पाहून चित्पावनांनीं वृत्तिहरणाकरितां हे ब्राह्मण नाहींत असें ठरविण्याचा यत्न सन १७४७ त प्रथम केला. तुकंभट जावळे पळशीकर यांचें अग्निहोत्र त्यांनीं उत्पन्न केलें व त्यांस अग्निहोत्राचा अधिकार नाहीं असें ते म्हणूं लागले. श्री छत्रपति शाहू-महाराजांनीं तुकंभटाची फिर्याद आल्यावर त्याच्या तर्फे निकाल देऊन विरुद्ध पक्षास सक्त ताकीद दिली. चित्पावनांनीं आणखी एक लिंगोत्पाटणाचाही अत्याचार केला. अशा अनेक प्रकरणांत चित्पावनांविरुद्ध जरी निर्णय मिळाले तरी मत्सराग्नि न विझतां अधिकच भडकला. "पलमश्नाति इति पलशः" अशाच तऱ्हेच्या कंड्या व भूमका इतक्या उठल्या कीं, त्यावरून देशावरील यजुर्वेदी ब्राह्मण या ब्राह्मणांबद्दल साशंक झाले आणि त्यांनीं या जातिबांधवांशी अन्नलग्नव्यवहार सोडले.

अशा तऱ्हेनें चित्पावनांच्या आगळिकीमुळें हा ब्राह्मणसमाज दुखावला गेला हें खरें आहे. या वादांत लोकमान्य टिळक व नामदार खापर्डे यांनीं सन १९०४ सालीं लक्ष घालून तो मिटविण्याचा यत्न केला. लोकमान्यांच्या प्रोत्साहनानें शृंगेरीमठाकडे हें प्रकरण गेलें. मठातर्फे चौकशीमंडळ नेमण्यांत येऊन त्या मंडळानें पीठाकडे आपले अभिप्राय माध्यंदिन ब्राह्मणांना अनुकूल असे दिले. शृंगेरी मठानें प्रसिद्ध चौकशी करून आपला निर्णय माध्यंदिनांना अनुकूल असाच दिला. उमरावतीस खापर्डे यांचे घरीं एक मोठा श्रावणीसमारंभ व भोजनसमारंभही घडवून आणला. वऱ्हाड नागपूराकडील यजुर्वेद्यांशीं व इतर प्रांतांतील यजुर्वेद्यांशीं यांचे शेंपन्नास शरीरसंबंधही झाले आहेत. म्हणून उत्तर कोंकणांतील शुक्ल यजुर्वेदी ब्राह्मण आणि देशावरील सर्व यजुर्वेदी ब्राह्मण हे एकच आहेत याबद्दल आतां शंका राहिलेली नाहीं.

**कण्व**—ब्राह्मणांची पश्चिम महाराष्ट्रांत तुरळक वस्ती आहे. हे शुक्ल यजुर्वेदी कण्व शाखेचे अनुयायी आहेत. कात्यायन श्रौतसूत्राप्रमाणें यांचीं धर्मकर्में होतात.

**कऱ्हाडे**—महाराष्ट्रांत व महाराष्ट्राबाहेर जेथें जेथें महाराष्ट्रीयांच्या वसाहती आहेत तेथें आढळतात. ह्यांचा पूर्वेतिहास फारसा उपलब्ध नाहीं. तथापि यांच्या चालीरीतींवरून हे मूळचे देशस्थ असावे असें दिसतें. देशावरील ऋग्वेदी ब्राह्मणांमध्यें व कऱ्हाड्यांमध्यें पुष्कळ दिवसांपासून लग्नव्यवहारही होत आहेत, इतकेंच नव्हे तर देशावरील गोळवलकर, नांदेडकर आणि चिंचालकर हीं कऱ्हाड्यांचीं घराणीं देशस्थांशीं पूर्ण समरस झालीं आहेत.

कऱ्हाडे ऋग्वेदी शाकलशाखाध्यायी आहेत. त्यांचीं धर्मकर्में आश्वलायन सूत्राप्रमाणें होतात. ह्या जातींत विविध कार्यक्षेत्रांत कर्ते पुरुष निर्माण झाले असून महाराष्ट्रांत ज्या जाती सर्वांत पुढारलेल्या आहेत त्यांत तिची गणना होते.

**कात्यायन**—अथवा कास्त हे मुळचे देवगिरीचे. अल्लाउद्दीनाच्या स्वारीच्या हाहाःकारांत ते मुंबई-महाराष्ट्रांत घुसले. ह्यांची लोकसंख्या अल्प असून ती बृहन्महाराष्ट्रांत विखुरलेली आहे. हे लोक पूर्वीं यादवांच्या राजवटींत शेती करून निर्वाह करीत. कास्त किंवा कास्तकारी म्हणजे शेतकरी असा अर्थ मध्यप्रांत, वऱ्हाड व निजामसंस्थानांत रूढ आहे. कास्त हा शब्द व्यवसायवाचक आहे. किस्ती ब्राह्मणांप्रमाणें कास्त ब्राह्मण हेंही धन्देवाचक नांव आहे. पराशर स्मृतीमध्यें शेतीचें विधान केलें असून साक्षात् वा परंपरेनें शेतीवर निर्वाह करणारे ब्राह्मण बृहन्महाराष्ट्रांत आहेत. ते सर्व जमीनदार म्हणून जर मान्य झालेले आहेत तर ह्यांनाच कास्त म्हणून तुच्छत्व दर्शविण्यांत कोणता पुरुषार्थ आहे ?

कात्यायन यजुर्वेद माध्यंदिनशाखानुयायी आहेत. ते मुख्यत्वेंकरून शेती करून उदरनिर्वाह करितात. कांहीं सरकारी नोकरींत आहेत व कांहीं व्यापार करितात.

कात्यायनांस इतर महाराष्ट्र ब्राह्मण कमी लेखतात. पण शके १८४४ मध्यें संकेश्वर पीठानें ते भोजनप्रतिभोजनास पात्र आहेत असा निर्णय दिला आहे.

**किस्ती**—अथवा रणावट खानदेश, वऱ्हाडांत व नगर जिल्ह्यांत आढळतात. त्यांचें किस्ती हें नांव व्याज बट्याच्या धंद्यावरून पडलेलें आहे. तसेंच कांहीं आचारभेदावरून रणावट किंवा रानवट हें निंदाव्यंजक नांव पडलेलें

आहे. शास्त्रामध्यें व्याजबट्टयाचा धंदा करणें गर्ह्य सांगितलेलें आहे. यामुळें व इतर महाराष्ट्र ब्राह्मणांहून यांचे आचार थोडेसे भिन्न असल्यामुळें ह्यांस कमी समजण्यांत येतें. परंतु पुष्कळ सामान्य ब्राह्मण व्याजबट्टयाचा धंदा करीत असल्यामुळें व देशपरत्वें आचारही बदलत असल्यामुळें या जातीस कमी समजणें योग्य दिसत नाहीं; व शके १८३२ सांत श्रीमच्छंकराचार्य मठ संकेश्वर व शिवगंगा यांनींही हे ब्राह्मण शुक्ल यजुर्वेदी माध्यंदिन असून पंक्तिपावन आहेत असा स्पष्ट निर्णय दिला आहे.

**क्रमवंत**—अष्टागर प्रांतांतील किरवंतांच्या इतिहासावरून मूळ देशस्थ टिळ्ळु क्रमवंत घराणें इकडे आलें असें म्हणतां येतें. हें घराणें देशस्थ-कोंकणस्थ कऱ्हाड्यांशीं शरीरसंबंधानें एकरूप आलें आहे. अर्थात् क्रमवंत ह्या नांवाची स्वतंत्र जात आतां शिल्लक राहिलेली नाहीं.

**गोवर्धन**—हे बृहन्महाराष्ट्रांत सर्वत्र आढळतात. ह्यांस पूर्वीं गोळक ह्या अपमानास्पद नांवानें संबोधण्यांत येत असे. परंतु यांचा पूर्व इतिहास हल्लीं उपलब्ध झाला असून त्यांचें खरें नांव गोवर्धन हेंच आहे असें सिद्ध झालें आहे.

हे ब्राह्मण मूळ गोवर्धन प्रांतांत राहत असल्यामुळें त्यांस गोवर्धन असें प्रादेशिक नांव पडलें. ते उत्तरेकडील क्षत्रियांबरोबर दक्षिणेंत आले. राजगुरु व राजपुरोहित या नात्यानें त्यांचें वर्चस्व उत्तर कोंकणांत व नाशिकच्या आसपासच्या भागांत पुष्कळ आहे. उत्तर कोंकणांतील यजुर्वेद्यांनीं गोवर्धनापासूनच एक लक्ष रुपये देऊन पौरोहित्याची वृत्ति मिळविली ही गोष्ट इतिहासांत नमूद आहे. गोवर्धन ही पंचद्राविडांतील एक पोटजात असून ती पूर्ण शाकाहारी आहे.

ही जात ऋग्वेद शाकल शाखा, कृष्णयजुर्वेद तैत्तिरीयशाखा, शुक्ल यजुर्वेद माध्यंदिन शाखा व सामवेद छंदोग्य शाखा इतक्यांमध्यें विभागली आहे.

**चरक**—चरक शाखेची वस्ती मध्यप्रांतांत विशेष आढळून येते. पुष्कळ अज्ञानी लोकांस चरक ही शाखाच ठाऊक नसल्यामुळें त्यांच्या ब्राह्मण्याविषयीं देखील संशय प्रदर्शित केला गेला आहे. चरक हे कृष्ण यजुर्वेदी ब्राह्मण आहेत. चरकांतील भेद जो कठ त्या कठांची संहिताही प्रसिद्ध आहे. चरकांमधील

प्रसिद्ध घराणें म्हणजे बुटीचें होय. या घराण्याशीं एका कृष्णयजुर्वेदी कोंकणस्थ घराण्यानें देखील शरीरसंबंध केला आहे.

चरकांची गणना शुक्लांत किंवा कृष्णांत अशी कोणतीच निश्चितपणें करतां येणार नाहीं. जे चरक नसतील ते स्थायिक आणि स्थायिकांतील शुक्ल, कृष्ण हे पुढील भेद अशी ऐतिहासिक परंपरा असणें शक्य आहे. भागवतामध्यें वैशंपायन, याज्ञवल्क्य यांच्या भांडणापूर्वी जे वैशंपायनाचे शिष्य होते त्या सर्वांसच चरकाध्वर्यू असें म्हटलें आहे.

**चित्पावन**—कोंकणस्थ म्हणजे चित्पावन अशी हल्लीं चुकीची समजूत झालेली आहे. वास्तविक कोंकणस्थ ब्राह्मणांमध्यें चित्पावन्, देवरुखे, कमवंत, कऱ्हाडे, जवळ कुडाळदेशकर, सारस्वत इत्यादि सर्व ब्राह्मण येतात. आख्यायिका अशी आहे कीं, पेशव्यांना चित्पावन शद्बाबद्दल तिरस्कार उत्पन्न झाला व त्यांनीं तो शब्द नाहींसा करून ‘ चित्पावन म्हणजे कोंकणस्थ असा ’ पर्यायशब्द बनविला. वास्तविक कोंकण हा ज्यांचा मूळचा प्रांत–ही ज्यांची जन्मभूमी–अशा सर्व ब्राह्मणांना कोंकणस्थ असें म्हणावयास पाहिजे. गोमांतकाकडे सारस्वतांना कोंकणस्थ म्हणण्याची रूढी आहे म्हणून आम्ही कोंकणस्थ शब्दाच्या जागीं मुद्दाम चित्पावन ब्राह्मण असें म्हटलें आहे. चित्पावन ब्राह्मण हा अग्रणी समजला जातो.

परशुरामानें पृथ्वी निःक्षत्रिय केली, त्या संहाराबद्दल परशुरामाला यज्ञाचें प्रायश्चित्त घ्यावेंसें वाटलें. पण यज्ञ करण्यास ब्राह्मण मिळेनात, म्हणून त्याला चिंता पडली. इतक्यांत जहाज फुटल्यामुळें कांहीं प्रेतें वाहात येत आहेत असें परशुरामानें सह्याद्रीच्या टेकडीवरून पाहिलें. त्या प्रेतांना त्यांनीं जिवंत करून ब्राह्मणधर्म शिकविला आणि त्या १४ प्रेतांपासून उत्पन्न केलेल्या ब्राह्मणांना समुद्र हटवून जागा करून दिली. ती जागा म्हणजे रत्नागिरी जिल्ह्यांतील वशिष्ठी नदीकांठचा ४० मैलांचा किनारा ही होय. वाशिष्ठी व शिव या दोन नद्यांच्या पुलिनांवर म्हणजे चिपळूण येथें कोंकणस्थांची वसाहत झाली, असें सह्याद्रिखंडांत लिहिलें आहे असें म्हणतात. पण छापील सह्याद्रिखंडांत हीच कथा थोडी निराळ्या रीतीनें सांगितली आहे.

समुद्रतीरीं परशुराम स्नानास गेला असतां कांहीं मनुष्यें अचानक त्याच्या दृष्टीस पडलीं. परशुरामानें त्यांची विचारपूस केली. त्यांनीं 'आम्हीं कोळी आहोंत; मासे मारण्याचे कामीं कुशल आहोंत. समुद्रतीरीं राहतों.' अशीं उत्तरें दिलीं. परशुरामानें त्यांच्या जाळ्यांचीं जानवीं करून दिलीं आणि साठ कुळें पवित्र केलीं. चितास्थानीं पवित्र कल्यामुळें 'चित्पावन' असें नांव प्राप्त झालें. असा सह्याद्रिखंडाचा निष्कर्ष आहे. सह्याद्रिखंडाला किती प्रमाण मानावयाचें हा एक मोठा प्रश्नच आहे.

कोणी म्हणतात—चित्त पोळणारे, चित्तपोळे म्हणजे—चित्तपावन. ह्यालाही आधार सह्याद्रिखंडाचा देतात. परशुरामानें समुद्र हटवून ब्राह्मणांची स्थापना केल्यावर तो गोकर्ण महाबळेश्वराकडे गेला. जातांना त्यानें सांगून ठेविलें होतें कीं, संकट पडल्यास माझें स्मरण करा; म्हणजे मी त्याचें निवारण करीन. परशुरामानें दिलेलें आश्वासन पडताळून पहावें म्हणून त्या ब्राह्मणांनीं आक्रोशाला सुरवात केली. त्याबरोबर परशुराम धांवत आला. पण त्याला असें आढळलें कीं, या ब्राह्मणांनीं आपणाला फसविलें. परशुराम क्रोधाविष्ट झाला आणि 'तुम्हीं निंद्य व्हाल, दुर्गुणी व्हाल, पतित व्हाल;' इत्यादि प्रकारें शाप देऊन तो निघून गेला. ब्राह्मणांनीं हात जोडून प्रार्थना केल्यावर 'तपश्चर्या केल्यास शुद्ध व्हाल' असेंही अभयवचन परशुरामानें दिलें. सह्याद्रिखंडाचा आधार घेऊन 'चित्त पोळलेले म्हणजे चित्तपावन' असेंही म्हणतात.

रा. गुंजीकर हे आपल्या सरस्वतीमंडळांत म्हणतात कीं, "सह्याद्रिखंड हें फार अलीकडच्या लेखांनीं भरलेलें आहे. पुस्तकाची रचना अस्ताव्यस्त दिसते. रचना एकाच्या हातची असेल असें म्हणवत नाहीं. तथापि सह्याद्रिखंडाच्या पोथ्या प्राय: देशस्थ ब्राह्मणांच्या संग्रहींच आढळतात. यावरून सह्याद्रिखंडाचा कर्ता कोणी तरी कोंकणस्थ-कऱ्हाडे द्वेष्टा असावा."

रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलीक म्हणतात:—चित्पावन ब्राह्मणांचे आद्यपूर्वज हे परप्रांतांतून जहाजावर बसून आले खास! मग ते हिंदुस्थानच्या किनाऱ्यांवरीलच एखाद्या दूरच्या बंदरांत जहाजावर चढले म्हणा, किंवा

कोंकणपट्टीच्या पश्चिमेस अरबी समुद्रापलीकडे असलेल्या दक्षिण आफ्रिकेच्या किनाऱ्यावरून चढले म्हणा. हिंदुस्थानांत आल्यावर येथील पूर्वींच्या द्राविड-ब्राह्मण-संघांत त्यांची गणना होऊं लागली.

गुंजीकर म्हणतात—चित्पावन ब्राह्मण ज्या प्रदेशांमध्यें पूर्वींपासून रहात आले आहेत, त्या प्रदेशाला बर्बर कोंकण हें नांव आहे. बर्बर कोंकणच्या थेट पश्चिमेस समुद्रापलीकडे आफ्रिकाखंडांतील इजिप्त देश आहे. तेथें किनाऱ्यापासून पश्चिमेस ५० कोसावर 'बर्बर' या नांवाचें प्रचीन नगर आहे. त्या प्रदेशाला 'बर्बरी देश' अशी सामान्य संज्ञा आहे.

केरलाश्च तुलिङ्गाश्च तथा सौराष्ट्रवासिनः
कोंकणाश्च कुडालाश्च वरालाटाश्च बर्बराः ॥

बर्बर देशांतील लोक हिंदुस्तानांतील लोकांपेक्षां गोरे, उंच बांध्याचे, सरळ नाकाचे आणि घाऱ्या डोळ्यांचे असतात. रावसाहेब मंडलीकांच्या तर्काप्रमाणें चित्पावन हा 'जिप्तवान्' म्हणजे 'इजिप्तवाला' ह्याचा अपभ्रंश आणि 'बर्बर कोंकण' म्हणजे कोंकणच्या ज्या प्रदेशांत बर्बर देशचे हे लोक येऊन राहिले तो प्रदेश; असा तर्क संभवतो. परशुरामाचे वेळेस हे लोक आले आणि ते तारवांतून आले असा अंमळ उदार मनानें अर्थ घेतला म्हणजे रावसाहेबांचा तर्क व सह्याद्रिखंड यांचा संबंध जुळतो.

मि. डी. आर. भांडारकर हे चित्पावनांचीं नांवें व प्यालेस्ताइन प्रांतांतील स्थळांचीं नांवें ह्यांतील सादृश्यावरून त्या प्रांतांशीं चित्पावनांचा संबंध जोडतात. चित्पावनांबद्दल अशी एक आख्यायिका आहे कीं, हे मूळचे देशस्थ ब्राह्मण. आंब्याची जोगाई हें त्यांचें कुलदैवत. यास मोमिनाबाद नांव आहे.या मोमिनाबादेहून परशुरामानें १४ पुरुष व १४ स्त्रिया कोंकणांत आणिल्या व तेथें त्यांची वसाहत करून दिली. आमचें असें मत आहे कीं, "जोगाईच्या आंब्याकडेच चित्पावनांचें मूलस्थान असावें. उत्पातप्रिय क्षत्रियांचा मोड करण्याचे कामीं परशुरामाचे जे सहकारी होते त्यांना स्वस्थपणें राहण्याकरितां परशुरामानें कोंकणांत नवीन वसाहत करून दिली." कुडाळदेशकर इतिहास

संशोधक रा० ब० बांबर्डेकर म्हणतात कीं, चित्पावन हे मूळचे तुर्की ब्राह्मण. सोरटी सोमनाथ येथें अद्याप तुर्की ब्राह्मण आढळतात. तुर्कस्थान, अरबस्थान आशियामायनर या भागांत पूर्वी चातुर्वर्ण्य होतें व आर्यसंस्कृतीचें साम्राज्य मुसलमानी उत्पातापूर्वी त्या प्रांतांत होतें, अर्थात् आज ज्याला तुर्कस्थान म्हणतात त्या प्रांतांतील हिंदुधर्मीय चातुर्वर्ण्यवान् ब्राह्मण जे इकडे जहाजांत बसून आले ते चित्पावन ब्राह्मण. ”

‘ शतप्रश्नकल्पलता ’ या ग्रंथाचा कर्ता माधव म्हणतो कीं “सह्याद्रीच्या पश्चिमेस १४ ब्राह्मण वेदवेदांगज्ञ असे यज्ञकर्मे करीत असत. दैवयोगानें अकस्मात् समुद्रवासी बर्बरांनीं त्यांना नेलें. हे सर्व ब्राह्मण म्लेंच्छसंगतीनें पतित झाले. कालेंकरून परशुरामानें त्यांना प्रायश्चित देऊन शुद्ध केलें. चौदा गोत्रें व साठ उपनांवें दिलीं. शाकल आणि तैत्तिरीय अशा शाखांचें अध्ययन करण्यास सांगितलें. परशुरामानें त्यांच्या चित्ताची शुद्धि केली म्हणून हे चित्त-पावन ब्राह्मण;” हा माधव सह्याद्रिखंडांतील आख्यायिकेचें खंडन करतो. याचा काल राजारामाची कारकीर्द हा असावा. राजारामछत्रपतींच्या कारकीर्दीत चित्पावन ब्राह्मण नुकतेच देशावर येऊं लागले होते, आणि राज्यकारभारामध्यें शिरण्याची धडपड करीत होते त्या वेळचा हा कुत्सित लेखक माधव असावा, असें गुंजीकर म्हणतात.

श्रीयुत न. चिं. केळकर टिळकचरित्रांत म्हणतात कीं, कोंकणस्थ ब्राह्मण हे उत्तरेकडून खालीं कोंकणपट्टीनें उतरत उतरत आले असावेत किंवा समुद्रा-पलीकडूनही आले असण्याचा संभव आहे. एन्थोवेन आपल्या Tribes and Castes या ग्रंथांत लिहितो कीं, १७१५ पर्यंत कोंकणस्थ शब्द प्रचारांत नव्हता. बाळाजी विश्वनाथापासून चित्पावन शब्द मागें पडून कोंकणस्थ हा शब्द पुढें आला. पेशव्यांचा उदय होण्यापूर्वी चित्पावनांची स्थिति अगदीं शोचनीय होती. ते प्रामुख्यानें हरकारूचें म्हणजे गुप्तहेराचें काम करीत असत. बरेच दिवसपर्यंत कोंकणस्थांच्या पंक्तीला देशस्थ ब्राम्हण बसत नसत. कोणत्याही धर्मकर्माला देशस्थ ब्राह्मण चित्पावनाला ब्राह्मण म्हणून भोजनास सांगत नसत. चित्पावनांच्या मूळपीठिकेबद्दल आतांपर्यंत बरींच मतें

वर निर्दिष्ट केलेलीं आहेत. आतां महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक श्रीयुत विसूभाऊ ( विश्वबंधु ) राजवाडे यांचें मत नमूद करितों.

' परशुराम किंवा पर्शुराम ' यालाच भार्गवराम असेंही म्हणतात. परशु म्हणजे फरश अथवा कुऱ्हाड. पर्शु हें पुरातनकालीन एका आयुधजीविसंघाचें नांव आहे. पाणिनीनें ५।३।११७ याचा उल्लेख केला आहे. असुर लोकांचे इतिहासांत ' पर्सुअ ' या नांवानें पर्शूंचा उल्लेख आढळतो. हे पर्शु अर्वाचीन पारसीकांचे पूर्वज होत. पर्शुराम पर्शु होता. म्हणजे प्राचीन पारसीकांचे व ग्रीसमधील प्राचीन ग्रेशियन् लोकांचे पूर्वज यांचे अन्योन्य संबंध असावेत असें म्हणावें लागतें. पर्शुमधील जो पर्शुराम त्यानें शालिवाहन शकापूर्वी १२२५ च्या सुमारास १४ चित्पावनांची कोंकणांत ऊर्फ आपरान्तांत स्थापना केली. पुरातनकालीं पर्शु, भृगु या प्रांतांत म्हणजे आशियामायनरमध्यें चातुवर्ण्य होतें. पर्शुच्या जनपदांतील पराक्रमी पर्शुरामानें १४ ब्राह्मण कोंकणांत आणिले असावे. चित्पावन ब्राह्मण इजिप्त, पालेस्ताईन प्रांतांतून आलेले कोणी तरी लोक असावेत व ते प्राचीन काळीं एकवर्णी असावे असा तर्क कोणी करतात. या तर्कांत अशी एक असंभाव्यता होते कीं, हिंदुस्थानांतील इतर ब्राह्मणांनीं या मूळच्या यहुदी किंवा मिस्ली एकवर्णी म्लेंच्छांना ब्राह्मण म्हणून ब्राह्मण्यांत समावून घेतलें! **गोत्रप्रवरांना डोळ्यांत तेल धालून जपणारे भारतीय ब्राह्मण म्लेंच्छांना ब्राह्मण करून घेतील किंवा मानतील हें असंभाव्य आहे.** चित्पावन ब्राह्मण पश्चिमेकडून आलेले असले तर ते पर्शु लोकांच्या देशांकडूनच आले असले पाहिजेत. पर्शुकालांत पुरातनकालीं चातुर्वण्य होतें. पर्शूंच्या शेजारीं असुर लोकांचें मोठें साम्राज्य त्या कालीं पसरलें होतें. मुसलमानांच्या जुलमानें पारशी जसे हिंदुस्थानांत आले तसे असुरांच्या जुलमामुळें चित्पावन ब्राह्मण कोंकण किनाऱ्याच्या आश्रयाला आले असण्याचा संभव आहे. कारण मुसलमानांप्रमाणें असुरहि पुष्कळ क्रूर होते.

चित्पावन हा चित्तपावन शब्दाचा अपभ्रंश. चित्तपावन हा चित्यपावन शब्दाचा अपभ्रंश. चितिसंबंधक तें चित्य. फक्त वांवभर जमीन नांगरून नाना

प्रकारच्या विटांनीं पक्ष्यांच्या आकारासारखें जें एक स्थान करावयाचें त्याचें नांव चिति. अग्निचयनांत अशा पांच चित्या लागतात. चितींतला अग्नि तो चित्यग्नि किंवा नुसता चित्य. या चित्यग्नीच्या उपासनेनें म्हणजे अग्निचयनानें पावन झालेले जे लोक ते चित्यपावन होत. मुख्य मुद्दा इतका कीं, पर्शुरामानें आणिलेले १४ ब्राह्मण हे वैदिक धर्माप्रमाणें वागणारे व यज्ञयागादि करणारे होते. चिपळुणपासून ३ मैलांवर ' पर्शुराम ' नांवाचा पर्वत आहे, तेथें भार्गवरामाचें देवालय आहे. चित्पावन जे कोंकणांत उतरले ते दाभोळच्या खाडींतून पर्शुराम पर्वतावर येऊन राहिले. या पर्वताच्या पायथ्याशीं आसपास वस्ती करून राहणाऱ्या चित्पावन ब्राह्मणांवरून त्या भूमीला ' चित्यपावन भूमि ' अशी संज्ञा पडली. चिपळूण व चित्यपावन यांचा कोणी संबंध जोडतात, पण तो चुकीचा आहे. पुरातन चिपळूण किंवा चिपोळण वासिष्ठी किंवा शिव या दोन नद्यांच्या संगमावर आहे. चित्पावन ब्राह्मणांनीं या स्थानाला ' चिपळूण ' असें नांव दिलें असावें. सुमारें तीन हजार अठ्याऐशीं वर्षांपूर्वीं चित्पावन ब्राह्मण कोंकणांत आले ते अग्निचयन करणारे होते; म्हणजे गृहस्थ होते. अग्निहोत्र्यांना यजमानीण प्राय: अवश्य लागते. चित्पावनांचें पुरुष दैवत ' पर्शुराम ' व स्त्रीदैवत ' जोगेश्वरी ' होय. चित्पावन पुरुष जसे परशुरामचे तशा मूळ चित्पावन स्त्रिया जोगाईच्या आंब्याच्या असाव्यात. एवंच, परशुरामाचे १४ ब्राह्मण व आंबाईच्या १४ मुली यांची जी संतती ती सध्यांचे चित्पावन ब्राह्मण होत. यावर भा. इतिहास सं. मंडळाचे अध्यक्ष श्री. का. ना. साने ( कल्याण ) म्हणतात:--" जोगाईच्या आंब्याजवळच्या १४ गोत्रांच्या १४ ब्राह्मणांकरितां स्त्रिया आणिल्या. त्यांनीं जोगेश्वरी ही आमची कुळस्वामिनी असा आग्रह धरिला. " ह्या विधानास रा. राजवाडे यांनीं आधार दिलेला नाहीं. निजामच्या हद्दींतील आंब्याची जोगेश्वरी ही कोंकणासारख्या दूर प्रदेशांतील चित्पावनांची कुलस्वामिनी कशी झाली हें एक गूढच आहे. तें गूढ रा. राजवाडे यांच्या अनुमानानें समाधानकारक उलगडत नाहीं. तथापि वस्तुस्थिति तशी आहे खरी. अकोल्याचे रा. केळकर वकील हे भाषाशास्त्राच्या अभ्यासानें चित्पावनांची मूळ पीठिका उलगडेल असें लिहितात व गो. कृ. मोडक पुणें हे पुढीलप्रमाणें म्हणतात.

'कोंकणस्थ ब्राह्मणांस चित्पावन ही संज्ञा लावितात. तिच्या मुळाचा थोडासा विचार येथें करतों. परशुरामानें बाणानें समुद्र हटविला वगैरे अलंकारिक पौराणिक वर्णनावरून अनुमित होणारी वस्तुस्थिति पुढील प्रकारची होय. सह्याद्री पर्वतास लागून असलेलें समुद्राचें पाणी परशुरामानें भर टाकून मागें हटविलें, व सुमारें २० कोस रुंदीची जमिनीची पट्टी तयार केली. तीवर वसाहत करण्यास त्यानें ब्राह्मण बरोबर नेले. हेच चित्पावन किंवा कोंकणस्थ ब्राह्मण होत. यांनीं तेथें काय केलें ? जमीन साफसूफ करून वसतिक्षम केली. या कामांत फोडणें, खणणें, सपाट करणें वगैरे क्रियांचा अंतर्भाव होतो.

डुकर आपल्या तोंडानें खणतें, त्याच्या तोंडास पोत्र म्हणतात. बायका कापड्यानें शेणखळा पसरून जमीन शुद्ध करतात, या फडक्यास पोतेरें म्हणतात. पोत्र व पोतेरें हे दोनही शब्द पू-धातूपासून निघालेले आहेत. तेव्हां खणणें, स्वच्छ करणें वगैरे क्रिया पू-धातूचा अर्थ ठरतो. त्यानें दर्शित क्रिया करणारा तो पावन ( पुनाति सः ), जसें नंदयति सः नन्दनः, मथ्नाति सः मथनः. हा पू-चा अर्थ घेऊन वसाहत करणारा तो पृथ्वीचा पावन असें ठरतें. आतां परशुरामास अशा पावनांची म्हणजे क्षेत्रनिवासक्षम करणारांची जरूर लागली हें उघड आहे. या लोकांना कोणती संज्ञा प्राप्त होणार ? अशा वसाहतवाल्यांना भूमिपावन किंवा एतादृश दुसरी एखादी संज्ञा लावण्यांत येणार. त्यांतल्या त्यांत क्षिति-पावन हा शब्द विशेष समर्पक दिसतो. तो कसा ? भूमि साफ करणें जरूर खरें, पण ती साफ करून काय करावयाचें ? ती वसाहतीस उचित बनवावयाची. अर्थात् ह्या ठिकाणीं माणसाचे वस्तीस योग्य होणें हा पृथ्वीचा धर्म लक्ष्य आहे. तेव्हां पृथ्वीच्या अनेक पर्यायांपैकीं जो पर्याय प्रस्तुतार्थाचे निर्वाहास योग्य असेल त्याचीच योजना येथें प्रशस्त होय. यमक्षय म्हणजे यमाचें वसतिस्थान इत्यादि शब्दांत क्षि-धातूचा अर्थ बसणें असा व क्षितीचा अर्थ जिच्यावर वसतात ती असा आहे. अर्थात क्षिति हा शब्द येथें आपणांस योग्य दिसतो, तोच पावन याशीं समस्त होऊन क्षिति-पावन ही संज्ञा बनली आहे. हिचा अर्थ जमीन साफसूफ करून तिला क्षिति म्हणजे राहाण्यास उचित प्रदेश बनविणारा असा ठरतो. सारांश, परशुरामाच्या साथी

दार ब्राह्मणांस लावण्यास क्षितिपावन ही संज्ञा अन्वर्थक दिसते. रचनादृष्ट्या हिचा संबंध चित्पावन ह्या शब्दाशीं जुळतो काय ? क्षेत्रसिंह याचें रूपांतर छेत्सिंग ( चेत्सिंग ); लक्ष्मण याचें लछमन; या धर्तीवर क्षचा छ बनून क्षितीचें रूपांतर छिति असें झालें. पुढें छोटिका छुटिका–चुटकी या धर्तीवर छितीचे जागीं चिति आलें. रीति–रीत, लहरी–लहर, या धर्तीवर चितीचें चित्. ज्ञान-अकाश याचे उच्चारांत न चा अ गळतो, तसा चितचा अ गळून चित् बनला. हा चित्पावनशीं समस्त होऊन चित्पावन बनला. तात्पर्य, क्षितिपावन म्हणजेच चित्पावन.

नवीन कार्यक्षेत्रांत प्रथम उडी घेणारा, अग्रेसर इत्यादि लाक्षणिक अर्थ ( क्षितिपावन ) नवीन वसाहत करणाऱ्यांच्या अंगभूत आहेच. परशुरामाच्या बरोबरच्या वसाहतवाल्यांचे वंशज असल्यानें या परंपरेस अनुसरून, कोंकणस्थ लोकांनींही आपल्या अंगच्या धाडसानें आपला हा धर्म अनेकवार सिद्ध केला आहे. सारांश, चित्पावन हा शब्द, पौराणिक कथेस धरून कोंकणस्थांस लावण्यांत येणारा, त्यांच्या ऐतिहासिक व वर्तमान काळांतील कर्तबगारीस अनुसरूनच आहे. या विवेचनावरून चित्पावन ही संज्ञा निंदाव्यंजक नसून सर्वथा प्रशस्तिपर आहे, हें स्पष्ट सिद्ध होतें.

चित्पावन ब्राह्मण हे कृष्णयजुर्वेदी तैत्तिरीय शाखेचेच असावेत व पुढें कांहीं कारणामुळें चित्पावन ऋग्वेदी बनले असें एक मत आहे. सांप्रत ऋग्वेद शाकलशाखा आणि कृष्णयजुर्वेद तैत्तिरीयशाखा ह्याच काय त्या चित्पावनांमध्यें आढळतात. आश्वलायन व सत्याषाढ वा हिरण्यकेशी सूत्रानुसार ह्यांचीं धर्मकर्में होतात.

**जवळ**—किंवा खात मुख्यत्वेंकरून रत्नागिरी जिल्ह्यांत आढळतात. ही जात मूळची दक्षिण हिंदुस्थानांतली असून उत्पात अगर राजकर्तृत्व जुलूम यामुळेंच ती गलबतांत बसून मुलांमाणसांसह दापोली तालुक्यांत बुरोंडी नजीक आली. वादळाच्या प्रहारानें गलबतांचे तुकडे तुकडे झाले असतां त्या वादळांतून म्हणजे जवळांतून (कोंकणांत वादळास जवूळ म्हणतात ) ही जात बचावली म्हणून जवळ असें नांव पडलें. परप्रांतांतून आलेल्या या जातीच्या सद्-

ब्राह्मण्याबद्दल ब्राह्मणांना शंका वाटली म्हणून ते त्यांच्याशीं भोजनव्यवहार करीनात. पेशवाईंतील प्रसिद्ध सरदार हरिपंत तात्या फडके यांनीं यांचीं उपनयनें व श्रावण्या करवून यांना आपल्या घरीं देवघरापर्यंत निरनिराळ्या अधिकारावर नेमलें. तेव्हांपासून यांचें सद्ब्राह्मण्य मान्य झालें.

जवळ ऋग्वेदी शाकलशाखी आहेत. त्यांचीं धर्मकर्में आश्वलायन सूत्राप्रमाणें होतात.

ते मुख्यत्वेंकरून शेतीचा धंदा करितात.

**जंबू कण्व**—ह्यांची थोडीशी वस्ती अहमदनगर जिल्ह्यांत आहे, पण यांचा मुख्य भरणा मध्यप्रांतांत आहे. ही जात मूळची उत्तर गुजराथेंतील असून मुसलमानी उत्पातामुळें बेगडा महमदाचे वेळीं ती नेमाड, वऱ्हाड व मध्यप्रांताकडे सरकली आहे. नेमाडांत जंबू ब्राह्मण नार्मदीय ब्राह्मणांच्या खालोखाल आहेत. जंबू शहरावरून जंबू ब्राह्मण, किंवा जांबवतीशीं याज्ञवल्क्यानें लग्न लाविल्यामुळें त्या संततीला हें नांव मिळालें असें कोणी म्हणतात. कांहीं असलें तरी नेमाडांतील अथवा गुजराथेंतील पंचद्राविडांतील एक जंबू ब्राह्मणसमूह मध्यप्रांतांत सुमारें दोनशें वर्षांपूर्वीं आला यांत शंका नाहीं. भडोच, अहमदाबाद, सुरत या भागांशीं व थोडासा अहमदनगर जिल्ह्याशीं यांच्या धाग्यादोऱ्याचा संबंध पोहोंचतो. हे ब्राह्मण पंचद्राविड असून सर्व शाकाहारी आहेत. हे ब्राह्मण मूळचे गुजराथी असले तरी त्यांचे गुजराथी आचारविचार आतां अवशिष्ट नाहींत. मध्यप्रांतांतील दक्षिणी ब्राह्मणांशीं यांचा राजरोस अन्नव्यवहार होतो.

हे ब्राह्मण शुक्ल यजुर्वेदी कण्वशाखीय असून यांचीं धर्मकर्में कात्यायन श्रौतसूत्राप्रमाणें होतात.

ते व्यापार व व्याजबट्ट्याचा धंदा करून पोट भरतात.

**तिरगूळ**—अथवा तैत्तिरीय आपस्तंब या जातीचें मूलस्थान आंध्रदेशांतील सप्तगोदा प्रदेश बिझवाडा, राजमेहेंद्री हा तैलंगणाचा भाग होय. टिपूचा छळ आणि दैवी आपत्ति यांमुळें या लोकांनीं आपला देश सोडला व ते जीव बचावण्यासाठीं व पोट भरण्यासाठीं निरनिराळ्या प्रांतांत घुसले. मुंबई

महाराष्ट्रांत कोंकण भाग सोडून यांची वस्ती विशेष आहे. हे लोक महाराष्ट्रांत पानमळ्यांचा धंदा करूं लागले. त्यामुळें पानांवरील कीड हे ब्राह्मण मारतात असा आक्षेप त्यांजवर ठेवून इतर ब्राह्मण त्यांस कमी लेखूं लागले. शिवाय भाषाभिन्नत्व व आचारभिन्नत्व यामुळेंही यांच्याविषयीं गैरसमजुतीस कारण झालें. त्यांतच भिक्षुकी मत्सराची भर पडली. त्यामुळें यांचेकडील अन्नादि व्यवहार सुटत चालले. तथापि अद्यापही कांहीं ठिकाणीं यांच्याशीं भोजन प्रतिभोजन व्यवहार चालू आहे, व बल्लारी, बेंगलूर, विजापूराकडे शरीरसंबंधही चालू आहेत.

पानमळ्याच्या निषिद्ध धंद्यावरून या जातीचे आचारविचार शूद्रांपेक्षांही कमी प्रतीचे आहेत व त्यांचे इतर ब्राह्मणांशीं अन्न-लग्न-व्यवहार होत नाहींत, असे अनेक आक्षेप या जातीवर गेल्या अर्ध शतकांत आले. तथापि या जातीनें अनेक विद्वान् शास्त्री, पंडित, श्री शृंगेरी, श्री हंपी विरूपाक्ष, श्री उत्तरादि व राघवेंद्र वगैरे मठाधिष्ठित शांकर व माध्वमतानुयायी पीठांकडून, अनुकूल निर्णय मिळवून वरील सर्व आक्षेपांचें वैयर्थ्य सिद्ध केलें आहे.

तिरगूळ कृष्णयजुर्वेदी तैत्तिरीय शाखी आहेत. त्यांच्यांत पुष्कळ स्मार्त व थोडे वैष्णवही आहेत. ते सर्व शाकाहारी आहेत.

**देवरुखे**—मुख्यत्वेंकरून महाराष्ट्रांत व मुंबई शहरांत आढळतात. या जातीचें मूळस्थान कोल्हापूर, विशाळगड, संगमेश्वर हा भाग असावा. देवरुखे या नांवावरून देवराष्ट्र म्हणजे कृष्णा नदीच्या पूर्व बाजूचा प्रदेश, अर्थात् तेथील ते देवराष्ट्रीय ब्राह्मण असें कोणी अनुमान करितात. परंतु प्रबळ प्रमाणांच्या अभावीं हें अनुमान लंगडें पडतें. क-हाड्यांप्रमाणें देवरुखेसुद्धां मूळचे देशस्थ असाही एक समज आहे. त्यांचे देशस्थांशीं आजपर्यंत बरेच विवाह झाले आहेत. ऋग्वेद शांकलशाखा व कृष्ण यजुर्वेदी तैत्तिरीय शाखा अशा दोन्ही शाखांचे ब्राह्मण या जातींत आहेत. हे मुख्यतः शेती करून उदरनिर्वाह करितात. कांहीं व्यापार करितात व कांहीं सरकारी नोकरींत आहेत.

**देशस्थ**—हे बृहन्महाराष्ट्रांत सर्वत्र आढळतात. देशावर राहाणारे ते देशस्थ अशी देशस्थ शब्दाची व्युत्पत्ति करण्यांत येते. ह्या ब्राह्मणांचा प्राचीन

इतिहास उपलब्ध नाहीं. तथापि विंध्य पर्वताच्या उत्तरेकडून इतर सर्व ब्राह्मणांच्या पूर्वी हे महाराष्ट्रांत येऊन स्थायिक झाले असें अनुमान आहे. यांच्यांत स्मार्त आणि वैष्णव असे दोन पोटभेद आहेत. त्यांच्यांत क्वचित् परस्पर विवाहसंबंध होतो. इतर कोणत्याही ब्राह्मण जातींत न आढळणारी भाचीबरोबर लग्न लावण्याची चाल या जातींत रूढ आहे.

देशस्थ ऋग्वेदी शाकलशाखीय असून त्यांचीं धर्मकर्मे आश्वलायन सूत्राप्रमाणें होतात.

देशस्थ सर्व प्रकारचे धंदे करितात. दक्षिण महाराष्ट्रांतील बहुतेक कुळकर्णी याच जातीचे आहेत.

**नार्मदीय**—यांची मुख्य वस्ती नेमाडांत आहे. तेथून हे बऱ्याच वर्षांपूर्वी खानदेश, वऱ्हाड, मध्यप्रांतांत आले. यांच्याशीं माध्यंदिन ब्राह्मणांचे व इतर द्राविडांचे भोजनप्रतिभोजन व्यवहार होतात. हे शुक्ल यजुर्वेदी जाबालशाखीय आहेत.

**पद्ये**—ही वास्तविक स्वतंत्र जात नाहीं. गोव्यांतील कऱ्हाडे ब्राह्मणांस पद्ये असें नांव आहे. परंतु महाराष्ट्रांतील कऱ्हाड्यांशीं त्यांचा शरीरसंबंध होतो असें दिसत नाहीं.

**पल्लेवाळ**—ह्यांची वस्ती खानदेश बऱ्हाणपुराकडे थोडीशी आहे. हे मूळचे गुजराथेंतले, पण यांचे आचारविचार सर्व महाराष्ट्रीय ब्राह्मणांप्रमाणें आहेत. हे शुक्ल यजुर्वेदी माध्यंदिनशाखीय आहेत.

**भट्ट प्रभू**—ही जात पद्यांतील म्हणजे कऱ्हाड्यांतील एक पोटभेद आहे. त्यांची वस्ती फक्त गोमांतकांत आहे. सुमारें दोनशें वर्षांपूर्वी ह्या जातीला एका क्षुल्लक कारणावरून बहिष्कृत करण्यांत आलें. यांचे आचारविचार कऱ्हाड्यांप्रमाणेंच आहेत. अलीकडे पुष्कळ पद्ये ब्राह्मण यांच्याशीं भोजनप्रतिभोजनाला प्रवृत्त झाले असून लवकरच हे आपल्या मूळ जातींत समाविष्ट होतील अशीं चिन्हें दिसत आहेत.

**मैत्रायणी**—मैत्रायणी ही कृष्ण यजुर्वेदाची शाखा आहे. या शाखेचे ब्राह्मण हल्लीं नाशिक, पूर्व खानदेश, बऱ्हाणपूर, भंडारा, नागपूर भागांत आहेत.

या शाखेच्या सात भेदांपैकीं फक्त मानवसूत्री व वाराहसूत्री ब्राह्मण शिल्लक आहेत. पूर्वीं या दोन ब्राह्मणांमध्यें परस्पर व्यवहार होत नसे. पण हल्लीं अन्न-लग्नादि व्यवहार होऊं लागले आहेत.

खानदेशांतील कांहीं मत्सरग्रस्त ब्राह्मणांनीं या जातीविरुद्ध पंक्तिपावनत्वाचा वाद उपस्थित केला होता. परंतु श्रीमच्छंकराचार्य मठ संकेश्वर व करवीर यांनीं चौकशीमंडळ नेमून मैत्रायणी ब्राह्मणांच्यातर्फे निकाल दिला असून त्यांचे कऱ्हाड्यांशीं एक दोन शरीरसंबंधही झाले आहेत.

**वाज माध्यंदिन**—यांची वस्ती खानदेश, वऱ्हाड व मध्यप्रांत येथें आहे. यांना आभीर म्हणजे कोळ्यांपासून केलेले ब्राह्मण असें म्हणून हिण-विण्यांत येत असे. पण यांचें सद्ब्राह्मण्य आतां मान्य झालें असून त्यांचे व इतर माध्यंदिनाचे आतां शरीरसंबंधही होऊं लागले आहेत.

**सहवासी**—वैष्णव ब्राह्मणांमध्यें सहवासी वैष्णव असा एक पोटभेद आहे. ही जात कर्नाटकांतून टिपू सुलतानाच्या उत्पातामुळें महाराष्ट्रांत आली. ब्राह्मणोत्पत्तिमार्तंड या ग्रंथांत यांची गणना कर्नाटक ब्राह्मणांत केली आहे. यांची वस्ती हावेरी, म्हैसूर, हुबळी, अध्वनी या कर्नाटक भागांत बरीच आहे. यावरून हे कर्नाटकांतील ब्राह्मण इकडे आले त्यास बराच काळ लोटला हें सिद्ध आहे. हे ब्राह्मण ऋग्वेद-शाकल--शाखी आहेत. आश्वलायन सूत्राधारें यांचीं धर्मकर्मे होतात. या जातींतून विविधक्षेत्रांत कर्तीं माणसें चमकत आहेत.

**सामवेदी**—मुख्यत्वेंकरून ठाणें जिल्ह्यांत आढळतात. त्यांच्या पान-मळ्यांच्या व्यवसायामुळें आणि दुसऱ्या कांहीं कारणांमुळें आपल्या शेजारच्या ऋग्वेदी व यजुर्वेद्यांशीं ते एकरूप होऊं लागले आहेत.

**सारस्वत ब्राह्मण**—गोमांतक, महाराष्ट्र, दक्षिण व उत्तर कानडा, मल-बार व बृहन्महाराष्ट्रांतील इतर ठिकाणीं आढळतात.

हे ब्राह्मण मूळचे आर्यावर्तातले. हे सरस्वती नदीच्या कांठीं राहात असत. एकदां बारा वर्षांचें अवर्षण पडलें असतां अन्नोदकाभावीं हाहाःकार उडाला. त्या वेळीं धर्म व विद्या यांचा लोप झाला. तरीही आपत्तींत दधीचीपुत्र सारस्वत

ऋषीनें सरस्वती नदींतून रोज एक मत्स्य घेऊन त्यावर उदरनिर्वाह केला व वेदविद्या जगविली. पुढें याच ऋषीनें दुष्काळानंतर सर्वत्र वेदविद्येचा प्रसार केला. सारस्वत ऋषीच्या शिष्यांना व वंशजांना या ऋषीच्या नांवावरून सारस्वत हें नांव पडलें. सारस्वत ब्राह्मणाची वस्ती पंजाब, काश्मीर, सिंध, बंगाल व गुजराथेंत अद्यापि आहे. उत्तरेकडील या सारस्वतांना दक्षिणेंत श्रीपरशुरामानें आणलें अशीही आख्यायिका आहे. पृथ्वी निःक्षत्रिय करून दान दिल्यावर परशुरामानें समुद्र हटवून सह्याद्रीच्या पश्चिमेस नवीन भूमी संपादन केली. तिला परशुराम क्षेत्र म्हणतात. तेथें दिग्विजयार्थ परशुरामानें केलेल्या यज्ञाला गौड देशाहून दशगोत्री सारस्वत आले होते. यज्ञानंतर त्यांना गोमांतक प्रांतांत अष्टग्रामांचा अग्रहार देऊन राहाण्यास सांगितलें. तेव्हांपासून हे ब्राह्मण गोमांतकांत राहिले असें संभवतें. ऐतिहासिक शोध असा आहे कीं, मुसलमानांच्या त्रासानें हे उत्तरेकडील ब्राह्मण गुजराथेंत व पोर्तुगीजांच्या त्रासानें तेथूनही खालीं सरकले.

महाराष्ट्र आणि गुजराथी सारस्वत मूळांत जरी एक असले तरी त्यांचा कोणत्याही प्रकारें परस्परांशीं संबंध नाहीं. त्यांचे आचारविचारही भिन्न असून त्या दोन अगदीं स्वतंत्र जाती आहेत. गुजराथी सारस्वतांचें वर्णन वर दिलेंच आहे.

या जातीस सारस्वत ब्राह्मण, गौड ब्राह्मण, सारस्वत गौड ब्राह्मण, त्रिहोत्र ब्राह्मण, कोंकणी ब्राह्मण अशीं नांवें आहेत. त्याशिवाय कित्येक लोक यांना शेणवई ब्राह्मण किंवा शेणवी ब्राह्मण म्हणतात. शेणवी शब्दाचा मूळ अर्थ विद्वान् ब्राह्मण म्हणजे पंडित असा असून कालांतरानें तो प्रतिष्ठासूचक शब्द बनला. सांप्रत गोमांतक, कानडा, मलबार इत्यादि प्रदेशीं विद्वान् ब्राह्मण, शाळेचे पंतोजी, गांवचे कुळकर्णी, ब्राह्मण कारकून, ब्राह्मण सावकार, यांच्या नांवाला हें प्रतिष्ठार्थक उपपद् लागत असतें. तसेंच प्रत्यक्ष नांव न उच्चारतां त्या लोकांस हांक मारते वेळेस, 'शेणवी' आणि 'शणय' या शब्दांची योजना करण्याचा त्या प्रांतीं फार सांप्रदाय आहे. अर्थात् 'शेणवई' अथवा 'शेणवी हा जातिवाचक शब्द नाहीं.

सारस्वतांत बारदेशकर, भालावलकर, दिवाडकर, गौड सारस्वत, लोटलीकर पेडणेकर आणि सारस्वत अथवा कुशस्थळी, कजुले, खडपे, किर्लोसकर, नर्वाणकर, राजपुरकर असे बारा पोटभेद आहेत. ह्यांपैकीं कांहीं ग्राममूलक असून कांहीं क्षुल्लक भांडणामुळें झालेले आहेत. ह्या सर्व पोटभेदांचा परस्पर रोटीव्यवहार होतो, पण बेटीव्यवहार होत नाहीं. साष्टीकर अथवा कोंकणी असा पूर्वी आणखी एक पोटभेद होता, पण ते आतां बेटीव्यवहारानें गौड सारस्वत ह्या भेदाशीं एकरूप झाले आहेत.

हे सर्व ब्राह्मण मूळचे स्मार्त होते. पुढें कांहीं वैष्णव झाले. यांच्या मुख्य गुरुपीठास कैवल्यमठ म्हणतात. याशिवाय चित्रापूर, काशीमठ, गोकर्णमठ, असे स्मार्त वैष्णवांचे मठ आहेत. सारस्वतांचे पुरोहित बहुतेक सारस्वत आहेत. ते अब्राह्मणांचें पौरोहित्य करणें अधर्म्य समजतात. वृत्ति असेल तर इतर ब्राह्मणांना त्या कामावर नेमतात. पूर्वी हे ब्राह्मण चतुर्वेदी असावेत. सांप्रत ऋग्वेद शाकल शाखेचेच सर्व अनुयायी आहेत. आश्वलायन सूत्राप्रमाणें धर्मकर्मे होतात. मंगेश, शांतादुर्गा, महालक्ष्मी, रामनाथ, नागेश, अशीं यांचीं पूज्य देवस्थानें गोमांतकांत आहेत.

सारस्वतांत गुप्तरीत्या मत्स्याहार आहे. धर्मकृत्यें, हव्यकव्य, श्राद्धपक्ष, इत्यादि प्रसंगीं मत्स्याहार वर्ज्य आहे.

पूर्वीपासून ही जात विद्या, कला, राजकारण, शोध यांमध्यें प्रसिद्ध आहे. ग्रंथकार, कवी, शास्त्री, पंडित, वैदिक, वकिल, डाक्टर, इंजिनीअर, बॅरिस्टर, व्यापारी इत्यादि—थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे अलीकडील लौकिक व वैदिक यच्चावत् क्षेत्रांत सारस्वत ब्राह्मणांतील शेंकडों कर्ती माणसें महाराष्ट्र क्षितिजावर चमकत आहेत.

**गौड ब्राह्मण**—पंचगौडांतर्गत गौडांतील कुडाळदेशकर ब्राह्मण ह्या नांवाची एकच जात मुंबई इलाख्यांत आहे.

**कुडाळदेशकर ब्राह्मण*** —ह्यांचें दुसरें नांव आद्यगौड असें आहे. हे ब्राह्मण महमद गजनीच्या उत्पाताच्या वेळीं १०१७ मध्यें दक्षिणेंत कुडाळ प्रांतांत आले. कुडाळदेशकरांचा मूळ पुरुष सामंत प्रभु नामक एक ब्राह्मण असून तो कनोजच्या राजाचा मांडलिक होता. त्यानें उत्पाताच्या वेळीं दक्षिणेंतील सम्राट महामंडलेश्वर याचा आश्रय केला. कदंबाच्या आश्रयानें सामंत प्रभु घराण्यांतील देवशर्म्यांच्या ज्ञातिबांधवांनीं राजाश्रयानें साळशी महालांत व कालांतरानें कुडाळ प्रांतांतील उत्कृष्ट भागांत कायमची वसाहत केली. कालांतरानें कोंकणप्रांतांत यादवांच्या ताब्यांत गेला व हें सामंत घराणें यादवांचें मांडलिक बनलें. यादवांच्या राजवटींत देवशर्म्यांचा वंशज संगमहिपती यानें स्वतंत्र सत्ता स्थापन करून सुमारें चारशें वर्षें दक्षिण कोंकण, गोमांतक, सावंतवाडी इत्यादि भागांवर राजसत्ता उसभोगिल्याचें दिसून येतें. सामंतांची सत्ता ही सन १४६१ मध्यें बहामनी शहांनीं कोंकण प्रांत हस्तगत केल्यावर नष्ट झाली. तथापि बहामनी शाहीचीं शकलें होऊन ती अदिलशाहींत समाविष्ट होईपर्यंत सामंत घराण्यांतील वंशजांना देसाई-देशमुखीचे अधिकार मिळतच होते. आदिलशाहीच्या अखेरीस या सामंत प्रभू घराण्याला सरदेसाई म्हणून मांडलिकी व एकोणतीस गांव वतन म्हणून मिळाले. प्रभू घराण्याची ही मांडलिक सत्ता १६९६ पर्यंत चालली. ही सत्ता नष्ट होण्याचें कारण लखम सावंतांचें बंड हें होय. या बंडांत १५६४ सालच्या सुमारास पोर्तुगीजांच्या जुलमास कंटाळून आलेले जे सारस्वत होते तेही सामील होते. प्रभु घराण्याची सत्ता नष्ट होऊन ती सारस्वतांकडे आल्यावर सारस्वत हे सावंतांचे कारभारी बनले. लेखणी सारस्वतांचे हातांत व तरवार मराठ्यांच्या हातांत अशा स्थितींत कुडाळदेशकरांचा सारस्वतांनीं अत्यंत छळ

---

* कुडाळदेशकरांपैकीं बहुतेक लोक व इतर लोकही ते सारस्वतांचा एक पोटभेद आहेत असें मानितात. परंतु अलीकडे कांहीं वर्षें त्यांच्यांतील कांहीं लोक आपण पंचगौडांपैकीं 'गौड' असून आपलें नांव आद्यगौड आहे असें प्रतिपादन करूं लागले आहेत. त्यांचें हें वर्णन त्यांनींच प्रसिद्ध केलेल्या माहितीवरून दिलें आहे.

केला आणि त्यांजवर बामणदंड या नांवाचा कर पांच वेळ बसविला. या छळाच्या काळांत आद्यगौड ब्राह्मणांबद्दल निंदाप्रचूर आख्यायिका, म्हणी, वाक्प्रचार, दंतकथा व कांहीं ग्रंथही निर्माण झाले. या अत्यंत अवनत काळांत कुडाळदेशकर ब्राह्मणांची वस्ती आजरें, बेळगांव, धारवाड, विजापूर, कोल्हापूर, वसई, आरनाळा, मोगरनाड या भागांत पसरली. कुडाळ प्रांतांत ग्रामसंस्था शिल्लक राहिल्यामुळें वृत्तिवान् कुटुंबें तेवढीं तेथें शिल्लक आहेत.

कुडाळदेशकर ब्राह्मण हे मूळचे गौड व शुक्ल यजुर्वेदी. परंतु दक्षिणेंत आल्यावर क्षात्रवृत्ती स्वीकारल्यामुळें यांचें पौरोहित्य कऱ्हाडयांकडे गेले. अर्थात् पुरोहितांचा ऋग्वेद या ज्ञातींत आला. सांप्रत कुडाळदेशकर ब्राह्मण ऋग्वेद शाकलशाखीय व आश्वलायनसूत्री आहेत. हे सर्व ब्राह्मण स्मार्तशांकर अद्वैत-मतानुयायी आहेत. यांची मठपरंपरा स्वतंत्र असून अद्याप शुद्ध व उज्वल अशी आहे.

सारस्वत ब्राह्मणांप्रमाणें या जातींतही मत्स्याहार गुप्तरीत्या रूढ आहे. देवधर्म, श्राद्धकर्में, उपासतापास अशा धार्मिक दिवशीं तो आहार आवर्जून टाळण्यांत येतो. कुडाळदेशकर ब्राह्मणांचा आणि सारस्वतांचा परस्पर भोजन-व्यवहार होतो, पण लग्नव्यवहार होत नाहीं.

व्यापारी, सरकारी अधिकारी, विद्वान्, लेखक, ग्रंथकार, कारखानदार, वकील, डॉक्टर, इंजिनीयर, सार्वजनिक कार्यकर्ते, दानशूर आणि साधुसंत अशा विविध क्षेत्रांत या जातींतील पुष्कळ माणसें महाराष्ट्रांत वावरत आहेत.

**कर्नाटक ब्राह्मण**—कर्नाटक ब्राह्मणांत कर्नाटक, हब्बू आणि हविक असे तीन पोटभेद आहेत.

**कर्नाटक**—कर्नाटक ब्राह्मण फक्त कानडा जिल्ह्यांत आढळतात. ते कृष्ण यजुर्वेदी बोधायनसूत्री आहेत. त्यांचा सामाजिक दर्जा हविकांप्रमाणेंच आहे. परंतु हविक आणि कर्नाटक ब्राह्मण यांचा परस्पर अन्न-लग्नव्यवहार होत नाहीं. ते पौरोहित्य आणि शेती करून उदरनिर्वाह करितात.

**हब्बू**—फक्त कानडा जिल्ह्यांत आढळतात. मयूरवर्म्यानें आठव्या शतकांत त्यांना कानडा जिल्ह्यांत आणलें असें म्हणतात. धारवाड जिल्ह्यांत हब्बू या

आडनांवाचे कांहीं वैष्णव देशस्थ आहेत, यावरून ते मूळचे देशस्थ असावे असें दिसतें. बहुतेक हब्बू ब्राह्मणांच्या मालकीच्या मोठमोठ्या जमिनी आहेत. त्यांची लागवड कित्येक स्वतां करितात व कित्येक खंडानें करून घेतात.

**हविक**—किंवा हविग ब्राह्मण मुख्यत्वेंकरून कानडा जिल्ह्यांत व म्हैसूर संस्थानाच्या वायव्येकडील भागांत आढळतात. बनवासीच्या दुसऱ्या घराण्याचा संस्थापक जो मयूरवर्मा त्याचा बाप शिकवर्मा यानें त्यांस इ. स. ७०० च्या सुमारास उत्तरेकडून आणलें अशी दंतकथा आहे. उत्तर हिंदुस्थानांत रोहिलखंडांत अहिच्छत्र नांवाचें एक उध्वस्त झालेलें शहर आहे. त्यास हल्लीं रामनगर असें म्हणतात. हें रामनगर आपलें मूळस्थान आहे असें हविकांचें म्हणणें आहे. डा. दे. रा. भांडारकर यांस हें म्हणणें मान्य असून ते आणखी असें म्हणतात कीं, मयूरवर्म्यानें त्यांस प्रथम म्हैसूर संस्थानांतील शिमोगा जिल्ह्यांत तलगुंद येथें आणलें. तेथून परत जाण्याचा त्यांनीं प्रयत्न केला तेव्हां त्यांस परत आणण्यांत येऊन, त्यांनीं असें पुनः करूं नये म्हणून, खुणेसाठीं त्यांनीं कपाळाच्या वरच्या भागावर केंसांचा झुपका ठेवावा, असा निर्बंध त्यांस घालण्यांत आला. म्हैसूर संस्थानांतील वायव्येकडील भागांतील हविक अजूनही अशा तऱ्हेनें केंस ठेवितात, ही गोष्ट व त्यांचा गौरवर्ण व आकृति यांवरून ते उत्तर हिंदुस्थानांतून आले आहेत या समजुतीस बळकटी येते.

हविकांत हविक, कोट, सकलापुरी आणि शिवाली असे चार पोटभेद आहेत. यांतील सकलापुरी शिवाय करून इतरांचा परस्पर अन्नव्यवहार होतो, पण कोणांतही परस्पर लग्नव्यवहार होत नाहीं.

हविक ब्राह्मण शुक्ल यजुर्वेदी बोधायनसूत्री आहेत. ते स्मार्तपंथाचे अनुयायी असून रामचंद्रपूर, होन्नळी, नेलेमरे, भंकुळी, क्यागरी आणि अप्सरकोंड येथें त्यांचीं स्वतःचीं धर्मपीठें आहेत.

हविकांतील अर्ध्याहून अधिक लोक पौरोहित्य करितात. इतर लोक नारळ, सुपारी, लवंग, मिरीं आणि वेलदोड्यांच्या बागा करितात. कांहीं सरकारी नोकर असून कांहीं व्यापार व सावकारी करितात.

हविक शाकाहारी असून इतर सर्व द्राविड ब्राह्मणांबरोबर त्यांचा अन्नव्यवहार होतो.

**भराडी**—मुख्यत्वेंकरून पुणें, नाशिक, खानदेश, अहमदनगर आणि ठाणें जिल्ह्यांत आढळतात. त्यांना डबरे गोसावी असेंही म्हणतात. आपण पूर्वी मराठा कुणबी असून जेव्हां नाथपंथाचे अनुयायी बनलों तेव्हां आपली निराळी जात झाली असें ते सांगतात. कांहीं म्हणतात कीं, एका कुणब्यानें त्यास मुलगे झाले तेव्हां नवस केल्याप्रमाणें एक मुलगा देवास वाहिला, त्याचे आपण वंशज आहों.

भराडी सप्तशृंगीच्या अंबाबाईच्या नांवानें भिक्षा मागत गांवोगांव भटकत असतात. ते गोंधळ घालूनही पैसे मिळवितात.

भराड्यांत भराडी, मेंडजोगी आणि साळीमाळी असे तीन पोटभेद आहेत. त्यांच्यांत बरींच आडनांवें आहेत. एकच आडनांव असलेल्या लोकांचा शरीरसंबंध होत नाहीं. लग्नें लहानपणीं अथवा वयांत आल्यावरही करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. सोडचिठ्ठी देतां येते. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रीस दुसरें लग्न करतां येतें.

भराडी मुख्यत्वेंकरून जोतिबा आणि भैरव यांस भजतात. त्यांचे उपाध्ये स्थानिक ब्राह्मण असतात. ते मुद्रा नांवाचा विधी करून मराठ्यांस आपल्या जातींत घेतात. मृतांस पुरतात.

ते मांस खातात व दारू पितात.

**भर्वाड**—सर्व गुजराथभर आढळतात. कृष्णाचा बाप नंद ज्या मेहेर जातीचा होता त्याच जातीचे आपण आहों, अशी दंतकथा त्यांच्यांत प्रचलित आहे. वैश्य बाप आणि शूद्र आई यांपासून त्यांची उत्पत्ति झाली आहे, असेंही कित्येक सांगतात. त्यांचें मूळ स्थान मथुरेजवळील गोकुळ वृंदावन होय असें म्हणतात. तेथून ते मेवाडांत गेले, आणि मेवाडांतून गुजराथ, काठेवाड व कच्छ येथें पसरले असें सांगण्यांत येतें. त्यांचा रबाऱ्यांशीं अगदीं निकट संबंध आहे. त्यांच्याशीं त्यांचा रोटीव्यवहार होतो, पण बेटीव्यवहार होत नाहीं.

भर्वाड गुरांचे व मेंढ्याबकऱ्यांचे कळप पाळतात. ते बकऱ्यांचें व गाई-म्हशींचें दूध विकतात. पुष्कळ लोक नुसतें तूप विकूनच उदरनिर्वाह करितात. थोडेसे शेती व मजुरीही करितात.

कडवा कुणब्यांप्रमाणें भर्वाडांचीं लग्नेंही दर बारा, पंधरा किंवा पंचवीस वर्षांनीं एकदा होतात. तीं वैशाख महिन्यांतील एखाद्या दिवशीं एकाच जागीं होतात. विधवाविवाहास मोकळीक आहे. विधवेस मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न करतां येतें. उत्तर गुजराथेंतील कांहीं भाग शिवाय करून इतर ठिकाणीं सोडचिठ्ठी देण्यास प्रतिबंध नाहीं.

कांहीं भर्वाड रामानंदी पंथाचे अनुयायी आहेत. बाकीचे मातांस भजतात. त्यांचें मुख्य दैवत झाला बापजी असून त्यांचीं जनावरें आजारी पडलीं म्हणजे त्यास ते नवस करितात. त्यांचे उपाध्ये बहुधा ब्राह्मण असतात. मध्य आणि दक्षिण गुजराथेंत ब्राह्मण अथवा दर्जी लग्नविधी चालवितो. यांपैकीं कोणी न आढळल्यास नवरीच्या कुटुंबांतील कोणी तरी पुरुष चालवितो. ते मृतांस जाळतात व श्राद्धें करितात.

कच्छ आणि सुरतमधील कांहीं भर्वाड खेरीज करून बाकीचे सर्व भर्वाड शाकाहारी आहेत. सुरतशिवाय इतर ठिकाणचे भर्वाड दारू पीत नाहींत.

**भंगी**—इलाख्यांत सर्वत्र आढळतात. गुजराथेंत त्यांना हलालखोर, ओळगाणा, बारवाशिया, मेतरिया, जंफोडा आणि मेला अशींही नांवें आहेत. ह्यांपैकीं हलालखोर हें नांव महाराष्ट्रांतही प्रचलित आहे.

भंगी ही हिंदु समाजांतील सर्वांत हलकी जात असून त्यांच्यांत दुसऱ्या जातींनीं जातीबाहेर टाकलेल्या अनेक लोकांचें संमिश्रण झालेलें आहे. ह्याप्रमाणें त्यांच्यांत एकसारखी भेसळ होत चालल्यामुळें त्यांच्या चालीरीति अनिश्चित असून त्यांत बराच गोंधळ आहे. गुजराथेंत त्यांना जरी धेडांपेक्षां अमंगळ व हलकें मानण्यांत येतें, तरी धेडांपेक्षां त्यांच्याकडे लोक अधिक दयार्द्रतेनें पाहतात. धेडांप्रमाणें त्यांना कधींही अपमानकारक निर्बंध घालण्यांत आले नव्हते. उलट टोपली घेऊन चाललेला भंगी समोर आल्यास तो शुभ शकून

मानतात व भंग्याचा आशीर्वादही शुभदायक समजतात. महाराष्ट्रांत त्यांचा दर्जा महारमांगांप्रमाणेंच आहे.

भंगी पुरुष व बायका मळ वाहून नेतात व रस्ते झाडतात. ते वेळूच्या टोपल्या करितात आणि गुरांशिवाय इतर मेलेल्या जनावरांस पुरतात. गुजराथेंत प्रवाशांस वाट दाखविण्याचें काम भंग्यांचें आहे.

महाराष्ट्रांतील भंग्यांत ( १ ) भसोड, ( २ ) चनगडी, ( ३ ) हेला, ( ४ ) लालबेटी, ( ५ ) मखियार, आणि ( ६ ) शेख असे सहा पोटभेद आहेत. त्यांपैकीं लालबेगी आणि शेख यांचा परस्पर रोटीव्यवहार होतो, व फक्त पुण्यांत बेटीव्यवहारही होतो. बाकीच्या चार पोटभेदांपेक्षां त्यांना श्रेष्ठ मानण्यांत येतें. ह्या चारी पोटभेदांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं.

सहा सात पिढयांच्या आंत लग्नें करीत नाहींत. विधवाविवाह आणि सोडचिठ्ठी यांस मोकळीक आहे. विधवेस मृत पतीच्या धाकटया भावाशीं लग्न करतां येतें.

शेख भंगी आपणास मुसलमान म्हणवितात. लालबेगी अर्धवट हिंदू अर्धवट मुसलमान आहेत. शेख शिवाय करून बाकीचे सर्व हिंदूंचे बहुतेक देव व मुसलमानांचे पीर यांस भजतात. ते देवळांपासून कांहीं अंतरावर उभे राहून देवांस नमस्कार करितात. गुजराथेंत भंग्यांचीं लग्नें गारुडा चालवितात. महाराष्ट्रांत त्यांचीं लग्नें हुसेनी ब्राह्मण चालवितात. फक्त शेखांचीं लग्नें मात्र काजी लावितात. मृतांस जाळण्यांत अगर पुरण्यांत येतें. ते श्राद्धें करीत नाहींत.

भंगी गोमांसासुद्धां सर्व प्रकारचें मांस खातात व दारू पितात. महाराष्ट्र आणि सुरत शिवाय करून इतर ठिकाणीं ते मृत जनावरांचेंही मांस खातात. महाराष्ट्रांतील भंगी इतर मांस खाणाऱ्या जातींप्रमाणें श्रावण महिन्यांत मांस खात नाहींत, आणि खेडा जिल्ह्यांतील भंगी सणाच्या दिवशीं मांस खात नाहींत. गुजराथेंतील भंगी वजानिया आणि वाध्री शिवाय करून इतर सर्व जातींच्या हातचें अन्न खातात. महाराष्ट्रांत ते महार मांगांच्या हातचें अन्न खात नाहींत, व महार मांग त्यांच्या हातचें अन्न खात नाहींत.

**भंडारी**—मुख्यत्वेंकरून रत्नागिरी, कानडा, कुलाबा आणि ठाणें जिल्हा, मुंबई शहर व सावंतवाडी संस्थान येथें आढळतात. त्यांस भावगुण असेंही म्हणतात. कानडा जिल्ह्यांत गंगावळी नदीच्या दक्षिणेस त्यांस माडकार असेंही नांव आहे. भंडारी हा शब्द संस्कृत मंधारक म्हणजे दारू गाळणारा ह्या शब्दावरून निघाला आहे असें कित्येकांचें मत आहे. ही व्युत्पत्ति माडापासून माडी काढण्याच्या त्यांच्या धंद्याची सूचक आहे. खुद्द त्या जातीचे लोक भंडारी हा शब्द भंडार म्हणजे खजिना ह्या शब्दावरून निघाला आहे असें म्हणतात. कारण, पूर्वी खजिन्याचें संरक्षण करण्याच्या कामीं त्यांची नेमणूक केलेली असे. मराठे आणि ब्रिटिश यांच्या पायदळांत पुष्कळ भंडारी होते ह्या गोष्टीस इतिहासांत बराच पुरावा आहे. फ्रायर व त्यानंतरचे सर्व लेखक मुंबई बेटांतील भंडाऱ्यांचा उल्लेख भंडारीन ह्या नांवानें करतात. शिवाजीचे प्रसिद्ध हेटकरी भंडारीच होते. भंडारी आणि मराठे कुणबी ह्यांच्यांत पुष्कळ बाबतींत बरेंच साम्य आहे.

भंडाऱ्यांत (१) कित्ते (२) भेलें, (३) गावडे, (४) बंदे (५) कालण, (६) थळे (७) शिंदे आणि (८) किर्पाळ असे आठ पोटभेद आहेत. भेलें भंडारी भेर्ली माडाची ताडी काढतात. बंद्यांत भंडाऱ्यांच्या अनौरस संततीचा समावेश होतो. किर्पाळ भंडारी ठाणें जिल्ह्यांत आढळतात. त्यांना पोर्च्युगीजांनीं बाटवून ख्रिश्चन केलें होतें. पण पुढें ते हिंदु धर्मांत परत आले. ठाणें जिल्ह्यांतील शिंदे आणि गावडे भंडाऱ्यांचा कधीं कधीं बेटीव्यवहार होतो असें म्हणतात.

भंडाऱ्यांत अनेक कुळें आहेत. त्यांतील कित्येकांचीं नांवें मराठ्यांच्या कुळांच्या नांवासारखींच आहेत. त्यांच्यांत वड, पिंपळ, कळंब, उंबर, आंबा इत्यादि देवकें आहेत. त्यांस ते फार पूज्य मानतात. देवकाचा उल्लेख वडाचें कूळ, कळंबाचें कूळ, अशा प्रकारें करितात. ते देवकांचीं झाडें तोडीत नाहींत, त्यांचें लांकूड जाळीत नाहींत, अथवा दुसऱ्या कोणत्याही प्रकारें त्यांस इजा करीत नाहींत. कांहीं ठिकाणीं देवक एकच असलें तर लग्न करण्यास प्रतिबंध आहे. इतर ठिकाणीं नाहीं. अलीकडे कांहीं भंडारी आपणांत वशिष्ठ, अत्रि,

दुर्वास इत्यादि गोत्रें आहेत असेंही सांगूं लागले आहेत. मुलांमुलींचीं लग्नें लहानपणीं अथवा वयांत आल्यानंतरही करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. सोडचिठ्ठी देतां येते. बंदे भंडाऱ्यांत वेश्यावृत्तीनें राहणाऱ्या स्त्रियांस जातीबाहेर घालविण्यांत येत नाहीं. इतर पोटभेदांतील ज्या स्त्रियांस दुर्वर्तनामुळें जातीबाहेर घालविण्यांत येतें, त्यांस ते आपल्यांत घेतात. त्यांच्यांतील कांहीं स्त्रिया अविवाहित राहून वेश्यांचा धंदा करितात.

भंडारी शैव मताचे अनुयायी आहेत. त्यांच्या कुलदेवता, महादेव, रवळनाथ, नागनाथ, रामनाथ, शिवनाथ, कालिका, चंडिका इत्यादि आहेत. त्यांचे उपाध्ये चित्पावन, कऱ्हाडे किंवा कर्नाटक ब्राह्मण असतात. ते मृतांस जाळतात व श्राद्धपक्ष करितात.

भंडाऱ्यांचा परंपरागत धंदा ताडी काढण्याचा व दारू गाळण्याचा आहे. ताडीच्या झाडांवरील कर वाढल्यापासून ( इ. स. १८७७ ) त्यांच्यांतील पुष्कळ लोक शेती आणि मजुरीही करूं लागले आहेत. शिवाय सुतारकाम, गवंडीकाम, दर्जीकाम इत्यादि अनेक प्रकारचे धंदेही ते करूं लागले आहेत. कांहीं कंत्राटें घेतात व कांहीं व्यापार करितात.

ते मांस खातात व दारू पितात.

**भंसाळी**—मुख्यत्वेंकरून कच्छ व काठेवाड संस्थानांत आढळतात. त्यांस वेगू असेंही म्हणतात. भंसाळी हें नांव भानुसाल नांवाच्या राजावरून पडलें आहे असें म्हणतात; परंतु तें भानू म्हणजे सूर्य ह्या शब्दावरून पडलें असावें असें दिसतें. कारण, भंसाळी आपण सूर्यवंशी सोळंकी रजपूत होतों असें म्हणतात. पूर्वीं त्यांस वेगू हेंच नांव होतें व अजूनही इतर जातींचे लोक त्यांस वेगू ह्याच नांवानें संबोधितात. इ. स. १२०० च्या सुमारास लखमतच्या उत्तरेस रणांत त्यांचा वेगूगड नांवाचा किल्ला होता. त्याचे अवशेष अजूनही आढळतात.

भंसाळ्यांत शहाण्णव कुळें आहेत. मुलांमुलींचीं लग्नें बहुधा वयांत आल्यानंतर करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. सोडचिठ्ठी देतां येत नाहीं.

भंसाळी वैष्णवपंथी आहेत, तरी ते देवीस भजतात. त्यांची कुलदेवी हिंग-लाज हिचें पवित्रस्थान सिंधमध्यें कराचीजवळ आहे. त्यांचे उपाध्ये गुजराथी सारस्वत ब्राह्मण असतात. ते त्यांच्या हातचें अन्न खातात.

भंसाळी मजुरी व शेती करून उदरनिर्वाह करितात.

ते शाकाहारी आहेत.

त्यांच्या चालीरीति लोहाणांप्रमाणें आहेत.

**भाट**—भाटांमध्यें रजपूत अथवा गुजराथी भाट आणि मराठा भाट असे प्रांतिक स्वरूपाचे दोन पोटभेद आहेत. रजपूत भाट मुख्यत्वेंकरून गुजराथ, काठेवाड व कच्छमध्यें आढळतात. मराठा भाट महाराष्ट्रांत आढळतात. गुजराथी भाटांची उत्पत्ति क्षत्रियापासून ब्राह्मण विधवेच्या पोटीं अथवा वैश्यापासून क्षत्रिय स्त्रीच्या पोटीं झालेली आहे असें सांगण्यांत येतें; परंतु ते भ्रष्ट झालेले ब्राह्मण आहेत, हें अगदीं उघड आहे. ते आपली उत्पत्ति कवि ऋषीपासून झाली आहे असें मानतात. ते मूळ अलाहाबाद आणि मारवाडांतून येऊन अहमदाबाद शहरांत व त्याच्या आजूबाजूच्या प्रदेशांत स्थायिक झाले. त्यांच्यांत कनोजिया भाट या नांवाचा एक पोटभेद आहे. त्यावरून ते उत्तरेकडून आले असावे असें दिसतें. शिद्दी अली कपूदन (इ. स. १५३३) ह्या तुर्की प्रवाशानें गुजराथी भाटांस ‘ ब्राह्मणांची एक जात ’ असें म्हटलेलें आहे. ते जानवीं घालतात आणि त्यांच्यांत ब्राह्मणांप्रमाणें शाखा आहेत ह्या गोष्टीही ते ब्राह्मण असल्याचेंच सुचवितात. ते भ्रष्ट कसे झाले याचें कारणही अगदीं उघड आहे. त्यांच्या रजपुतांशीं असलेल्या अति निकट संबंधामुळें ते ब्राह्मणांच्या आचारापासून च्युत झाले, व त्यामुळें इतर ब्राह्मण त्यांस हलके लेखूं लागले.

भाटांचा वंशपरंपरागत धंदा आपल्या धन्यांच्या वंशावळी ठेवणें व त्यांचे स्तुतिपाठ करणें हा आहे. ब्रिटिश अमलाच्या सुरवातीस भाट पैशांबद्दल व तहांच्या अटी पाळण्याबद्दल जामीन राहात असत. जर कोणी जामिनकीच्या अटी पाळण्याचें नाकारूं लागले तर आपणास किंवा आपल्या कुटुंबांतील मनुष्यांस त्रागा करून ठार मारूं अशी धमकी देऊन ते त्यांना त्या पाळण्यास

भाग पाडीत. पुष्कळ भाटांनीं हल्लीं आपला वंशपरंपरागत धंदा सोडला असून ते शेती, सावकारी, व्यापार इत्यादि धंदे करूं लागले आहेत. कांहीं प्रसंगानुसार मजुरी करितात, घरकामास राहतात अथवा भीकही मागतात.

उत्तर गुजराथेंतील भाटांत तेरा पोटभेद आहेत. ते असे:—( १ ) ब्रह्म भाट, ( २ ) अतित, ( ३ ) देवलवकिया, ( ४ ) कंकालिया किंवा भुंड ( ५ ) कनोजिया, ( ६ ) कापडी, ( ७ ) लावणिया, ( ८ ) मांगण, ( ९ ) नगारी, ( १० ) पालिमंगा किंवा मधविया, ( ११ ) राणीमंगा, ( १२ ) साधू आणि ( १३ ) वहीवंचा. ह्यांशिवाय काठेवाडांत सोरठिया म्हणून एक पोटभेद आहे, आणि कच्छांत डोंम्रा ह्या नांवाचा एक पोटभेद आहे. ह्या सर्व पोटभेदांत ब्रह्मभाटांस सर्वांत श्रेष्ठ समजण्यांत येतें. ह्या सर्वही पोटभेदांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं.

भाटांत काशियानी, पर्वथियानी इत्यादि बऱ्याच शाखा आहेत. एकाच शाखेच्या स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. तसेंच जवळच्या नात्यांतही लग्न करतां येत नाहीं. कच्छमध्यें मात्र आतेबहिणीशीं अथवा मामेबहिणीशीं लग्न करितात. लग्नें बहुधा वयांत आल्यानंतर करितात. डोंम्रा भाटांत विधवाविवाह रूढ आहे, इतरांत नाहीं. तसेंच कुलीन घराण्यांतही विधवाविवाह करीत नाहींत.

भाट वैष्णव, रामानंद, कबीर, स्वामीनारायण इत्यादि पंथांचे अनुयायी आहेत. काठेवाडांतील कांहीं भाट जैन आहेत. त्यांचे उपाध्ये औदिच, मोध आणि श्रीमाळी ब्राह्मण असतात. ते मृतांस जाळतात व श्राद्धें करितात.

कच्छ आणि पालनपुरांत ब्रह्मभाटांशिवाय इतर भाट मांस खातात व दारू पितात. इतर ठिकाणचे भाट शाकाहारी आहेत.

मराठा भाटांचा दर्जा गुजराथी भाटांपेक्षां हलका आहे. ते आपली उत्पत्ती क्षत्रियांपासून झाली आहे असें म्हणतात. वंशावळी ठेवणारे व स्तुतिपाठ करणारे भाट पदरीं ठेवण्याची रजपूत राजांची जी चाल आहे तिला अनुसरून मराठ्यांच्या सत्तेच्या उदयानंतर ही जात निर्माण झाली असावी असें दिसतें. बहुतेक मराठा भाटांनीं आपला मूळ धंदा

सोडला असून ते दुकानदारी व मजुरी करून पोट भरीत असतात. ते शैव आणि वैष्णव ह्या दोन्ही पंथांचे अनुयायी असून जानवीं घालतात. त्यांचा दर्जा कुणब्यांइतकाच समजला जातो. त्यांच्या चालीरीतीही कुणब्यांप्रमाणेंच आहेत.

**भाटिया**—मुख्यत्वेंकरून कच्छ, काठेवाड, सिंध आणि मुंबई शहर येथें आढळतात. इलाख्या बाहेर ते हरद्वार, हिमालयांतील तेहरी प्रदेशांतील खेडीं आणि मथुरा येथें आढळतात. त्यांना यादव, क्षत्रिय यदुवंशी, कृष्णवंशी, वृष्णीवंशी आणि ठक्कर अशींही नांवें आहेत. उत्तर राजपुतान्यांत जसलमीर येथें राज्य करीत असलेल्या व भाटी अथवा भाटिया ह्या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या यदुवंशाच्या भाटी रजपुतांचे आपण वंशज आहों असें ते सांगतात. त्यांचें मूलस्थान पंजाबांतील लाहोर आणि मुलतान जिल्ह्यांत असावें असें दिसतें. तेथें त्यांची अजूनही बरीच वस्ती असून त्यांपैकीं पुष्कळ मुसलमान झालेले आहेत. त्यांच्या दक्षिणेकडील प्रयाणाविषयीं टॉडनें असें लिहिलें आहे कीं, यदु भट्टींस इ. सनाच्या आठव्या शतकांत सतलज नदीच्या दक्षिणेस हांकलून देण्यांत आलें. परंतु गझनीच्या महंमदाच्या तिसऱ्या स्वारीच्या ( इ. स. १००४ ) वृत्तांतावरून असें दिसतें कीं, त्या वेळींही झेलम नदीच्या पश्चिम तीरावर भलिया किंवा भेरा येथें भट्टींचें एक लहानसें राज्य होतें. ह्यानंतर ज्या मुसलमानांच्या स्वाऱ्या झाल्या त्या वेळींच भाटियांस दक्षिणेस सिंधमध्यें हांकलून देण्यांत आलें हेंच विशेष संभवनीय दिसतें. सिंधमध्यें भाटियांची इतकी अवनत स्थिति झाली आहे कीं, तेथें ते मासे मारण्याचा धंदा करितात आणि अजूनही मद्यमांसाचें सेवन करितात. जाडेजांची सत्ता कच्छ आणि काठेवाड येथें स्थापन झाल्यापासून ( इ. स. १३५० ) त्यांच्यापैकीं पुष्कळ लोक तेथें येऊन स्थायिक झाले असावे.

बहुतेक भाटिये व्यापारी व दलाल असून गेल्या साठ सत्तर वर्षांत त्यांनीं पुष्कळ संपत्ति मिळवून ते मोठ्या योग्यतेस चढलेले आहेत.

भाटियांत (१) कच्छी हलाई आणि (२) सिंधी असे दोन पोटभेद आहेत. त्यांचा रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. त्यांच्यांत चौऱ्यांशीं नुख ( कुळें ) आहेत.

एकाच नुखांतील स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. आतेबहिण, मामेबहिण अथवा मावसबहिण हिच्याशीं लग्न करतां येत नाहीं. भावाभावांस बहिणी-बहिणींबरोबर लग्न करतां येतें. भाटियांत मुलींची संख्या कमी असल्यामुळें लग्नासाठीं मुलीच्या आईबापांस बरीच मोठी रक्कम द्यावी लागते. गरीब भाटियांस तें परवडत नसल्यामुळें गेल्या तीस पस्तीस वर्षांत त्यांनीं हरद्वार आणि तेहरी येथील भाटियांच्या मुलींबरोबर लग्नें करण्याचा उपक्रम सुरू केला आहे. कारण तेथील मुलींबद्दल फारसा पैसा द्यावा लागत नाहीं. अशा लग्नांस त्यांच्यांतील श्रीमंत लोक नाकें मुरडतात, तरीही आजपर्यंत पांचशेंच्यावर अशीं लग्नें झालीं आहेत आणि त्याबद्दल जातीकडून त्यांस कोणत्याच प्रकारें उपसर्ग झालेला नाहीं. मुलींचीं लग्नें बहुधा नऊ ते चौदा व मुलांचीं सोळा ते पंचविसांच्या दरम्यान करितात. विधवाविवाह आणि सोडचिठ्ठी यांस प्रतिबंध आहे.

भाटिये वल्लभाचार्यपंथी वैष्णव आहेत. त्यांचे उपाध्ये पोकर्ण ब्राह्मण असतात. ते त्यांच्या हातचें अन्न खात असल्यामुळें इतर गुजराथी ब्राह्मण त्यांच्या हातचें अन्न खात नाहींत.

पंजाब आणि सिंध शिवाय करून इतर ठिकाणचे भाटिये शुद्ध शाकाहारी आहेत. ते वाण्यांच्या हातचें अन्न खात नाहींत आणि वाणी त्यांच्या हातचें अन्न खात नाहींत.

**भाडभुंजा**—गुजराथेंत आणि दक्षिण महाराष्ट्रांत सर्वत्र आढळतात. त्यांच्यांत गुजराथी, मराठी आणि परदेशी असे प्रांतिक स्वरूपाचे तीन पोटभेद आहेत. त्यांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. गुजराथी भाड-भुंजा आपणांस क्षत्रिय म्हणवितात. परदेशी भाडभुंजा कानपूर, लखनौ, मथुरा आणि बरेली येथून दीडशें वर्षांपूर्वीं इकडे आले असें म्हणतात. त्यांस भुजारी किंवा श्री बस्तम कायस्थ असेंही म्हणतात. महाराष्ट्रांत येऊन स्थायिक झालेले ते मराठी भाडभुंजे. सर्व भाडभुंजे दाणे भाजण्याचा व लाह्या कुरमुरे करण्याचा धंदा करितात.

**भामट्टा**—ही एक चोऱ्यामाऱ्या करणारी गांवोगांव भटकणारी जात असून ती मुख्यत्वेंकरून दक्षिण महाराष्ट्र व कर्नाटक प्रांतांत आढळते. परंतु याशिवाय इतर ठिकाणींही त्यांची वस्ती असली पाहिजे. कारण, पुष्कळ भामटे आपली जात मराठा सांगतात. त्यांना कधीं कधीं खिसेकातरू, वडारी, कलवडर, तुडुग वडर आणि कामाटी असेंही म्हणतात. कल आणि तुडुग ह्या शब्दांचा अर्थ चोर असा आहे. भामटयांना उचल्या, टकारी आणि घंटीचोर अशींही नांवें आहेत.

भामटे मोडकीतोडकी तेलगू भाषा बोलतात आणि त्यांचीं नांवेंही तेलगू नांवांप्रमाणेंच असतात, ह्यावरून ते निजामच्या राज्यांतील किंवा मद्रास इलाख्यांतील तेलगू प्रांतांतून इकडे आले असें अनुमान निघतें. कित्येकांच्या मतें पुण्यांतील भामटे हे खरे भामटे नसून, खरे भामटे उत्तरेकडून इकडे येतात आणि ते रजपूत वंशाचे आहेत.

महार, मांग, चांभार, ढोर, बुरूड इत्यादि जातींशिवाय इतर जातींच्या लोकांस भामटे आपल्या जातींत घेतात, इतकेंच नव्हे तर मुसलमानांसही आपल्या जातींत घेतात. ते दुसऱ्या जातींच्या मुलांस दत्तक घेऊनही आपल्या धंद्याचें शिक्षण देतात. दत्तक घेतलेल्या मुलांस "कोन्नड" म्हणतात व मुलींस "कोन्नडी" म्हणतात. असेंही सांगतात कीं, कित्येक प्रसंगीं उचल्ये संभावित कुळांतील कुमार्गगामी स्त्रिया गर्भवती झाल्या असतां त्यांस आश्रय देतात. प्रसूतीनंतर मुलास ठेवून घेऊन बाळंतिणीस एक लुगडें व एक दोन रुपये देऊन तिची ते रवानगी करितात. ब्राह्मण, मारवाडी, वाणी, सोनार, शिंपी आणि इतर उच्च व मध्यम जातीच्या लोकांनीं भामटयांच्या जातींत प्रवेश केल्याचीं अनेक उदाहरणें आहेत. जातींत येऊं इच्छिणारास जातीच्या लोकांस १० पासून २५ रुपये पर्यंत रक्कम द्यावी लागते. नंतर जातींचे लोक एकत्र जमतात व त्यास न्हाऊं घालून नवे कपडे देतात. मग कोणी तरी पोक्त पुरुष त्याच्या तोंडांत साखर व हळद घालतो. त्यानंतर मेजवानी होते, तेव्हां जातींतील दोघे तिघे पोक्त मनुष्य व जातींत घेतलेला मनुष्य एका ताटांत

जेवतात. मेजवानी आटोपल्यानंतर त्या मंडळीपैकीं एखादा इसम त्या नवीन इसमास दत्तक घेतो.

भामट्यांत जाधव आणि गाईकवाड अशीं दोन कुळें आहेत. एकीच कुळांत लग्नव्यवहार करतां येत नाहीं. तसेंच मुलाच्या बाजूनें चार पिढ्यांच्या आंत लग्नसंबंध होऊं शकत नाहीं. मुलांचीं लग्नें बहुधा दहा ते वीस व मुलींचीं दहा ते सोळा वर्षांच्या दरम्यान करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. सोडचिठ्ठी देतां येते. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रीस विधवाविवाहविधीनें दुसरें लग्न करतां येतें.

कांहीं भामटे वारकरी पंथाचे अनुयायी आहेत. ते मुख्यत्वेंकरून बहिरोबा, भवानी, खंडोबा, म्हसोबा, वेताळ आणि यल्लम्मा ह्यांस भजतात. धर्मविधि चालविण्यास ते ब्राह्मणांस बोलावीत नाहींत. ते जातींतील जाणते चालवितात. मृतांस जाळण्यांत येतें. त्यांच्या शांत्यर्थ दर वर्षी भाद्रपद वद्य अमावास्येस जातीच्या लोकांस जेवण देतात.

भामट्यांतील स्त्रिया व पुरुष दोघेंही चोरी करण्याच्या कामांत पटाईत असून ते दूर दूर ठिकाणीं प्रवास करून आगगाडींत, जत्रेंत व मेळ्यांत चोऱ्या करितात व खिसे कापतात. ते अलीकडे मोठमोठ्या चोऱ्या व दरवडेही घालूं लागले आहेत. ह्याशिवाय ते खेड्यांतील सर्व धंदे करितात व जे सुखवस्तु असतात ते लहानसहान व्यापार व सावकारीही करितात.

ते मांस खातात व दारू पितात.

**भावगुण**—भंडारी जातीचें दुसरें नांव.

**भावसार**—सर्व गुजराथभर, पुणें जिल्हा व कर्नाटक प्रांतांत आढळतात. गुजराथेंत त्यांना छीपा किंवा छापगार असेंही म्हणतात.

भावसारांत गुजराथी आणि मराठा असे प्रांतिक स्वरूपाचे दोन मुख्य पोटभेद आहेत.

गुजराथी भावसारांतील कांहीं लोक पूर्वी वाणी होते असें दिसतें. परंतु त्यांतील बहुतेक लोक आपण क्षत्रिय वंशाचे आहों असें सांगतात, आणि यांच्यांत रजपूत कुळांचीं कांहीं नांवेंही आढळतात. मराठा भावसार हे गुज-

राथी भावसारांची महाराष्ट्रांत जाऊन स्थायिक झालेली एक शाखा असावी असें दिसतें. गुजराथी भावसारांप्रमाणें ते अजूनही सिंधमधील हिंगलाज मातेस भजतात; परंतु इतर बाबतींत त्यांचे रीतरिवाज महाराष्ट्रांतील इतर जातींप्रमाणेंच झालेले आहेत.

गुजराथी भावसारांत हिंदु आणि श्रावक अथवा जैन असे दोन पोटभेद आहेत. त्यांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. हिंदूंत रेवाकांठिया, रामदेशी आणि तळबेदा असे तीन पोटभेद आहेत. ह्यांतील पहिले दोन तिसऱ्यांच्या हातचें अन्न खातात, पण तिसरे पहिल्या व दुसऱ्याच्या हातचें अन्न खात नाहींत. तिघांचाही परस्पर बेटीव्यवहार होत नाहीं. मुलांमुलींचीं लग्नें बहुधा त्यांस बारावें वर्ष लागण्यापूर्वी करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. विधवेस आपल्या मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न करतां येतें. सोडचिठ्ठी देतां येत नाहीं.

गुजराथी भावसार कबीर, राधावल्लभ, रामानंद, वल्लभाचार्य इत्यादि अनेक पंथांचे अनुयायी आहेत. त्यांच्या कुलदेवी अंबाजी आणि हिंगलाज होत. त्यांचे उपाध्ये ब्राह्मण असतात. ते मृतांस जाळतात व श्राद्धें करतात.

भावसार चिटें छापण्याचा व रंगविण्याचा धंदा करितात. पुष्कळांनीं हा धंदा सोडला असून ते हलवाई, शिंपी, धोबी इत्यादिकांचा धंदा करीत असतात. कांहीं शेती करितात.

**भावैय्या**—किंवा तर्गाळा मुख्यत्वेंकरून उत्तर गुजराथेंत आढळतात. ते ब्राह्मण बाप व कणबी आईपासून झालेल्या संततीचे वंशज आहेत असें म्हणतात. ते पौराणिक नाटकें व भवाई म्हणजे सामाजिक नाटकें करीत गांवोगांव भटकत असतात. नाटक मंडळ्या निघाल्यापासून त्यांचा धंदा झपाट्यानें बुडत चालला आहे. पंचमहाल जिल्ह्यामध्यें प्रत्येक मुलीच्या लग्नामागें एक रुपया कर घेण्याचा त्यांस हक्क आहे. त्यांच्यांत व्यास आणि भावैय्या असे दोन पोटभेद आहेत. त्यांचा रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. विधवाविवाहास व सोडचिठ्ठीस मोकळीक आहे. ते मुख्यत्वेंकरून बहुचराजी देवीस भजतात. सात आणि अकरा वर्षांच्या दरम्यान प्रत्येक मुलाची मुंज करितात, परंतु पुढें तो

नेहमीं जानवें घालतोच असें नाहीं. त्यांचे उपाध्ये औदिच ब्राह्मण असतात. त्यांचे धर्मविधि कणब्यांप्रमाणें आहेत.

ते शुद्ध शाकाहारी असून दारू पीत नाहींत.

**भाविण**—ही जात मुख्यत्वेंकरून रत्नागिरी आणि कानडा जिल्हा व सावंतवाडी संस्थान येथें आढळते. त्यांतील स्त्रियांस भाविणी व पुरुषांस देवळी म्हणतात. भाविणींची उत्पत्ति मालवण आणि सावंतवाडीच्या राजांच्या कुळंबिणींपासून झाली आहे असें म्हणतात. पण तत्पूर्वींही त्या अस्तित्वांत होत्या असें दिसतें. ह्या जातींत मुख्यत्वेंकरून मराठा आणि भंडारी ह्या दोन जातींच्या बायकांचा भरणा आहे. दुसऱ्या कांहीं जातींच्या स्त्रियाही देवळांत देवाच्या दिव्यांतील तेल आपल्या डोक्यावर ओतून घेऊन भाविणी होतात.

भाविणी वेश्यांचा धंदा करितात. मात्र इतर वेश्यांत आणि भाविणींत एक फरक आहे. तो हाच कीं, यांना प्रथम देवास अर्पण करण्यांत येतें. ह्यांचा दर्जा कलावंतिणीच्या खालचा असून त्यांस समारंभांत नाचतां गातां येत नाहीं. मुलगी वयांत आली म्हणजे तिचें देवाबरोबर लग्न ( शेस ) करितात. ह्या लग्नांत नवऱ्याच्या ठिकाणीं देवाच्या मुखवटयाची योजना करितात. ज्यांचें देवळ्यांबरोबर लग्न लावावयाचें असतें त्यांचा शेस लावीत नाहींत. त्यांचे धार्मिक आचार व खाणेंपिणें मराठ्यांप्रमाणें आहे.

**भांड**—मुख्यत्वेंकरून काठेवाडांत आढळतात. ते मारवाडांतून येतात आणि भिक्षा मागून पोट भरतात. कांहीं निरनिराळ्या प्रकारचीं सोंगें आणतात आणि नकला करतात.

**भिल्ल**—मुख्यत्वेंकरून गुजराथेंत व खानदेशांत आढळतात. दुष्काळांत कांहीं सिंधमध्येंही जाऊन राहिले आहेत. राजपुतान्यांत आणि मध्यहिंदुस्थानांतही त्यांचा भरणा फार मोठा आहे.

भिल्लांच्या नांवाचा उल्लेख इतिहासांत इ. स. ६०० च्या सुमारास पहिल्यांदा केलेला आढळतो. भिल्ल हें नांव धनुष्य अर्थाच्या एक द्रविड शब्दावरून निघालें आहे असें मानण्यांत येतें. त्यांच्या नांवाचा उल्लेख संस्कृत

वाङ्मयांत फारसा पूर्वी केलेला आढळत नाहीं. अन्हिलवाड्याच्या इतिहासांत भिल्लांचा उल्लेख शत्रू अथवा मित्र ह्या नात्यानें वारंवार केलेला आढळतो. आज दिवसपर्यंत कित्येक रजपूत राज्यांत राज्याभिषेकाच्या वेळीं भिल्लाचें रक्त राजाच्या कपाळास लावल्याशिवाय तो समारंभ पूर्ण होत नाहीं. पूर्वीच्या अंदाधुंदीच्या काळांत भिल्ल मोठ्या धाडसानें व कावेबाजपणें चोऱ्या करीत. मराठे त्यांस अत्यंत क्रूरपणानें वागवीत असत. त्यांना सुधारण्याचा प्रथम प्रयत्न इ. स. १८२५ त खानदेशांत भिल्ल एजन्सी स्थापन करून करण्यांत आला.

कांहीं भिल्ल आपण रजपूत आहों असें प्रतिपादन करितात; परंतु गेल्या शंभर वर्षांतच शांतता प्रस्थापित झाल्यापासून त्यांची गणना हिंदु समाजांत होऊं लागली आहे. भिल्लांत रानावनांत शिकार करून राहणाऱ्या जंगली माणसांपासून काबाडकष्ट करून शेती करणाऱ्या सर्व प्रकारच्या माणसांचा समावेश होतो. साधारणतः त्यांचे गुजराथी भिल्ल आणि खानदेशी भिल्ल असे विभाग करतां येतील. गुजराथी भिल्लांत कोळ्यांप्रमाणेंच रजपूत रक्ताची कमी-अधिक प्रमाणानें सरमिसळ झाली आहे, आणि जेथें कोळी आणि भिल्ल यांची वस्ती अगदीं जवळ जवळ आहे तेथें त्या दोहोंमधील भेद अगदीं अंधुक आहे. पंचमहालांत एक जेवण दिलें म्हणजे पटेलिया, रावळिया आणि बारिया यांस भिल्लांत सामील होतां येतें, आणि गुजराथेंतील वरच्या दर्जाचे कोळी आणि भिल्ल ह्यांच्यांतील कुळांचीं नांवेंही एकसारखींच आहेत, यावरून भिल्ल आणि कोळी हे मूळचे एकच आहेत हें अगदीं स्पष्ट होतें. खानदेशी भिल्लांचें ( १ ) सपाट जमिनीवर राहाणारे भिल्ल, ( २ ) डोंगरांत आणि रानांत राहाणारे भिल्ल आणि ( ३ ) मिश्र जाती, असें तीन पोटभेदांत वर्गीकरण करतां येईल. त्यांपैकीं सपाट जमिनीवर राहाणाऱ्या भिल्लांस नुसतें भिल्ल असेंच म्हणतात. याच्या विरुद्ध टडवी आणि निर्धी खोटील आणि नहाल आणि पावरा, मठवाडी आणि गवीट भिल्ल आहेत. ते पूर्व पश्चिम सातपुड्यांत राहातात. ह्यांशिवाय डोंगरी आणि जंगली भिल्लांत बर्डा, टाणका, धोरेपी, आणि मावची ह्या जाती सातपुड्यांत आणि डांगची ही जात सह्याद्रींत आढळते. मिश्र

जाती तीन आहेतः—(१) भिलाला-हे अर्धवट भिल्ल अर्धवट रजपूत किंवा कुणबी असून पूर्व सातपुड्यांत आढळतात; (२) अर्धवट भिल्ल अर्धवट मुसलमान; (३) पूर्व सातपुड्यांतील टडवी आणि दक्षिणेंतील सातमाळांतील निर्धी. सपाट मैदानावर राहाणाऱ्या भिल्लांत आणि डोंगरी व जंगली भिल्लांत असंख्यात कुळें आहेत. त्यांपैकीं कांहींचीं नांवें रजपूत कुळांप्रमाणें आहेत. खानदेशी भिल्लांतील कांहीं कुळांत देवकें आहेत, तीं ते तेथील मूळ रहिवासी आहेत असें दर्शवितात. त्यांत जीं मुख्य आहेत तीं अशीं:-(१) पांचपालवी, (२) वाघ, (३) बोर, (४) वळदे नांवाचा पक्षी, (५) मोर, (६) पिंपळ, (७) चिमणी आणि (८) आहिर नांवाचा सर्पाप्रमाणें दिसणारा मासा.

कूळ अथवा देवक एकच असेल तर शरीरसंबंध करतां येत नाहीं. सर्व भिल्लांत लग्नें बहुधा वयांत आल्यानंतर करितात, आणि अविवाहित मुलींस भावी वरांनीं पळवून नेल्याचे प्रसंगही वारंवार घडतात. अशा वेळीं पळून गेलेलीं जोडपीं परत आलीं म्हणजे मुलीबद्दल घ्यावयाचा पैसा ठरविण्यांत येतो. गुजराथी भिल्लांत आतेबहिण, मामेबहिण अथवा मावसबहिण इत्यादींशीं लग्न करण्यास मनाई आहे. खानदेशी भिल्लांत आतेबहिणीशीं अथवा मामेबहिणीशीं लग्न करतां येतें, पण मावसबहिणीशीं करतां येत नाहीं. लग्नें वधूवरें स्वतःच अथवा त्यांचे आईबाप ठरवितात. मुलीबद्दल पैसे द्यावे लागतात, पण पैशांबद्दल नवऱ्यानें मुलीच्या आईबापांची नोकरी कांहीं ठराविक मुदतीपर्यंत केली तरी चालते. ह्या चालीस खंडाळिओ म्हणतात. खंडाळिओच्या मुदतींत नवराबायकोस एकत्र राहतां येतें. लग्नापूर्वी वांकडें पाऊल पडल्यास त्याकडे कानाडोळा केला जातो. विवाहबंधन अगदीं शिथिल आहे. सोडचिठ्ठी आणि पुनर्विवाह हीं सुलभ आहेत. इतकेंच नव्हे, तर विवाहित स्त्रीस वाटेल तेव्हां आपल्या प्रियकराकडे जाऊन राहतां येतें. मात्र तिच्या नवऱ्यास लग्नांत झालेला खर्च द्यावयाची त्याची तयारी असली म्हणजे झालें. विधवाविवाह रूढ आहे. विधवेस आपल्या मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न करतां येतें.

खानदेशी भिल्ल मुख्यत्वेंकरून डुंगर्यादेव, शिवार्यादेव, वाघदेव आणि नागदेव यांस भजतात. ह्यांशिवाय ते म्हसोबा, खंडोबा, बहिरोबा, मरी आणि

असा ह्यांसही भजतात. जे भिल्ल गोमांस न खाण्याइतके सुधारलेले आहेत ते धर्मविधि चालविण्याच्या कामीं ब्राह्मणांची योजना करितात. इतरांचे धर्मविधि जातींतील जाणते चालवितात. त्यांस प्रधान असें म्हणतात. टडवी आणि निर्धी भिल्ल हे मुसलमान आहेत. ते लग्नाचा मुहूर्त ब्राह्मणाकडून ठरवून घेतात, पण त्यांचे निक्का ( लग्न ) आणि सुंता हे विधि काजी चालवितात. गुजराथी भिल्ल ब्राह्मणांस मुळींच मानीत नाहींत. त्यांचें मुख्य देवतासंबंधींचें ज्ञान परिस्थितिप्रमाणें कमीअधिक असतें. ते मुख्यत्वेंकरून वाघदेव आणि भुतेंखेतें ह्यांस भजतात. भिल्लांच्या प्रत्येक वसाहतींत त्यांच्याकरितां एक देवस्थान केलेलें असून भुतांस बसण्यासाठीं बांकें ठेवलेलीं असतात. ब्राह्मणाऐवजीं ते भगत किंवा बडवे, रावळ आणि भाट किंवा ढोली यांस मान देतात. भगत म्हणजे देवर्षि अथवा जादूटोणा करणारे व रावळ म्हणजे उपाध्ये. भाट म्हणजे गायक.

मृतांस जाळण्यांत अथवा पुरण्यांत येतें. जातीच्या मुख्यास पुरल्यानंतर दोन महिन्यांनीं त्याचें थडगें उघडतात, त्याच्या तोंडास शेंदूर फांसतात, आणि थडगें पुनः बंद करितात. पुढारी भिल्लांच्या स्मरणार्थ त्यांचे घोड्यावर बसवलेले दगडी पुतळे करून त्यांची स्थापना देवस्थानांत करितात. मृत्यूनंतर होईल तितके दिवस लवकर कैता म्हणजे जेवण देतात. मृताच्या भुताचें वाहन घोडा असतें अशी समजूत असल्यामुळें, ह्या जेवणाच्या वेळीं मृताचा सर्वांत जवळचा आप्त एका ताटांत पितळेचा घोडा ठेवून तें ताट हातांत घेतो, आणि रावळ गाणीं गाऊन त्या घोड्यास बळी अर्पण करितो.

गुजराथी भिल्ल मेलेल्या जनावरांचेंही मांस खातात व दारू पितात. तें मुसलमानांच्या हातचें अन्न खातात. खानदेशांतील सपाट जमिनीवर राहणाऱ्या भिल्लांचा आहार कुणब्यांप्रमाणेंच असतो. डोंगरी भिल्ल मेलेल्या जनावरांचेंही मांस खातात आणि कांहीं अगदीं बाजूस असलेल्या प्रदेशांतील भिल्ल गोमांस आणि म्हशीचें मांसही खातात. सर्व भिल्ल दारू पितात.

**भिल्ल कव्वेरू**—कव्वलिगर जातीचें दुसरें नांव.

**भुते**--किंवा भोपे मुख्यत्वेंकरून पुणें, सातारा, कुलाबा आणि रत्नागिरी जिल्ह्यांत आढळतात. भुते हा भवानीच्या भक्तांचा पंथ आहे. त्यांचें मूलस्थान निजामाच्या राज्यांतील तुळजापूर हें असून तेथें त्यांच्या पंथाचा प्रमुख राहतो. त्याचें आडनांव कदम आहे. हे कदम तेथील भवानीचे पिढीजात पुजारी असून त्यांस तें सर्व गांव इनाम मिळालेलें आहे.

भुते फक्त मराठ्यांस आणि ब्राह्मणांस आपल्या पंथांत घेतात. ज्यास पंथांत घ्यावयाचें त्यास तुळजापुरास नेतात व कदम कांहीं संस्कार करून त्यास पंथाची दीक्षा देतो.

मराठा भुत्यांची एक स्वतंत्र जातच बनली आहे. ब्राह्मण भुते देशस्थ असतात. ते आपल्या जातींतच असतात. मात्र मंगळवारीं आणि शुक्रवारीं भवानीच्या नांवानें ते पांच घरीं तरी भिक्षा मागतात.

मराठा भुते गळ्यांत कवड्यांची माळ घालतात. ह्या माळेच्या बरोबर मध्यावर भवानीची प्रतिमा ओंवलेली असते. एका हातांत मशाल व दुसऱ्या हातांत तुणतुणें घेऊन ते गाणीं गात व नाचत घरोघर भिक्षा मागतात.

त्यांचे रीतरिवाज मराठ्यांप्रमाणेंच आहेत.

**भुयाळ**—महार जातीचें दुसरें नांव.

**भूमिपुत्र**—महार जातीचें दुसरें नांव.

**भोई**—इलाख्यांत सर्वत्र आढळतात. कित्येक ठिकाणीं त्यांना महरिया असेंही नांव आहे. ते मासे मारण्याचा आणि मेणे व पालख्या वाहण्याचा धंदा करितात. ते मासे मारीत असल्यामुळें कधीं कधीं त्यांना कोळी ह्या नांवानेंही संबोधण्यांत येतें. भोई हा शब्द जातिवाचक तसाच धंदेवाचकही असल्यामुळें, डोली वाहणारा महारही आपणास भोई म्हणवितो. दक्षिण महाराष्ट्रांतले भोई मराठा कुणब्यांप्रमाणें दिसतात आणि त्यांचें खाणेंपिणेंही त्यांच्याचप्रमाणें आहे. नाशिक जिल्ह्यांत तर कांहीं कुणब्यांचा आणि भोयांचा परस्पर अन्नव्यवहारही होतो. त्यांचा कृष्णवर्ण आणि त्यांच्यांत आढळणारे देवकांचे अवशेष यांवरून ते येथील मूळ रहिवाशांपैकीं असावेत असें दिसतें.

भोयांचे ठोकळ मानानें प्रांतिक स्वरूपाचे पांच विभाग करतां येतील. ते असे:—( १ ) मराठा, ( २ ) खानदेशी, ( ३ ) कर्नाटकी, ( ४ ) कानडी आणि ( ५ ) गुजराथी.

**मराठा भोई** मासे मारून पोट भरतात. कांहीं धान्याचा व्यापार आणि दुकानदारीही करितात. कांहीं कचेऱ्यांतून शिपाई आहेत. पुणें जिल्ह्यांतील भोयांत भोई, वराडी आणि कडू असे तीन पोटभेद आहेत. त्यांचा परस्पर रोटीव्यवहार होतो, पण बेटीव्यवहार होत नाहीं. अहमदनगर जिल्ह्यांतील भोयांत मराठा आणि मला असे दोन पोटभेद आहेत. त्यांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. नाशिक जिल्ह्यांत चांदोड किंवा सप्तशृंग टेंकडीच्या उत्तरेस राहणारे आणि दक्षिणेस राहणारे असे दोन पोटभेद आहेत. ठाणें जिल्ह्यांत खारी म्हणजे खाऱ्या पाण्यांत मासे मारणारे व गोडे म्हणजे गोडया पाण्यांत मासे मारणारे असे दोन पोटभेद आहेत. त्यांचा एकमेकांशीं रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. रत्नागिरी जिल्ह्यांतील भोयांस राजभोई म्हणतात. ते फक्त पालख्याच वाहतात, मासे मारीत नाहीत. दुसऱ्या भोयांबरोबर त्यांचा रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. त्यांस ते मच्छीमार म्हणतात.

मराठा भोयांत आडनांवानीं दर्शविलीं जाणारीं कुळें आहेत. आतेबहिणीबरोबर अथवा मामेबहिणीबरोबर लग्न करतां येतें. मुलांचीं लग्नें बहुधा सोळा ते पंचवीस व मुलींचीं लग्नें दहा ते चौदा वर्षांच्या दरम्यान करितात. चांगलें स्थळ मिळाल्यास पाळण्यांतील मुलींचींही लग्नें करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. सोडचिठ्ठी देतां येते.

भोई मुख्यत्वेंकरून महादेव, मारुती आणि पंढरपूरचा विठोबा यांस भजतात. त्यांचे उपाध्ये ब्राह्मण असतात. ज्यांस ऐपत असते ते मृतांस जाळतात, इतर पुरतात. मृतांच्या शांत्यर्थ दरवर्षी पक्ष करितात.

ते मांस खातात व दारू पितात.

**खानदेशी भोई**—मासे मारणें आणि पालख्या वाहणें ह्याशिवाय दाणे भाजण्याचा व नदीकाठीं कलिंगडें व कांकडया लावण्याचा धंदा करितात. कांहीं शेतावर मजुरीही करितात. कित्येक गाढवावरून गांवोगांव धान्याची

वाहतुक करितात. त्यांच्यांत महारयर्ली, तरक्षा आणि धिमार किंवा धिवर असे तीन पोटभेद आहेत. पैकीं धिवर गुजराथेंतून आलेले आहेत. कांहीं ठिकाणचे खानदेशी भोई ब्राह्मणांतील गोत्रांचा स्वीकार करीत आहेत. कित्येक ठिकाणीं देवक एकच असेल तर लग्न करतां येत नाहीं. पण साधारणतः एकाच कुळाच्या अथवा आडनांवाच्या लोकांत शरीरसंबंध होत नाहीं. इतर बाबतींत त्यांचें मराठा भोयांशीं सर्वस्वी साम्य आहे.

**कर्नाटक भोई**—स्थानिक मासे मारणाऱ्या लोकांचा आणि बाहेरून आलेल्या मच्छीमार लोकांचा मिश्र समुदाय आहे असें दिसतें.

**कानडी भोयांचा** धर्म आणि रीतरिवाज अंबिगांप्रमाणें आहेत. ते मासे मारणें आणि पालख्या वाहणें ह्याशिवाय कचेऱ्यांतून शिपायांचेंही काम करतात. कांहीं खेड्यांतील देवळांत मशाली धरितात व कांहीं लग्नांत छत्र्या धरतात.

**गुजराथी भोई**—आपण रजपूत असून लखनौहून आलों आहों असें सांगतात. त्यांच्यांत नऊ पोटभेद आहेत. ते असे—(१) बकोरिया, (२) भथवा, (३) गधेडिया, (४) गुडिया, (५) कार, (६) माछी किंवा धीमार, (७) माळी, (८) भेला आणि (९) पुरबिया. माळी आणि बकोरिया यांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होतो. माळी, गुडिया आणि कार यांचा परस्पर रोटीव्यवहार होतो, पण बेटीव्यवहार होत नाहीं. इतरांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. त्यांचा धर्म आणि रीतरिवाज कणब्यांप्रमाणें आहेत. ते मासे मारतात आणि शिंगाड्यांची लागवड करितात.

**भोपा**—रबारी जातीचें दुसरें नांव.

**भोपे**—भुते जातीचें दुसरें नांव.

**मटकों**—पहा–न्हावी.

**मडिवाळ**—अगसा जातीचें दुसरें नांव.

**मदारी**—गारुडी जातीचें दुसरें नांव.

**मराठा**—ह्या जातीचे लोक महाराष्ट्रांत सर्वत्र आढळतात. महाराष्ट्राबाहेर वऱ्हाडनागपूरकडे व मराठ्यांच्या संस्थानांतही त्यांची बरीच वस्ती आहे.

मराठा ह्या शब्द कित्येकांच्या मतें 'महा' म्हणजे 'मोठा' आणि 'रथी' म्हणजे 'योद्धा' ह्या दोन संस्कृत शब्दांवरून निघाला आहे. कित्येकांच्या मतें तो 'महाराष्ट्र' ह्या शब्दावरून निघाला आहे. प. लो. वा. सर रा. गो. भांडारकर यांच्या मतें तो 'रट्ट' ह्या शब्दावरून निघाला आहे. रट्टांची फार प्राचीन काळापासून महाराष्ट्रावर सत्ता होती. ते आपणांस 'महारट्ट' असें म्हणवीत. आणि म्हणून ते ज्या देशांत राहात त्यास 'महारा‍ठ' असें नांव पडलें. 'महाराष्ट्र' हें 'महारा‍ठ' ह्या शब्दाचें संस्कृत स्वरूप आहे. महाराष्ट्रांतील खालच्या जातींवर मराठ्यांच्या चालीरीतींचा जो परिणाम झालेला आहे त्याकडे पहातां, मराठा शब्दाची ही शेवटची व्युत्पत्तीच विशेष ग्राह्य आहे असें दिसतें.

मराठ्यांत 'अस्सल' अथवा 'कुलीन' मराठे आणि त्यांशिवाय इतर मराठे असे दोन पोटभेद आहेत. ह्या दोहोंशिवाय आणखीही एक पोटभेद आहे, त्यांस लेंकावळे, अकरमासे किंवा शिंदे म्हणतात. ह्या पोटभेदांत त्यांच्या अनौरस संततीचा समावेश होतो.

अस्सल मराठे आपणास क्षत्रिय म्हणवितात, आणि रजपूत आणि आपण मुळांत एकच होतों असें सांगतात. अहिरराव, चाळके, चांडेल, गुजर, कदम, कलचुरे, लाड, पवार, साळुंके, शेलार, सिसोदे, यादव, इत्यादि आडनांवें मराठ्यांत आहेत आणि रजपूतांतही आहेत. दोहोंतही विधवाविवाहास प्रतिबंध आहे, दोघेही जानवीं घालतात, दोघांतही पड्याची चाल आहे, इत्यादि गोष्टींवरून अस्सल मराठे आणि रजपूत यांचा अगदीं निकट संबंध असावा असें दिसतें. रजपूत आणि मराठ्यांच्या राजघराण्यांत शरीरसंबंध झाले आहेत असेंही इतिहासावरून सिद्ध होतें. अन्हिलवाड्याचा विख्यात सिद्धराज जयसिंग ह्याची आई गोव्यांतील एका कदंब राजाची मुलगी होती. शिवाजीचा आजा लुकजी जाधव हा देवगिरीच्या रामदेव यादवाचा वंशज होता. अशींच आणखीही उदाहरणें देतां येतील. ह्याशिवाय अस्सल मराठ्यांच्या क्षत्रियत्वाबद्दल आणखीही ऐतिहासिक पुरावा आहे. तो रा. ब. चिंतामण विनायक वैद्य यांनीं अत्यंत परिश्रमानें मिळविला असून आपल्या मध्ययुगीन भारताच्या २ ऱ्या भागांत थोडक्यांत दिला आहे. तो असा:—

" प्रथम महाराष्ट्रांत क्षत्रिय आहेत ही गोष्ट नाशिकच्या लेण्यांतील शातवाहनांच्या लेखांत ' खतिय दपमान दमनस्स ' या शब्दांत स्पष्ट नमूद आहे. हा पुरावा इ. स. १०० च्या सुमाराचा आहे. यानंतर शबर भाष्यांत ( इ. स. ४०० सु. ) 'जनपद पुररक्षण वृत्तिमनुपजीवत्यपि क्षत्रिये राजशब्दमान्ध्राः प्रयुज्यन्ते ' असें वाक्य आहे. यांत दक्षिणेंत क्षत्रिय आहेत हें शबर स्वामी मीमांसासूत्राचे भाष्यकार यांनीं मान्य केलें आहे. यानंतरचा पुरावा ह्युएनत्संगाचा ( इ. स. ६४० ). यानें चालुक्य पुलकेशी महाराष्ट्राचा राजा यास स्पष्टपणें क्षत्रिय म्हटलें आहे. तसेंच कांचीचे पल्लव यांसही क्षत्रिय म्हटलें असून हे महाराष्ट्रीय क्षत्रिय होते हें प्रथम भागांत दाखविलेंच आहे. यापुढील सर्वांत श्रेष्ठ पुरावा कुमारिल भट्टाचा ( इ. स. ७०० सु. ) हा शबरभाष्यावरचा प्रसिद्ध मीमांसक वृत्तिकार आहे. तो वरील भाष्यकाराच्या वचनावर म्हणतो ' आन्ध्राणामिति दाक्षिणात्यासामान्येन भाष्यकारेणोक्तम् ' म्हणजे दाक्षिणात्य अर्थात् महाराष्ट्रांच्या सामान्येन भाष्यकारानें राजा शब्द क्षत्रिय जरी पुर व जनपद यांचें रक्षण करणारे नसले तरी वापरतात असें लिहिलें आहे. यावरून असें दिसतें कीं, महाराष्ट्रांत प्रत्यक्ष राज्य करणारे नसले तरी सामान्य लोकांत क्षत्रिय असून ते आपल्यास राजे म्हणवीत. अर्थात् महाराष्ट्रांतील पाटील किंबहुना सामान्यतः शेती करणारेही लोकांत क्षत्रिय होते आणि ते आपलें क्षत्रियत्व राजा ही संज्ञा वापरून स्पष्ट करीत. ही भाषा अजूनही वापरण्यांत येते. यानंतरचा हेमाद्रीच्या यादवकुल-प्रशस्तीचा पुरावा ( इ. स. १२०० सु. ) यांत रामदेवरावाच्या वंशास कृष्णकुलोत्पन्न मानलें आहे. किंबहुना, ज्ञानेश्वर महाराजांनींही रामदेवरावास यदुकुल-वंश-तिलक म्हटलें आहे. अर्थात् ते क्षत्रिय आहेत असें मान्य केलें आहे. तेव्हां इ. स. १३०० पर्यंत मराठ्यांचें क्षत्रियत्व उत्तम उत्तम धर्मशास्त्रज्ञ ब्राह्मणांस मान्य होतें. बरें, चालुक्य पुलकेशी यानें अश्वमेध करून आपलें क्षत्रियत्व पूर्णपणें सिद्ध केलें. राष्ट्रकूट यादव यांच्या लेखांतही त्यांनीं आपलें यदुवंशोत्पन्नत्व लिहिलें आहे. अर्थात् आम्हीं क्षत्रिय आहों असें त्यांनींही स्पष्टपणें दाखविलें आहे. पल्लव आणि शिलाहार यांच्या लेखांतही क्षत्रियांत

चूडामणि इत्यादि विशेषणें सांपडतात. तेव्हां महाराष्ट्रांतील मराठ्यांचें क्षत्रियत्व धर्मशास्त्रकार ब्राह्मणांच्या लेखांवरून इ. स. १३०० पर्यंत मान्य व सिद्ध आहे असें ऐतिहासिक प्रमाण सांगतें यांत शंका नको. अर्थात् 'कलावाद्यन्तयोः स्थितिः' हें वाक्य यानंतरचें आहे आणि तें उत्तरेकडच्या क्षत्रियांनीं कधींच मानलें नाहीं. आतां ही शंका शेवटीं येईल कीं, उत्तरेकडचे क्षत्रिय मराठ्यांस कमी कां लेखतात व त्यांच्याशीं विवाहसंबंध कां ठेवीत नाहींत ? × × × × × तर यापुढील काळांत म्हणजे १२ व्या शतकांत जातिबंधनें सर्वत्र अधिक कडक झालीं आणि उत्तरेकडील क्षत्रियांनींच काय, उत्तरेकडील ब्राह्मणांनीं सुद्धां, दक्षिणेंतील ब्राह्मणांशीं शरीरसंबंध बंद केले. जर कनोजिया वगैरे पंचगौड दक्षिणेंतील ब्राह्मणांस कमी लेखतात व त्यांच्याशीं अन्नव्यवहारसुद्धां करीत नाहींत, पण त्यामुळें इकडील ब्राह्मणांचें ब्राह्मणत्व नष्ट होत नाहीं, तर त्याचप्रमाणें उत्तरेकडील क्षत्रियांशीं शरीरसंबंध न जाहल्यानें मराठ्यांचें क्षत्रियत्व नष्ट होत नाहीं."

अस्सल मराठ्यांचें क्षत्रियत्व सिद्ध करण्यासाठीं या पुस्तकाच्या संकुचित मर्यादेंत यापेक्षां जास्त चर्चा करण्यास अवकाश नाहीं. तथापि त्यांच्यांत आढळून येणाऱ्या देवकांमुळें ते महाराष्ट्रांतील मूळ रहिवासी असावे असें जें कित्येकांनीं अनुमान काढलें आहे त्या बाबतींत दोन शब्द लिहिणें उचित आहे.

कानडा जिल्ह्यांतील तेथील मूळ रहिवाशांच्या कित्येक जातींत 'बळी' ह्या नांवानें ओळखलीं जाणारीं कुळें आढळतात. प्रत्येक बळीचें नांव एखादें झाड, पक्षु, पक्षी, फळ, फूल, मासा वगैरेवरून पडलेलें असतें. ज्या वृक्षादिकावरून हें नांव पडलेलें असतें त्यास त्या बळीचे लोक पूज्य मानतात व त्यास कोणत्याही प्रकारें इजा करीत नाहींत. तसेंच एकाच बळीच्या लोकांत शरीरसंबंध होत नाहीं. असे बळी ( totem ) जगांतील निरनिराळ्या प्रदेशांतील तेथील आद्य रहिवासी असलेल्या रानटी लोकांत आढळून आलेले आहेत, व त्यावरून ज्या ज्या लोकांत अशा प्रकारचे बळी आढळतात त्यांस तेथील मूळ रहिवासी समजावें असा सिद्धांत करण्यांत आला आहे. बळींशीं कांहीं अंशीं समान असलेलीं देवकें मराठ्यांत आढळतात, इतकेंच नव्हे तर कांहीं बळी

आणि देवकें एकसारखींच आहेत, व कित्येक ठिकाणीं एकच देवक असलेल्या कुळांत शरीरसंबंध होत नाहीं, ह्या गोष्टींवरून मराठे हे महाराष्ट्रांतील मळ रहिवासी असावे, असें अनुमान कित्येकांनीं काढलें आहे. परंतु बळींच्या अथवा देवकांच्या ह्या एकाच प्रमाणावरून कोणत्याही उच्च जातीस एखाद्या प्रदेशाचे मूळ रहिवासी ठरविणें योग्य होणार नाहीं. त्याबरोबर इतर गोष्टींचाही विचार केला पाहिजे. त्या दृष्टीनें पाहातां, मराठ्यांची अंगकांति, त्यांच्या शरीराची ठेवण, त्यांच्या अवयवांची रचना, तसेंच त्यांचा धर्म व आचारविचार पाहातां, ते त्यांच्या क्षत्रियत्वाचेच निदर्शक आहेत असें दिसतें. शिवाय मराठ्यांतील देवकें हीं बळींच्या स्वरूपाचीं नसून तीं त्यांच्या देवतांचीं प्रतीकेंही असूं शकतील असेंही कित्येकांचें मत आहे. ह्या सर्व गोष्टींचा विचार करितां मराठे हे महाराष्ट्रांतील मूळ रहिवासी आहेत असें मानतां येत नाहीं.

वरील विवेचन केवळ अस्सल मराठ्यांसच लागू आहे. ह्यांशिवाय इतर मराठ्यांचा जो मोठा भरणा आहे ते क्षत्रिय आहेत असें मानतां येत नाहीं. निदान इतकें तरी खरें कीं, मुळांत जरी कदाचित् ते क्षत्रिय असेल तरी त्यांच्यांत इतर जातींच्या रक्ताची भेसळ झाली असावी व कुणबी, माळी, गवंडी, लोहार, सुतार, कुंभार, तेली इत्यादि उद्योगप्रधान जाती त्यांच्यांतूनच निर्माण झाल्या असाव्या.

अस्सल मराठे आपण ब्रह्मवंश, शेषवंश, सोमवंश आणि सूर्यवंश अशा चार वंशांचे आहों असें सांगतात. प्रत्येक वंशांत चोवीस कुळें आहेत. कुळांशिवाय त्यांच्यांत शेंकडों आडनांवेंही आहेत. शिवाय त्यांच्यांत ब्राह्मणांप्रमाणें गोत्रेंही आहेत. परंतु त्यांच्यापैकीं बहुतेकांस आपलें गोत्र कोणतें तें माहित नसतें. ह्या बाबतींत छापील पुस्तकें व उपाध्ये त्यांस मार्गदर्शक होतात.

अस्सल मराठे अस्सल मराठ्यांशींच शरीरसंबंध करितात. लेंकावळे व अकरमासे यांचा परस्पर शरीरसंबंध होतो. त्यांच्या चालीरीति मराठा कुणब्यांप्रमाणेंच आहेत. अस्सल मराठ्यांच्या चालीरीति त्यांच्याहून कांहींशा भिन्न आहेत. पुढें दिलेलें वर्णन त्यांनाच लागू आहे.

कुळ अथवा देवक एकत्र असेल तर शरीरसंबंध करतां येत नाहीं. गोत्र एकच असलें तरी चालतें. आतेबहिणीशीं अथवा मावसबहिणीशीं लग्न करतां येत नाहीं. मामेबहिणीशीं लग्न करतां येतें. मुलांचीं लग्नें बहुधा बारा ते पंचवीस वर्षांच्या दरम्यान व मुलींचीं त्या वयांत येण्यापूर्वी करितात. पण वयांत आल्यानंतरही मुलींचीं लग्नें करण्यास हरकत नाहीं. संस्थानिक व जहागिरदार योग्य वर न आढळल्यास मुलींचीं लग्नें त्या बऱ्याच मोठ्या होईपर्यंत करीत नाहींत. विधवाविवाह व सोडचिठ्ठी यास प्रतिबंध आहे.

मराठे मुख्यत्वेंकरून शिव व पार्वती ह्यांस भजतात. ते खंडोबा, भैरव, रोकडोबा, अंबा, भवानी, दुर्गा, शितळा, लक्ष्मी, जोगाई, बोलाई, इत्यादि देवतांसही भजतात. ह्यांशिवाय इतर हिंदु देवता व स्थानिक देवता यांसही ते भजतात. त्यांचे उपाध्ये ब्राह्मण असतात. पण गेल्या कांहीं वर्षांत कित्येक ठिकाणीं त्यांनीं स्वज्ञातीचेच उपाध्ये तयार केले असून तेच त्यांचीं धर्मकृत्यें चालवितात. तसेंच त्यांनीं एक क्षात्र ( मराठा ) जगद्गुरूही निर्माण केला आहे. ते मृतांस जाळतात व त्यांच्या शांत्यर्थ श्राद्धपक्ष करितात.

पुष्कळ मराठे जमीनदार व इनामदार असून बरेच शेतीही करितात. कांहीं संस्थानाधिपति आहेत. महाराष्ट्रांतील बहुतेक खेड्यांतील पाटील मराठेच असतात. कांहीं व्यापार करितात व कांहीं लष्करांत व सरकारच्या निरनिराळ्या खात्यांत नोकरी करितात.

ते मांस खातात. त्यांच्यांत दारू पिण्याचा प्रतिबंध नाहीं, तरी ते क्वचितच दारू पितात.

मराठ्यांत आणि मराठा कुणब्यांत आढळणाऱ्या देवकांची यादी पुढें दिली असून ज्या इतर ज्ञातींत हीं देवकें आढळतात त्यांचीं नांवें त्या त्या देवकापुढें दिलीं आहेत.

| देवकाचें नांव | जातींचीं नांवें |
|---|---|
| १ आघाडा | |
| २ अंजन ... ... ... | तेली, कुंभार. |

| | | | |
|---|---|---|---|
| ३ आंबा ... | ... | ... | भोई, चित्रकथी, महार, न्हावी, गोंधळी, परीट सुतार, गाबीत, ओतारी, रावळ. |
| ४ आपटा ... | ... | ... | भोई, तेली, |
| ५ अराई ... | ... | ... | भोई, पिंजारी. |
| ६ अराटी ... | ... | ... | भोई, महार. |
| ७ आंवळा ... | ... | ... | तांबट. |
| ८ बाभूळ किंवा धमक | ... | ... | महार, भोई. |
| ९ बेल ... | ... | ... | महार, माळी, फुदगी. |
| १० भारद्वाजाचा पंख | ... | ... | |
| ११ बोर किंवा बोराटी | ... | ... | भोई, महार, ओतारी, पिंजारी. |
| १२ बेहेडा ... | ... | ... | तांबट, माळी. |
| १३ चाट ... | ... | ... | होलया. |
| १४ चिंच ... | ... | ... | परीट. |
| १५ दवणा ... | ... | ... | |
| १६ देवनाळ | ... | ... | माळी. |
| १७ तीनशें साठ दिवे | ... | ... | |
| १८ डुकर ... | ... | ... | बुरूड. |
| १९ गरूडाचा पंख | ... | ... | चांभार. |
| २० गरुडवेल किंवा गुळवेल | | ... | न्हावी. |
| २१ घोडा... | ... | ... | न्हावी. |
| २२ हळद ... | ... | ... | न्हावी. |
| २३ हरिण | ... | ... | महार. |
| २४ हरियाळी किंवा अर्खे... | | ... | चांभार. खराडे वाणी. |

| | | | |
|---|---|---|---|
| २५ हस्तिदंत | | | |
| २६ हिवर | ... | ... | अहिर, कुंभार. |
| २७ जांभूळ | ... | ... | भामटा, भोई, ढोर, सुतार. |
| २८ ज्वारी | ... | ... | भामटा, परीट. |
| २९ कदंब किंवा कळंब | ... | ... | भंडारी, रामोशी, चांभार, न्हावी, वाणी, परीट, सुतार, तेली, टकारी. |
| ३० कमळ | ... | ... | धनगर. |
| ३१ कांद्यांची माळ | ... | ... | |
| ३२ कांसव | ... | ... | महार. |
| ३३ केतक किंवा केगद | ... | | |
| ३४ खैर | ... | ... | बुरूड. |
| ३५ सुरी | ... | ... | भामटा, चित्रकथी. |
| ३६ कोचा | ... | ... | सुतार, कुंभार, वाणी. |
| ३७ कोंहळा | ... | ... | चित्रकथी, भिल्ल. |
| ३८ कोया | ... | ... | चांभार. |
| ३९ कुंभार कुकडें | ... | | |
| ४० कुंद | ... | ... | माळी. |
| ४१ कुऱ्हाड | ... | ... | भामटा, भोई, होलया, ढोर, परीट, सुतार, न्हावी, वैदू. |
| ४२ मंदाराचें फूल | ... | ... | |
| ४३ मर्यादवेल | ... | ... | तारू, ढोर, माळी. |
| ४४ म्हैस | ... | ... | महार. |

| | | | |
|---|---|---|---|
| ४५ मोर, मोराचें पीस | ... | ... | भोई, तारू, चित्रकथी, महार, चांभार, भिल्ल, माळी, बुरूड. |
| ४६ नाग | ... | ... | महार, वाणी, परीट. |
| ४७ नागचांफा | ... | ... | महार, परीट, सुतार. |
| ४८ नागवेल किंवा तांबूल | ... | ... | महार, वंजारी. |
| ४९ नंद्रुक | ... | ... | महार. |
| ५० पायर | ... | ... | तांबट. |
| ५१ पाला | ... | ... | चित्रकथी. |
| ५२ पळस | ... | ... | गोंधळी, शिंपी, |
| ५३ पांचपालवी | ... | ... | सुतार, गावीत. देवकें असणाऱ्या बहुतेक सर्व जाती. |
| ५४ पंगारा | ... | ... | गावीत. |
| ५५ पाणकणिस | ... | ... | महार, रामोशी, न्हावी, माळी. |
| ५६ परटिणीचा पंख | | | |
| ५७ फणस | ... | ... | न्हावी. |
| ५८ पिंपळ | ... | ... | भंडारी, भिल्ल, गावीत, न्हावी, माळी, बुरूड. |
| ५९ पिंपरी | ... | ... | बागडी. |
| ६० पिठीचें बाहुलें | ... | ... | महार. |
| ६१ राजहंस | ... | ... | चांभार. |
| ६२ रुचकीन | ... | ... | भोई, महार. |
| ६३ रुद्राक्षांची माळ | ... | ... | महार. |
| ६४ रुई | ... | ... | गोंधळी, ओतारी, रावळ, बुरूड. |

| | | | |
|---|---|---|---|
| ६५ साग | ... | ... | न्हावी, शिंपी. |
| ६६ साळुंकीचा पंख | ... | ... | चित्रकथी, माळी, वंजारी. |
| ६७ सांबर | ... | ... | टकारी. |
| ६८ शमी | ... | ... | चित्रकथी, गोंधळी, ओतारी, माछी, रावळ, |
| ६९ शंख | ... | ... | |
| ७० शेळी | ... | ... | |
| ७१ शिशाचा गोळा | ... | ... | |
| ७२ सोनें | ... | ... | ठाकूर. |
| ७३ सुर्वड | ... | ... | |
| ७४ सूर्यफूल | ... | ... | तारू, टकारी, न्हावी, परीट, महार, होल्या, ठाकूर, धनगर, माळी. |
| ७५ ताड | ... | ... | महार, भिल्ल. |
| ७६ तांबें | ... | ... | महार. |
| ७७ तर्वड | ... | ... | बुरूड. |
| ७८ तरवारीची धार | ... | ... | न्हावी, ठाकूर. |
| ७९ उंबर | ... | ... | भंडारी, महार, चांभार, न्हावी, ढोर, टकारी, गाबीत, माछी, वाणी. |

| | | | |
|---|---|---|---|
| ८० उंता कंतारी | ... | ... | |
| ८१ वड | ... | ... | भंडारी, महार, चांभार, बुरुड,न्हावी, टकारी, गाबीत, ओतारी, फुदगी. |
| ८२ वासन वेल | ... | ... | चांभार, तेली, माळी, रामोशी. |
| ८३ वेळू | ... | ... | न्हावी. |
| ८४ वेत | ... | ... | |

**मरेनवा**—कुंचवक्कल जातीचें दुसरें नांव.

**महरिया**—भोई जातीचें दुसरें नांव.

**महार**—ही जात महाराष्ट्रांतील सर्व भागांत आणि कानडा जिल्ह्यांतील समुद्र किनाऱ्यावर आढळते. ह्यांत परस्पर शरीरसंबंध न करणारे पन्नासांहूनही जास्त पोटभेद असल्यामुळें, त्यांस एकच स्वतंत्र जात मानावें कीं नाहीं याबद्दल संशय पडतो. परंतु ह्या सर्वांही पोटजातींचा धंदा, चालीरीति व दर्जा हीं सारखींच असल्यामुळें मुळांत जरी अनेक जातींच्या मिश्रणानें ती बनली असली, तरी सांप्रत तिला एकच जात मानण्यास कांहीं हरकत नाहीं. ज्या जातींच्या मिश्रणापासून ती बनलेली आहे त्या येथील मूळ रहिवासी असून जमिनीची मालकी त्यांच्याकडेच होती. आर्य लोकांची वस्ती जसजसी पसरत चालली, तसतसें त्यांनीं त्यांच्या जमिनी हिरावून घेतल्या आणि त्यांस गांवा-बाहेर हांकून लावून शेतांची राखण करणें, मैला उचलणें आणि गांवांतील लोकांचे निरोप गांवोगांव पोंचविणें, इत्यादि हलक्या कामांवर त्यांची योजना केली. ह्या लोकांची वस्ती गांवांच्या सीमेवर स्वतंत्र भागांत असून तो भाग 'म्हारवाडा' या नांवानें ओळखला जातो. सर्व जातींचे लोक त्यांना अस्पृश्य मानतात.

ह्या जातीस (१) अंत्यज, (२) अतिशूद्र, (३) भूमिपुत्र किंवा धरणीचे पूत, (४) भुयाळ, (५) चोखामेळा, (६) धेड, (७) डोंब, (८) हुलसावा,

(९) काठीवाले, (१०) म्हेत्रे, (११) मिरासी, (१२) परवारी, (१३) तरळ, (१४) थोरले घरचे आणि (१५) वेसकर अशीं आणखी नांवें आहेत.

कित्येकांच्या मतें महार हा शब्द महाहारी म्हणजे पुष्कळ खाणारा या शब्दापासून झालेला आहे. दुसऱ्या कित्येकांच्या मतें तो मृतहारी ह्या शब्दाचा अपभ्रंश आहे. मार्कंडेय पुराणांत मृतहारी हा शब्द सर्वांत हलक्या जातीस लावलेला आहे. महार लोक मेलेलीं जनावरें उचलून नेत असल्यामुळें त्यांस हें नांव मिळालें असावें असें म्हणतात. अंत्यज आणि अतिशूद्र हीं नांवें ही जात सर्वांत हीन आहे असें दर्शवितात. थोरले घरचे हें नांव व्यंगोक्तीनें दिलें गेलें आहे. भूमिपुत्र किंवा धरणीचे पूत हें नांव महारांच्या मूळ धंद्याचें निदर्शक आहे. धेड आणि डोंब हीं गुजराथेंतील व उत्तर हिंदुस्थानांतील महारांशीं समान असलेल्या जातींचीं नांवें आहेत. काठीवाले हें नांव महारांचा पूर्वीचा व कांहीं अंशीं हल्लींचाही धंदा दर्शवितें. काठी हें महारांचें विशिष्ट लक्षण मानण्यांत येतें. इतकें कीं, कित्येक ठिकाणीं कोर्टांतून व रजिस्टर कचेरींतून काठी ही महाराची निशाणी म्हणून स्वीकारण्यांत येते. वेसकर म्हणजे रात्रीचा पहारा करणारा. महारांत चोखामेळा म्हणून जो साधु होऊन गेला त्याच्या नांवावरून वारकरी पंथाच्या महारांस चोखामेळा हें नांव पडलें आहे. हुलसावा हें नांव फक्त कानडयांतच आढळतें.

महारांस अस्पृश्य मानण्यांत येतें. पंढरपुराशिवाय इतर ठिकाणीं त्यांच्या सांवलीचाही विटाळ मानण्यांत येतो. गांवांतील न्हावी त्यांची स्मश्रू करीत नाहींत. त्यांना गांवांतील विहिरींतून पाणी भरूं देत नाहींत. त्यांना गांवाच्या बाहेर अगदीं निराळ्या भागांत राहावें लागतें. हल्लींचीं प्रवासाचीं साधनें व अस्पृश्योद्धाराविषयीं लोकांत उत्पन्न झालेली जागृति ह्यामुळें ही स्थिति थोड-थोडी सुधारत आहे.

महारांच्या उत्पत्तीविषयीं अशी एक दंतकथा आहे कीं, ते पूर्वीं निशाचर होते. ते आपली सर्व सृष्टि खाऊन टाकतील या भीतीनें ब्रह्मदेवानें त्यांस मनुष्य केलें. ब्रह्मदेवाच्या पायाच्या तळव्यापासून उत्पन्न झालेल्या स्वरूप सोमाज महार नांवाच्या पुरुषानें ह्या जातीची स्थापना केली अशी दंतकथा नाशिक

येथें प्रचलित आहे. अहमदनगर जिल्ह्यांतील महार आपण गाईपासून उत्पन्न झालेल्या चार जातींपैकीं एक आहों असें सांगतात. एका गाईस चार मुलगे होते. तिनें त्यांस आपण मेल्यानंतर तुम्ही माझी काय व्यवस्था कराल असें विचारलें. पहिल्या तिघांनीं सांगितलें कीं, आम्ही देवी म्हणून तुझी पूजा करूं. चौथ्यानें सांगितलें कीं, ज्याप्रमाणें तूं मला पोटांत धारण केलें होतेंस त्याप्रमाणें मी तुला पोटांत धारण करीन. हें ऐकतांच तिघे वडील भाऊ घाबरून गेले व त्यास महाहार म्हणजे पुष्कळ खाणारा असें म्हणाले. महार हा शब्द महाहार ह्या शब्दाचें संक्षिप्त रूप आहे. महारांच्या उत्पत्तीविषयीं आणखीही एक अशी दंतकथा आहे कीं, एकदां पार्वती स्नान करीत असतां बेलाच्या पानावर पडलेल्या रक्ताच्या कांहीं थेंबांचा तिचा स्पर्श झाला. त्यांतून एक सुंदर बालक निर्माण झालें. तिनें तें बालक घरीं नेऊन महादेवास दाखविलें. महादेवानें त्याचें नांव महामुनि असें ठेविलें. एकदां तें मूल रांगत रांगत घराच्या बाहेर गेलें आणि तेथें एक गाय मरून पडली होती ती खाण्यास त्यानें सुरवात केली. हें पाहून महादेव घाबरून गेला आणि त्यानें त्या मुलास शाप दिला कीं, "तूं गांवाच्या बाहेर राहशील, तूं मेलेल्या जनावरांचें मांस खाशील, लोक तुझ्याशीं कोणत्याच प्रकारचा संपर्क ठेवणार नाहींत, ते तुझें मुखावलोकनही करणार नाहींत व कोणत्याही पवित्र वस्तूवर तुझी छायाही पडूं देणार नाहींत." हें ऐकतांच पार्वतीस दुःख होऊन तिनें महादेवास त्या मुलावर दया करण्याविषयीं विनवणी केली. तेव्हां महादेवानें सांगितलें कीं, मृतांस जाळण्याकरितां गोंवऱ्या आणि लांकडें पुरविण्याच्या कामावर लोक त्याची योजना करतील. असें म्हणून त्यानें त्या मुलाचें महामुनि हें नांव बदलून महाहारी असें नांव ठेविलें. वर सांगितलेल्या सर्व दंतकथा महार ह्या शब्दावरील केवळ कोटया आहेत. कांहीं लोकांचें म्हणणें असें आहे कीं, महारांची उत्पत्ति चंद्राच्या (सोम) डाव्या डोळयापासून झालेली आहे आणि म्हणूनच त्यांच्यापैकीं एका पोटभेदास सोमवंशी हें नांव पडलेलें आहे.

महारांत त्रेपन पोटभेद आहेत. ते असेः—

( १ ) आबने, (२) आदवण किंवा अधोण, ( ३ ) अनंथकुल्या, ( ४ ) औट कांबळे, ( ५ ) बल्ही, ( ६ ) बळ कांबळे, ( ७ ) बारके, ( ८ ) बावन किंवा बावने, ( ९ ) बावचा, ( १० ) बाविसे, ( ११ ) बेल, बेले किंवा बेलिया, ( १२ ) बेत, ( १३ ) बोले, ( १४ ) बनकर, ( १५ ) चेळकर, ( १६ ) दौले, ( १७ ) धेड, ( १८ ) धार्मिक, ( १९ ) डोम किंवा डोंब, ( २० ) गरडी, ( २१ ) गवसई किंवा गवसे, ( २२ ) धडशी, ( २३ ) घट-कांबळे, ( २४ ) गोडवण किंवा गोंडवण, ( २५ ) गोपाळ, ( २६ ) हेडशी, ( २७ ) होलार किंवा हुवले, (२८) झाडे, ( २९ ) जोगती, ( ३० ) जुनरे, ( ३१ ) कबुले, ( ३२ ) कडवण, कुडवण किंवा कडू, ( ३३ ) कांबळे, (३४) कासरे, ( ३५ ) खरसे, ( ३६ ) कोचरे, खोसरे किंवा कोसरे, ( ३७ ) लाडवण किंवा लाढण, ( ३८ ) मठ कांबळे, ( ३९ ) मुरळी, ( ४० ) निराळे, ( ४१ ) पाण किंवा पाण्या, ( ४२ ) प्रधान, (४३) पुलर, ( ४४ ) रटी, (४५) सलदी किंवा सलादे, ( ४६ ) सिलवण, ( ४७ ) सिरसाळकर, ( ४८ ) सोम किंवा सोमवंशी, ( ४९ ) सोम कांबळे, ( ५० ) सोन कांबळे, ( ५१ ) सोनैबळ कांबळे, ( ५२ ) सुतद, ( ५३ ) तिळवण.

वरील पोटभेदापैकीं सोमवंशांची संख्या सर्वांत मोठी असून त्यांचा दर्जाही सर्वांत श्रेष्ठ समजला जातो. सावंतवाडी संस्थानांत बेले आणि सोमवंशी यांना एकच समजतात, आणि पाणांमध्यें मांग, वेरड, भोरपी आणि रामोशी यांचा अंतर्भाव होतो असें मानतात. गोपाळ हे महारांतील गोसावी होत. कांहीं ठिकाणीं त्यांना आणि रटींना अर्धजाती मानतात. खंडोबाच्या सेवेस वाहिलेल्या महारांच्या मुलींपासून उत्पन्न झालेल्यांस मुरली महार म्हणतात. महारांच्या अनौरस संततीस गवसी महार म्हणतात. कर्नाटकांतील यल्लम्मा देवीच्या सेवेस वाहिलेल्या अनौरस महारांच्या संततीस जोगती महार म्हणतात. कडवण अथवा कडू म्हणजे अनौरस संतति आणि आदवण म्हणजे कुमारिकांची संतति.

महारांमध्यें अनेक आडनांवें आहेत. एकच आडनांव असलेल्या स्त्रीपुरुषांत शरीरसंबंध होत नाहीं. प्रत्येक आडनांवानें दर्शविल्या जाणाऱ्या कुळास पूर्वीं एक एक स्वतंत्र देवक होतें असा पुरावा सांपडतो. देवकानें दर्शविल्या जाणाऱ्या

वस्तूची, ज्याचें तें देवक असेल, त्या कुळाकडून पूजा केली जाते आणि त्यास कोणत्याही प्रकारें इजा केली जात नाहीं. एकच देवक असलेल्या कुळांत शरीरसंबंध होत नाहीं. या देवकांपैकीं कांहीं पुढें दिलीं आहेत.

| कुळाचें नांव | | | देवकाचें नांव |
|---|---|---|---|
| बगड | ... | ... | उंबर |
| भगत | ... | ... | नाग |
| गइकवाड | ... | ... | सूर्यफूल, कोहळा |
| जाधव | ... | ... | ताड, पानकणिस, कांसव |
| कदम | ... | ... | कदंबाचें झाड |
| म्हसगे | ... | ... | म्हैस |
| मोहिते | ... | ... | उंबर |
| मोरे | ... | ... | मोर |
| सतपाळ | ... | ... | नाग |
| शेवळे | ... | ... | नागवेल |
| सोन कांबळे | ... | ... | चांफा |
| सूर्यवंशी | ... | ... | सूर्यकमळ |
| तळवटके | ... | ... | तांबें |
| तांब्रे | ... | ... | उंबर |
| झंकर | ... | ... | आंबा, उंबर, जांभूळ |

याशिवाय हरिण, नांद्रूक, वड व पिठाचें बाहुलें अशीं आणखीही देवकें आहेत.

पुष्कळ कुळांत देवकांचा लोप झाला असून त्यांबद्दल पांचपालवी ( पांच प्रकारच्या झाडांचीं पानें ) हें देवक पुजण्यांत येतें.

एकाच पोटविभागांतील महार दूर दूर ठिकाणीं राहत असले तर, त्यांच्यांत पूर्वी शरीरसंबंध झाला आहे असा पुरावा मिळाला नाहीं तर, शरीरसंबंध करीत नाहींत. सावंतवाडी संस्थानांत एका खेड्यांतील महार दुसऱ्या खेड्यांतील महारांशीं शरीरसंबंध करीत नाहींत. लग्नें बहुधा तीन पिढ्यांच्या आंत करीत

नाहींत. लग्नें लहानपणीं व वयांत आल्यानंतरही करितात. केव्हां केव्हां एक महिन्याच्या मुलींचींही लग्नें केलेलीं आढळतात. विधवाविवाहास मोकळीक आहे. अविवाहित पुरुषास विधवेशीं लग्न करावयाचें असल्यास त्याला प्रथम रुईशीं अथवा आंगठीशीं लग्न करावें लागतें. सोडचिठ्ठी देतां येते. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रीस विधवाविवाहाच्या विधीनें दुसरें लग्न करतां येतें.

महार लोक भवानी, महादेव, चोखोबा, खंडोबा, विठोबा इत्यादि देवांस भजतात. त्यांच्या विशेष आवडीच्या देवता नागोबा, सटवाई आणि मरीआई ह्या असून त्यांचीं देवळें सर्व महारवाड्यांत असतात. पुष्कळ खेड्यांत मुख्य देवळाशेजारीं महारांचें तळखंबाचें देऊळ असतें. ह्या देवतांशिवाय महार लोक हिंदूंच्या इतर देवतांसही भजतात आणि कित्येकांच्या घरांत मृत पूर्वजांचे टाकही असतात. ते सर्व सण पाळतात आणि मुख्यत्वेंकरून पंढरपूर, आळंदी, जेजुरी आणि तुळजापूर येथें यात्रेस जातात.

महारांचे धर्मगुरू आणि उपाध्ये त्यांच्याच जातीचे असतात. त्यांस गुरु, साधु, वाचक, पंडित, गोसावी किंवा मेंढे जोशी असें म्हणतात. लग्नें चालविण्यासाठीं कधीं कधीं ब्राह्मणांचीही योजना करण्यांत येते. ते दूर उभे राहून लग्नें चालवितात. केव्हां केव्हां जंगमासही बोलावण्यांत येतें.

नामदेव आणि तुकारामाच्या काळीं महारांस भक्तिमार्गाच्या वारकरी संप्रदायांत घेण्यांत आलें. पंढरपुरास नामदेवाच्या उपदेश करण्याच्या जागेशेजारींच त्यांच्यांतील मोठा साधू चोखामेळा याचें मंदिर आहे.

महार साधू भक्तिविजय, दासबोध, ज्ञानेश्वरी, हरिविजय, रामविजय, संतलीला आणि तुकाराम, ज्ञानदेव इत्यादि साधूंचे अभंग वाचतात आणि त्यांचें विवरण करितात.

मृतांस बहुधा पुरण्यांत येतें. ज्यांस ऐपत असेल ते जाळतात. मृतांच्या शांत्यर्थ भाद्रपद महिन्यांत महालय करितात. श्राद्ध करीत नाहींत.

महार वंशपरंपरागत गांवकामगारांपैकीं आहेत. सीमेच्या बाबतींत त्यांचा निर्णय प्रमाण मानण्यांत येतो. सरकारी खजिन्याबरोबर जाणें, सरकारी अधिकाऱ्यांस वाट दाखविणें व त्यांचे निरोप पोंचविणें, गांवच्या सीमा व गांव-

णाऱ्या दुसऱ्याही पुष्कळ जाती संबोधिल्या जातात. मुंबई इलाख्यांतील निरनिराळ्या ठिकाणचे खारवा, कोळी आणि माछी यांमधील भेद बराच स्पष्ट आहे; परंतु निरनिराळ्या भागांत निरनिराळीं नांवें ज्यास्त प्रचारांत आहेत. त्यांच्यांत एकंदर दहा पोटभेद आहेत, ते असेः–(१) धेबला, (२) धिमार, (३) खारवा, (४) खोटी, (५) कोळी, (६) मछिडा, (७) मितना, (८) नडिया, (९) माछी, (१०) सोळंकी. ह्यांपैकीं धिमारांस महाराष्ट्रीय मानतात. परंतु हल्लीं सर्वच माछी गुजराथी भाषा बोलतात. धिमारांचा मुख्य भरणा ठाणें व सुरतचा दक्षिण भाग येथें आहे. सुरतच्या उत्तर भागांत खारवा आणि कोळी यांचा भरणा अधिक आहे. त्यांत खारव्यांस श्रेष्ठ समजण्यांत येतें. बलसाड येथील माछी आपण रजपूत वंशाचे आहों असें सांगतात. तेथें त्यांची संख्या मोठी आहे आणि त्यांच्यांतील खारवा विभागांत रजपूत शाखांचीं नांवें सर्वसाधारण आहेत.

मुलांमुलींचीं लग्नें लहानपणीं व वयांत आल्यानंतरही करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. विधवेस मृत्त पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न लावितां येतें. सोडचिठ्ठी देतां येते.

माछी मुख्यत्वेंकरून कृष्णास भजतात. ठाणें जिल्ह्यांतील मितना माछी फक्त चैत्य आणि हिरवा यांसच भजतात. इतर देवांस भजत नाहींत. माछींचे धर्मविधि ब्राह्मण चालवितात. मृतांस जाळण्यांत येतें. श्राद्ध करण्याची रीत सार्वत्रिक नाहीं.

माछी मासे मारतात व विकतात व खलाशांचेंही काम करितात. ते भाजीपाला विकतात, कौलें चाळतात, शेती करतात आणि रोजमजुरीही करतात. ते मांस खातात व दारू पितात.

**माडकार**—भंडारी जातीचें दुसरें नांव.

**मादिग**—मांग जातीचें दुसरें नांव.

**मानभाव**—अथवा महानुभाव हा एक धर्मपंथ आहे. ह्या पंथाचे लोक सर्व महाराष्ट्रभर व वऱ्हाडांत पसरलेले आहेत. पंजाबांत आणि अफगाणिस्थानांतही थोडे आहेत. ह्या पंथास पुस्तकांतून आणि निरनिराळ्या प्रांतांतून

पुढील नांवें दिलेलीं आढळतातः—( १ ) संन्यासी, ( २ ) योगी, ( ३ ) हंस, ( ४ ) परमहंस, ( ५ ) यति, ( ६ ) मुनि, ( ७ ) महात्मा, ( ८ ) भिक्षुक, ( ९ ) ध्यानी, ( १० ) अच्युतपंथी किंवा जयकृष्णीय.

मानभावांच्या म्हणण्याप्रमाणें त्यांच्या पंथाचीं मतें ईश्वरानें दर युगांत दोन याप्रमाणें आठ अवतार घेऊन प्रगट केलीं आहेत. ह्यांपैकीं श्रीनारायण आणि श्रीहंस हे कृतयुगांत झाले, श्रीनर आणि श्रीदत्त हे त्रेतायुगांत झाले, श्री ऋषभ आणि श्रीकृष्ण हे द्वापार युगांत झाले आणि श्रीप्रशांत आणि श्रीचक्रधर हे कलियुगांत झाले. कृतयुगामध्यें प्रस्थापित झालेली ब्रह्मविद्या श्रीचक्रधरानें नागदेव भट्टाला प्राकृतांत ( जुन्या मराठी भाषेंत ) सांगितली.

हा पंथ श्रीचक्रधर नांवाच्या कऱ्हाडा ब्राह्मणानें इ. स. १२४७ ते १२७१ च्या दरम्यान स्थापन केला व नागदेव भट्ट नांवाच्या त्याच्या देशस्थ ब्राह्मण शिष्यानें त्याचा प्रसार केला. ह्या श्रीचक्रधरास श्रीदत्तात्रयाचा अवतार मानण्यांत येतें.

ह्या पंथाचीं मुख्य तत्त्वें पुढें दिल्याप्रमाणें आहेतः—(१) ब्रह्मचर्य, (२) भिक्षावृत्ति, (३) अहिंसा, (४) अभक्ष्याभक्षण, (५) ईश्वर भक्ति, (६) नित्य अटण. त्यांचा मुख्य धर्मग्रंथ ब्रह्मविद्याशास्त्र हा असून त्यांच्या प्रसिद्ध लीला-चरित्र नांवाच्या धार्मिक ग्रंथांत त्याचा अंतर्भाव झालेला आहे. भगवद्गीता आणि उपनिषदें यांसही ते पूज्य मानितात. भगवद्गीतेचा अभ्यास ह्या पंथांतील सर्व लोकांकडून केला जातो आणि त्यांच्यांतील पंडित त्याच्यावर प्रवचनें करितात. ते मूर्तिपूजा करीत नाहींत आणि श्रुतींवर व पुराणांवर त्यांचा विश्वास नाहीं. देवांपैकीं ते फक्त दत्तात्रय व कृष्ण यांस मानितात. ह्या देवांचे जन्मोत्सव ते मोठ्या समारंभानें साजरे करितात. जेथें दत्तात्रय, कृष्ण आणि चक्रधर यांनीं चमत्कार करून दाखविले असें समजण्यांत येतें, त्या ठिकाणीं त्यांनीं त्यांचीं देवळें बांधलेलीं आहेत. ह्या देवळांत लहान लहान चबुत्रे किंवा घुमट असून त्यांस सफेत रंग दिलेला असतो. त्यांची ते देवाच्या नांवानें पूजा करितात. ते दुसऱ्या देवांची पूजा करीत नाहीं, इतकेंच नव्हे, तर ते त्यांच्या देवळांत वस्ती करीत नाहींत व पाणीही पीत नाहींत. अहिंसा

तत्त्वाचा त्यांच्यांत इतका अतिरेक झाला आहे कीं, ते गवत कापीत नाहींत व झाडाचीं पानें फळेंही तोडीत नाहींत. तसेंच वाहतें पाणी नसेल तेथें ते स्नानही करीत नाहींत, तर ओल्या फडक्यानें आंग पुसून स्वच्छ करितात, आणि पाणी फडक्यांतून गाळून पितात. ह्यांचे मठ काबूल, पेशावर, अमृतसर, जालंदर, लाहोर, रावळपिंडी, मथुरा, भडोच, सातारा, इंदूर, राहेर, नांदोड, आणि दुसऱ्या अनेक ठिकाणीं आहेत.

मानभाव पंथांत अस्पृश्यांशिवाय दुसऱ्या सर्व जातींच्या लोकांस घेतात.

**माळी**—सर्व दक्षिण महाराष्ट्रांत व उत्तर गुजराथेंत आढळतात. कोंकणांत आणि कर्नाटकांतही त्यांची थोडीशी वस्ती आहे. ते मूळचे कुणबी असून त्यांच्या धंद्यामुळें हळू हळू त्यांची स्वतंत्र जात बनली असें दिसतें. माळी हा धंदेवाचक शब्द असल्यामुळें तो हा धंदा करणाऱ्या पांचकळशी, आगरी, भंडारी इत्यादि जातींच्या लोकांसही लावण्यांत येतो. माळी शेती, बागाइती व रोजमजुरी करून उदरनिर्वाह करितात. त्यांच्या बायका त्यांस शेतीच्या कामांत व फुलें, फळें आणि भाजीपाला विकण्याच्या कामांत मदत करितात. माळ्यांत मराठा, गुजराथी आणि कानडी असे प्रांतिक स्वरूपाचे तीन विभाग आहेत.

मराठा माळ्यांत अकरा पोटभेद आहेत, ते असे:—( १ ) फुल माळी, ( २ ) हळदे, बनकर किंवा कास माळी, ( ३ ) काचा माळी, ( ४ ) कडू माळी, ( ५ ) पाडे माळी, ( ६ ) बावने माळी, ( ७ ) अधप्रभू, ( ८ ) अधशेटी, ( ९ ) जिरे माळी, ( १० ) उंडे माळी, ( ११ ) लिंगायत माळी. ह्यांपैकीं फुल माळी, हळदे माळी, जिरे माळी आणि काचा माळी यांचाच भरणा जातींत विशेष आहे. फुल माळी फुलबागा करितात. त्यांना बाकीच्या तिहींपेक्षां श्रेष्ठ समजण्यांत येतें. जिरे माळी जिऱ्याची लागवड करितात. हळदे माळी हळद पिकवितात. काचा माळी कापसाच्या दोऱ्या वळतात. काचा आणि फुल माळ्यांचा परस्पर अन्नव्यवहार होतो. ते जिरे व हळदे यांच्या हातचें अन्न खात नाहींत, पण जिरे व हळदे फुल व काचा माळ्यांच्या हातचें अन्न खातात. हळदे माळी मुख्यत्वेंकरून नाशिक जिल्ह्यांत आढळतात. इतर माळी त्यांस हीन समजतात. ह्या चारी विभागांत परस्पर शरीरसंबंध होत नाहीं.

माळ्यांची अनौरस संतति आणि त्यांच्या पोटभेदांतील स्त्रीपुरुषांच्या संबंधापासून झालेलीं मुलें यांचा अंतर्भाव कडू माळ्यांत होतो. मराठा माळ्यांत पुष्कळ आडनांवें आहेत. एकाच आडनांवाच्या किंवा विशिष्ट आडनांवांच्या समुदायाच्या स्त्रीपुरुषांत शरीरसंबंध होत नाहीं. कांहीं ठिकाणीं देवक एक असलें म्हणजेही शरीरसंबंध होत नाहीं. त्यांच्यांत पुढील देवकें आढळतात. ( १ ) सूर्यफूल, ( २ ) वासनवेल, ( ३ ) सोन्या, ( ४ ) पांचपालवी, (५) मर्यादवेल, ( ६ ) पान कणिस, ( ७ ) साळुंकीचा पंख. आतेबहिणीशीं व मामेबहिणीशीं लग्न होतें. मावसबहिणीशीं होत नाहीं. सातारा आणि सोलापूर जिल्ह्यांत बहिणींच्या मुलींबरोबर लग्नें झाल्याचींही उदाहरणें आहेत. भावाभावांस बहिणीबहिणींशीं लग्न लावतां येतें. लग्नें लहानपणीं व वयांत आल्यावरही होतात. विधवाविवाह व सोडचिठ्ठी ह्यांस मोकळीक आहे. त्यांच्या धर्मसमजुती व चालीरीति मराठा कुणब्यांप्रमाणेंच आहेत.

गुजराथी माळ्यांच्या चालीरीति गुजराथी कुणब्यांप्रमाणें आहेत. उत्तर गुजराथेंतील कांहीं माळी जैन धर्माचे असून त्यांतील कांहीं अहमदाबादेंतील जैन देवळांत पुजारी आहेत.

कानडी माळ्यांस कामटी आणि कुंचगी वक्कल अशींही नांवें आहेत. त्यांची कुलदेवी चंद्रगुत्ती म्हैसूर संस्थानांत सोब्रा येथें आहे. त्यावरून ते तेथून आले असावे असें दिसतें. त्यांच्यांत आडनांवें अथवा कुळें नाहींत. विधवाविवाह रूढ आहे. त्यांचे धर्मविधि ब्राह्मण चालवितात. ते मांस खातात व दारू पितात.

**मांग**—हे दक्षिण महाराष्ट्र, कर्नाटक व दक्षिण गुजराथ येथें आढळतात. यांस कानडींत मादिग व गुजराथींत मांगेला असें म्हणतात. संस्कृतांत मातंग ह्या नांवाच्या जातीचें वर्णन आहे. तेच हे मांग होत. ते आपली उत्पत्ति जंब ऋषीपासून झाली आहे असें सांगतात. महारांप्रमाणें यांस अस्पृश्य गणण्यांत येतें. यावरून ते येथील मूळ रहिवाशांपैकीं असावे असें दिसतें.

दक्षिण महाराष्ट्र व कर्नाटक येथील मांग चामड्याचे दोर, चाबूक वगैरे जिन्नस करितात. तसेंच ते तागाचे दोर, शिंदीच्या केरसुण्या आणि बांबूच्या

टोपल्या, पडदे इत्यादि जिन्नस करितात. ते झाडूवाल्यांचें काम करितात, शेती करितात, मजुरी करितात व एका गांवांतून दुसऱ्या गांवास निरोप पोंचविण्यानेंही काम करितात. कांहीं वाजंत्री आहेत. गुजराथेंतील मांगेला टोपल्या व सुपें करितात.

मांग, मादिग आणि मांगेला ह्या तीन प्रांतिक स्वरूपाच्या स्वतंत्र जाती असून त्यांचा परस्पर अन्नव्यवहार व शरीरसंबंध होत नाहीं.

मांगांत चोवीस पोटभेद आहेत. ते असेः– ( १ ) अस्सल, गस्ती किंवा मराठा, ( २ ) बाले, ( ३ ) बुरूड, ( ४ ) चपळसंदे, ( ५ ) डबकर, ( ६ ) देसूर, ( ७ ) धकलवार, दकलवार, डक्कलगार किंवा वाजंत्री मांग, ( ८ ) ढोर, ( ९ ) घडशी, ( १० ) होलगे किंवा होलार, ( ११ ) जिनगर ( १२ ) जिराईत, ( १३ )*काकर, ( १४ ) कोकलवार, ( १५ ) मानभाव ( १६ ) मांग गारुडी किंवा म्हैसभाद्रे, ( १७ ) मोची, ( १८ ) नाडे, नुडार किंवा खोत्रा, ( १९ ) परीट, ( २० ) पेंड किंवा पेड, ( २१ ) शिवते शेवते, वलर किंवा पाथंतानस, ( २२ ) तेलंगी, ( २३ ) टोकरफोडे, (२४) झारे. यांपैकीं कित्येकांत अनौरस संततीपासून झालेला अकरमासे नांवाच, पोटभेद असतो. मांग गारुडी हें नांव ते पूर्वीं गारुड्याचा धंदा करीत म्हणून पडलेलें आहे. टोकरफोडे, नाडे, मोची, काकर आणि शिवते, हीं नांवेंहीं धंद्यांवरूनच पडलेलीं आहेत. होलगे किंवा होलार, ढोर, बुरूड, परीट, घडशी आणि जिनगर हीं नांवें, ह्या जातींतील जे लोक मांगांत घेण्यांत आले त्यांवरून पडलीं आहेत. मानभाव हे मातंगपट्ट किंवा मांगभाव ह्या पंथाचे अनुयायी असावे.

एकच आडनांव असलेल्या स्त्रीपुरुषांत शरीरसंबंध होत नाहीं. अशीं आडनांवें बरींच आहेत. मामेबहिणीबरोबर लग्न लावतां येतें. आतेबहिणीबरोबर किंवा मावसबहिणीबरोबर लावतां येत नाहीं. भावाभावांस बहिणीबहिणींशीं लग्न लावतां येतें. लग्नें लहानपणीं अथवा वयांत आल्यानंतरही करितात. बेळगांव जिल्ह्यांत मुलीचें लग्न वयांत येईपर्यंत न झाल्यास, मग तिला लग्न करूं देत नाहींत. ती जोगतीण होते व वेश्यावृत्तीनें राहते. मांगांचें देवक पांचपाल-

वीचें असतें. व मराठ्यांप्रमाणेंच त्याची स्थापना करण्यांत येते. विधवाविवाहास आणि सोडचिठ्ठीस मोकळीक आहे.

मांगांची आवडती देवी मरीआई. त्यांच्या कुलदेवता बहिरोबा, खंडोबा, म्हसोबा, अंबाबाई, बहिरी, जानाई, तकी, विठोबा व वामाई ह्या होत. त्यांना देवळांत जाऊं देत नाहींत. त्यांचे धर्मविधी ब्राह्मण चालवितात. कांहीं ठिकाणीं ते गोसावी, भाट किंवा त्यांच्याच जातीचे साधु चालवितात. मृतांस पुरण्यांत येतें. श्राद्ध करीत नाहींत.

मांग लोक मेलेलीं गुरें व डुकरें यांचें मांस खातात. ते दारू पितात.

मादिगांत तेरा पोटभेद आहेत: ( १ ) असादरू, ( २ ) चन्न होलिया, ( ३ ) डकलेरू, ( ४ ) डबके मादिग, ( ५ ) दळया, ( ६ ) ढोर, ( ७ ) मांग गड्डेरू, ( ८ ) मांग गडिगेर, ( ९ ) मिनी मादिग, ( १० ) मोचीगर किंवा मोची, ( ११ ) पेड किंवा फेड, ( १२ ) मांग राऊत, ( १३ ) सनादी किंवा वाजंत्री. ह्यांतील बहुतेक पोटभेद मराठा मांगांतही आढळतात. ह्यावरून मराठा मांग व कानडी मादिग मूळचे एकच असावे असें अनुमान होतें. मोची, फेड आणि सनादी यांचा परस्पर अन्नव्यवहार होतो, पण शरीरसंबंध होत नाहीं. बाकीच्यांचा परस्पर अन्नव्यवहार अथवा शरीरसंबंध होत नाहीं. मादिगांच्या चालीरीति व धर्मसमजुती मांगांप्रमाणेंच आहेत. मात्र ते डुकराचें मांस खात नाहींत.

गुजराथी मांग किंवा मांगेला ही सर्वांत हलकी जात समजली जाते. त्यांनीं धर्मविधींच्या बाबतींत इतर कनिष्ट जातींपेक्षां ब्राह्मणाचें जास्त अनुकरण केलेलें दिसतें. ते हनुमान आणि मरी माता यांस भजतात. ते धर्मविधि चालविण्याच्या कामीं ब्राह्मणांची योजना करीत नाहींत किंवा त्यांस मानही देत नाहींत. त्यांचे उपाध्ये भाट असतात. ते आपणास ब्राह्मण म्हणवितात. मृतांस पुरण्यांत येतें. मृतांचे चांदीचे टांक घरांत ठेवितात व दर सातव्या अथवा आठव्या दिवशीं त्यांच्यापुढें दिवा लावतात. मेलेले कुत्रे, मांजरें व गाढव यांस ते स्पर्श करीत नाहींत. इतर सर्व जनावरांचें मांस ते खातात. दक्षिण गुजराथेंतील इतर दलित जातींप्रमाणेंच ते पक्के दारूबाज आहेत.

**मांगेला**—यांस धिवर अथवा तांडेल असेंही म्हणतात. ते मुख्यत्वेंकरून ठाणें जिल्ह्यांत आढळतात. मांगेला हा शब्द माग म्हणजे मासे पकडण्याचें जाळें किंवा मांघेरी ह्या शब्दावरून निघाला असावा असें म्हणतात. ते मासे मारण्याचा धंदा करितात. तसेंच किनाऱ्यावर ते लहानसहान व्यापारही करितात. कांहीं मजुरी करूनही उदरनिर्वाह करितात.

एकच आडनांव असलेल्या स्त्रीपुरुषांत लग्नें होत नाहींत. मामेबहीण, आतेबहीण अथवा मावसबहीण यांच्याशीं लग्न लावतां येत नाहीं. भावाभावांस बहिणीबहिणींबरोवर लग्न लावतां येतें. मुलींचीं लग्नें आठ ते पंधरा वर्षांच्या दरम्यान करितात. मुलांचीं बीस ते पंचवीसच्या दरम्यान करितात. विधवा-विवाहास मोकळीक आहे. विधवेस आपल्या मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न करितां येतें. सोडचिठ्ठी देतां येत नाहीं.

मांगेला शिव व विष्णु ह्या दोन्हीं देवांस भजतात. तसेंच खंडोबा, बहिरोबा, चेडा, नरशा, गनगुंड इत्यादि गौण देवतांस भजतात. त्यांचे धर्मविधि यजुर्वेदी देशस्थ ब्राह्मण चालवितात. मृतांस जाळण्यांत येतें. ते श्राद्ध करितात.

ते मांस खातात व दारू पितात.

**मांगेला**—मांग जातीचें दुसरें नांव.

**मिरासी**—महार जातीचें दुसरें नांव.

**मीठ गावडा**—गावडा जातीचें दुसरें नांव.

**मकरी**—फक्त कानडा जिल्ह्यांत आढळतात. ह्यांस हेब्बे गौडा किंवा जुने गौडा असेंही म्हणतात. ह्यांच्यांत पुढें दिल्याप्रमाणें बळी आहेत:—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | कन्ने बळी | ... | ... | कन्ने = कुमारिका |
| २ | तोळण बळी | ... | ... | तोळा=लांडगा |
| ३ | शेंडी बळी | ... | ... | शेंडी = शिंदींचें झाड |
| ४ | कवदेही बळी | ... | ... | कवदेही=एका झाडाचें नांव |
| ५ | अने बळी | ... | ... | अने=हत्ती |
| ६ | शिरिन बळी | ... | ... | शिरिन=एक प्रकाचें झाड |
| ७ | शेट्टी बळी | ... | ... | शेटली किंवा शेट्टी = मासा |

| | | | |
|---|---|---|---|
| ८ | थावन बळी | ... ... | थाव=कांसव |
| ९ | हंडी बळी | ... ... | हंडी=डुकर |
| १० | हेब्बळी बळी | ... ... | हेब्बळी=एक प्रकारचें झाड |

शेंडी बळीचे लोक शिंदीच्या झाडाला स्पर्श करीत नाहींत. किंवा त्याच्या छायेंत जात नाहींत. शिरिन बळीचे लोकही शिरीनच्या बाबतींत तसेंच करितात. अने बळीचे लोक हस्तिदंताचे दागिने घालीत नाहींत. संततीस बापाच्याच बळीचें समजण्यांत येतें. वरील बळींपैकीं चौथा व शेवटचा हे दोन बळी मुकरी आणि मोगेर ह्या दोनच जातींत आढळतात. बाकीचे बळी कानडांतील सर्व द्रविड जातींत आढळतात.

एकाच बळीच्या स्त्रीपुरुषांत लग्नें होत नाहींत. मुलींचीं लग्नें वयांत येण्यापूर्वी अथवा वयांत आल्यानंतरही करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. सोडचिठ्ठी देतां येते. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रीस नवरा जिवंत असेपर्यंत दुसरें लग्न करतां येत नाहीं.

मुकरींचा मुख्य देव वीरभद्र. ह्याचें देऊळ कुमठें तालुक्यांत हेराडे येथें आहे. वीरभद्राच्या खालोखाल ते व्यंकटरमण व हनुमान यांस पूज्य मानतात. जटका, अम्मा, म्हस्ती आणि इतर स्थानिक देवतांसही ते भजतात. त्यांच्या-पैकीं जे लोक तिरुपतीच्या यात्रेस जातात त्यांस दास म्हणतात. दासांस फार सन्मानानें वागविण्यांत येतें. धर्मविधींच्या कामीं ते ब्राह्मणांची योजना करीत नाहींत. त्यांचे सर्व धर्मविधि जातीचे बुधवंत (प्रमुख) चालवितात. मृतांस पुरण्यांत येतें. तें सुतक तीन दिवस पाळतात. मृतांच्या तृप्त्यर्थ दर अमावास्येस गाईस कढीभात व खीर पाजतात.

मुकरी लोक शिंपल्यांचा चुना करितात व शेतांत मजुरी करितात. त्यांच्या-पैकीं बहुतेक लोक हविक ब्राह्मणांच्या बागांतून मुदतबंदीनें नोकरीवर राहिलेले असतात.

ते मांस खातात व दारू पितात.

**मुदलियार**—किंवा मुदली पुणें, बेळगांव, विजापूर आणि धारवाड येथें आढळतात. ते तामिळ प्रांतांतील वेल्लाळा नांवाच्या शेती करणाऱ्या जातीचे असून मद्रास इलाख्यांतून इकडे आलेले आहेत.

**मुरळी**—एखाद्या मनुष्यास मुलें होत नसलीं अथवा त्याचीं मुलें जगत नसलीं, म्हणजे तो मूल जगल्यास तुला अर्पण करीन, असा नवस खंडोबास करतो. अशा तऱ्हेनें खंडोबास अर्पण केलेल्या मुलींस मुरळ्या म्हणतात व मुलांस वाघे म्हणतात. कधीं कधीं विवाहित स्त्रियाही नवसानें, अथवा आपणास खंडोबाची स्त्री होण्याविषयीं स्वप्न पडलें आहे असें सांगून, आपणांस खंडोबास अर्पण करितात. खंडोबास मुलगे व मुली वाघे व मुरळ्या म्हणून वाहण्याची चाल मुख्यत्वेंकरून कुणब्यांत व त्यांच्याच दर्जाच्या इतर जातींत आढळते. महारांतही ही चाल प्रचलित आहे.

वाघे व मुरळ्या सर्व दक्षिण महाराष्ट्रभर आढळतात. मुरळ्यांचें लग्न खंडोबाबरोबर करितात. वाघे बहुधा आपल्या वडिलांच्या जातींतील मुलींशीं लग्न करितात. तथापि वाघ्यांच्या मुलांमुलींतही लग्न होण्यास हरकत नाहीं.

मुरळ्या वेश्यावृत्तीनें व भिक्षा मागून उदरनिर्वाह करितात. त्यांचा पोशाख कुणब्यांच्या बायकांप्रमाणेंच असतो; पण त्या कपाळास हळद माखतात व गळ्यांत कवड्यांच्या माळा घालतात. कांहीं मुरळ्या जेजुरीस कायमच्या राहतात. बाकीच्या वाघ्यांबरोबर सर्व दक्षिण महाराष्ट्रांत गाणीं गात भिक्षा मागत गांवोगांव भटकत असतात.

वाघ्यांस खंडोबाचे चेले समजतात. मराठे आणि खालच्या जातीचे लोक त्यांस नमस्कार करितात. त्यांस दर तिसऱ्या वर्षीं जेजुरीस जावें लागतें.

वाघ्यांच्या चालीरीति व धार्मिक समजुती मराठा कुणब्यांप्रमाणें आहेत.

**मुसलमान जाती**—इस्लामी धर्मांत जातिभेदास थारा नाहीं. तथापि हिंदूंच्या जातिसंस्थेचा मुसलमानांवरही परिणाम होऊन त्यांच्यांतही अनेक जाती निर्माण झाल्या आहेत. त्यांचे तीन भाग पाडतां येतील. ते असे:—

(१) परदेशांतून आलेले मुसलमान व त्यांचे वंशज.

(२) इतर मुसलमानांबरोबर शरीरसंबंध करणारे बाटून मुसलमान झालेले हिंदु.

(३) फक्त आपल्याच जातींत लग्न करणारे बाटून मुसलमान झालेले हिंदु.

पहिल्या विभागांत शेख, सय्यद, मोंगल व पठाण यांचा समावेश होतो. दुसऱ्या विभागांत अतार, बरुतगार, वेडर, भिस्ती, दलाल, दर्झी, गोणीवाले, हकीम, कागझी, कलयगार, कष्शगर, महावत, मणियार, नाईकवारी, नालबंद, पटवेगार, रफूगार, रंग्रेझी, सारबान, सैकलगार, इत्यादिकांचा समावेश होतो. तिसऱ्यांत मेमन, खोजा, बोहरी, कसाब, पिंजारा, अतार, बागबान इत्यादि जातींचा समावेश होतो.

वरील विभागांतील दुसऱ्या व तिसऱ्या विभागांतील बऱ्याच जातींत हिंदु चालीरीतींचे अवशेष सांपडतात. त्यांतील कित्येक हिंदूचे कांहीं सण पाळतात, हिंदु देवतांस भजतात व गोमांस खात नाहींत.

मुसलमानांत आढळणाऱ्या मुख्य जातींचीं नांवें येणेंप्रमाणें—

(१) अतार, (२) अबदाली, (३) कठियारा, (४) कफशगार, (५) करालिया, (६) कलैगार (७) कसबाती, (८) कसाब, (९) काकर, (१०) कागझी (११) काझी, (१२) कामलिया, (१३) कालंदर, (१४) खतिब, (१५) खोखार, (१६) खोजा, (१७) गामेटी, (१८) गोरखोडिया, (१९) घेरमेहदी, (२०) चाटला, (२१) चुडीवाला, (२२) चुंदडीगिरा, (२३) छाटला, (२४) छारा, (२५) जमाती (२६) ताई, (२७) तांबट, (२८) तांबोळी, (२९) दलाल, (३०) दर्वेशी, (३१) दारूवाला, (३२) दाल्दी, (३३) दुधवाला, (३४) धवड, (३५) धुळधोया, (३६) नगार्ची, (३७) नवायत, (३८) नक्षबंद, (३९) नाईकवारी, (४०) नागोरी, (४१) नालबंद, (४२) पटवेगार, (४३) पठाण, (४४) पांजणीगार, (४५) पिरजादा, (४६) पिंजारा, (४७) बरुटंगे, (४८) बरुतगार, (४९) बागवान, (५०) बेनवा, (५१) बेलिम, (५२) बोजगार, (५३) बोहरी, (५४) भटियारा, (५५) मकवाणा, (५६) मणियार, (५७) महावत, (५८) मापारा, (५९) मालिक, (६०) मिरधा, (६१) मीर, (६२) मुसासुहाग, (६३) मोगल, (६४) मोमिन, (६५) मोले-

सलाम, (६६) रफाई, (६७) रसुलशाही, (६८) राठोड, (६९) लकरद्दारा, (७०) वरक (७१) वाघेला, (७२) सय्यद, (७३) सलतानकर, (७४) सारबान, (७५) सिद्दी, (७६) सिपाही, (७७) सुतार, (७८) सोळंकी, (७९) शिकलगार, (८०) शेख, (८१) शेखदा, (८२) हकीम, (८३) हुसेनी ब्राह्मण.

वरील मुसलमान जातींपैकीं कांहीं जातींचें वर्णन पुढें थोडक्यांत दिलें आहे.

**अबदाली**—गुजराथेंत सर्वत्र थोडथोडे आढळतात. ते डफ आणि फड वाजवीत असल्यामुळें त्यांस डफाली किंवा फडाली असेंही म्हणतात. ते डंका वाजवीत धार्मिक गाणीं गात देवाच्या नांवानें भिक्षा मागतात. त्यांचा मुख्य धंदा म्हणजे जादुगार लोक जादू करीत असतांना त्यांस जरूर असलेलीं गाणी म्हणणें हा होय. ते फारसे धार्मिक नाहींत, तसेंच त्यांच्यांत ज्ञातिसंघटनाहीं नाहीं. शहरांतील व खेड्यांतील प्रत्येक मुसलमानाच्या घरांतून त्यांना एक ठराविक कर मिळत असतो.

**कफशगार**—पुणें शहर व लष्कर व सोलापूर येथें थोडथोडे आढळतात. मुसलमानी अमलांत काबूलहून आलेल्या लोकांचे ते वंशज आहेत असें म्हणतात. विवाहित मुसलमान स्त्रिया जे पिवळे अगर लाल सकलातीचे जोडे घालतात, ते करण्याचा धंदा ते करितात. ते आपसांत अगर इतर मुसलमानांशींही लग्नें करितात. ते हनफी पंथाचे सुनी असून काजीची आज्ञा पाळतात.

**करालिया**—किंवा कुंभार अहमदाबाद शहरांत आढळतात. त्यांची उत्पत्ति हिंदु कुंभारांपासून झालेली आहे. ते सुनी आहेत, पण धर्माकडे फारसें लक्ष देत नाहींत ते आपसांत अथवा कठियारांशीं लग्नें करितात. त्यांची व कठियारांची मिळून एक जमात असून, तिचा प्रमुख त्यांच्या तंट्यांचा निवाडा करितो. अहमदाबादेस त्यांची एक वाडी आहे. तेथें आंब्यांच्या मोसमांत त्यांचीं ज्ञातिभोजनें होतात. ह्या भोजनास जर कोणी न आला तर त्यास दंड द्यावा लागतो.

**कलईगार**—सर्वत्र थोडथोडे आढळतात. ते आपणांस शेख म्हणवितात. ते आपापसांत अगर इतर मुसलमानांशींही लग्नें करितात. त्यांची एक सुसंघटित जमात असून, तिचा प्रमुख लोकांनीं निवडून दिलेला

असतो. त्यास चौधरी म्हणतात. ते हनफी पंथाचे सुनी आहेत. ते तांब्या-पितळेच्या भांड्यांस कल्हई करितात.

**कंसबती**— उत्तर गुजराथेंत पुष्कळ ठिकाणीं आढळतात. त्यांतील कांहीं बलुच अथवा पठाण शिपायांचें आणि कांहीं बाटलेल्या रजपुतांचे वंशज आहेत. ते मोठमोठ्या इनाम जमिनींचे मालक असून कर्जेदलाल आहेत. ते सुनी आहेत. क्वचित् प्रसंगीं ते रजपूत आणि कोळी स्त्रियांबरोबर लग्नें करितात. ह्या लग्नांत वधूचे आप्त कधीं कधीं ब्राह्मणांसही बोलावितात. धर्मविधि मात्र सर्वस्वीं मुसलमान पद्धतीनेंच होतो. ते आपल्या मुली मात्र मुसलमानांशिवाय इतरांस देत नाहींत.

**कसाब**—इलाख्यांत बहुतेक सर्व ठिकाणीं आढळतात. त्यांस कसाई खाटिक किंवा सुलतानी असेंही म्हणतात. ह्यांतील सुलतानी हें नांव कर्नाटकांतच प्रचारांत असून, टिपू सुलतानानें त्यांस बाटविल्यावरून तें त्यांस पडलें, असें म्हणतात.

कसाबांत गाव कसाब अथवा गाई कसाब म्हणजे गाई कापणारे, व बकर कसाब अथवा लाड कसाब म्हणजे मेंढे बकरे कापणारें असे दोन पोटभेद आहेत. त्यांचा परस्परांशीं रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. बकर कसाब गाव कसाबांस हलके समजतात. दोन्ही पोटभेदांतील लोक आपापल्या पोटभेदांतच लग्नें करितात. त्यांच्या सुसंघटित जमाती असून त्यांचा मुख्य त्यांनींच निवडलेला असतो. त्यास चौधरी म्हणतात. ते हनफी पंथाचे सुनी आहेत. बकर कसाबांची हिंदुधर्माकडे तीव्र प्रवृत्ति असून,ते गोमांस खात नाहींत. ते हिंदु देवतांस भजतात, त्यांस नवस करितात, व हिंदु सणही पाळतात, असें म्हणतात.

**काकर**—मुख्यत्वेंकरून बेळगांव, धारवाड आणि विजापूर जिल्ह्यांत आढळतात. ते अहमदशहा अबदालीबरोबर आलेल्या अफगाणांच्या काकरझाई वंशाचे वंशज आहेत असें मानण्यांत येतें. ते आपल्याच जातींत लग्नें करितात. त्यांचा समाज सुसंघटित असून त्यांच्या मुख्यास जमादार म्हणतात. ते हनफी पंथाचे सुनी आहेत. काकर पुरुष नोकरी आणि मोतद्दारी करितात, आणि बायका कोंबडीं, अंडीं आणि लांकडाचे भारे विकतात.

**कागझी**—मुख्यत्वेंकरून उत्तर गुजराथेंत व दक्षिण महाराष्ट्रांतील कांहीं भागांत आढळतात. ज्या कागदाबद्दल अहमदाबादची फार दिवसांपासून प्रसिद्धि आहे तो देशी कागद तयार करून विकण्याचा धंदा ते करतात. ते स्वजातींतच लग्नें करितात. ते सुनी असून नंदुरबादचा शहा घरिफ नवाझ आणि अहमदाबादचे चिस्ती यांचे अनुयायी आहेत.

**कामळिया**--गुजराथेंत कांहीं ठिकाणीं आढळतात. ते, बहुचराजीच्या ज्या कनोज ब्राह्मण पुजाऱ्यांस अल्लाउद्दीनानें ( इ. स. १२९७ ) बाटविलें त्यांचे वंशज आहेत बाटविल्यानंतर त्यांच्या मुख्यास ' कमाल ' म्हणजे ' पूर्ण ' अशी पदवी देण्यांत आली, त्यावरून त्यांस कामळिया हें नांव पडलें आहे. जेव्हां ते बहुचराजीस जातात तेव्हां तिच्या नांवानें भिक्षा मागतात. ते सुंता करीत नाहींत. मृतांच्या छातीवर डाग देऊन ते त्यांस पुरतात. ह्याशिवाय त्यांचे सर्व विधि हिंदु पद्धतीनेंच होतात.

**कालंदर**—गुजराथेंत सर्वत्र आढळतात. ते भिक्षा मागत गांवोगांव भटकत असतात. ते सुनी असून सर्व शरीरावरील केंस वस्तऱ्यानें काढून टाकतात. दीक्षा देतांना भिंवयांचे केंस काढण्याच्या विधास फारच महत्त्व दिलें जातें.

**खोखार**—उत्तर गुजराथेंत आणि काठेवाडांत थोडथोडे आढळतात. ते खोखार कुळांतील बाटविलेले रजपूत आहेत. ऐन अकबरींत, पंजाबांतील पिंड दादन खान येथील एक महत्त्वाची जात असा त्यांच्या संबंधानें उल्लेख केलेला आहे. आपण अफगाण वंशाचे असून आपल्या नांवाचा एक खेल ( वंश ) अजूनही आहे असें ते सांगतात. शक्यतोंवर ते आपसांतच लग्नें करितात; परंतु बाबी, लोहाणी आणि इतर पठाण यांजबरोबर लग्न करण्यास त्यांची हरकत नसते. त्यांच्यांतील कांहीं लोक पट्टण येथें जमीनदार असून कांहीं लष्करांत नोकरी करितात. कांहीं शेती व मजुरी करितात.

**खोजा**—ह्यांची मुख्य वस्ती गुजराथ, मुंबई व सिंधमध्यें असून, ते कलकत्ता, पंजाब, काश्मीर वगैरे ठिकाणींही पसरलेले आहेत. काबूल, अरब-

स्थान, झांझीबार इत्यादि ठिकाणींही त्यांच्या वसाहती आहेत. खोजा हा शब्द फारशी 'ख्वाजा' म्हणजे सद्गृहस्थ ह्या शब्दावरून निघाला आहे.

खोजा हे इस्माइली पंथांचे शिया आहेत. त्यांच्यांतील बहुतेक लोक मूळचे लोहाणा असून बाराव्या शतकाच्या अखेरीस नूर सतागूर नांवाच्या साधूकडून त्यांनीं मुसलमानी धर्माची दीक्षा घेतली. त्यांच्या पंथांत हिंदूंच्या त्रिमूर्तींचा आणि अवतारांचाही समावेश करण्यांत आला आहे. पुष्कळ हिंदूही ह्या पंथाचे अनुयायी आहेत. त्यांचा धर्मगुरु आगाखान असून त्यास प्रत्येक खोजास आपल्या उत्पन्नांतून कांहीं हिस्सा द्यावा लागतो.

खोजांत सात पोटभेद आहेत. ते असे:-(१) अतलाई खुरासानी, (२) बदकशानी आणि काबुली, (३) गुजर-गुप्ती, (४) खेडवाया मोमना, (५) मोची मोमना, (६) मुलतानी, (७) सोनी-लोहार.

खोजा हे नामांकित व्यापारी असून, शिवाय त्यांच्यांत विख्यात वकील, डॉक्टर व इंजीनिअरही निपजलेले आहेत.

**गारुडी**-इलाख्यांत सर्वत्र थोडथोडे आढळतात.ते मूळचे कोल्हाटी होते असें कित्येक म्हणतात. त्यांच्या पूर्वजांस मीर समसुदीन अथवा मिरन शम्ना यानें बाटविलें असें म्हणतात. मिरन शम्ना चौदाव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास मरण पावला. त्याचें थडगें मिरज येथें असून दर वर्षी तेथें यात्रा भरते. गारुडी स्वज्ञातींतच लग्नें करितात. त्यांची स्वतंत्र जमात असून तिचा मुख्य त्यांनींच निवडलेला असतो. ते सुंता करण्यापलीकडे कोणताच मुसलमानी आचार पाळीत नाहींत. ते काजीची योजना फक्त लग्न रजिस्टर करण्याच्याच कामीं करितात.

**गोरखोदिया**—किंवा थडगीं खणणारे, गुजराथेंत सर्वत्र थोडथोडे आढळतात. ते अर्धवट बाटलेले हिंदु व अर्धवट परदेशी आहेत. ते स्वज्ञातींतच लग्नें करितात. ते सुनी पंथाचे अनुयायी आहेत. त्यांचा दर्जा अगदीं हलक- समजण्यांत येतो.

**घेरमेहदी**—म्हणजे पुढें होणारा इमाम अथवा मेहदी यावर विश्वास न ठेवणारे. हे गुजराथेंतील बहुतेक भागांत, मुंबईस व दक्षिण महाराष्ट्रांत आढळतात. घेरमेहदी हें नांव त्यांस अपमानकारक वाटतें, म्हणून ते आपणास

मेहदवी म्हणवितात. त्यांच्या वसाहतींस दैरा म्हणतात. त्यांचे मुख्य दैरे पालनपूर, अहमदाबाद आणि दक्षिण हैद्राबाद येथें, इतर मुसलमानांच्या वस्तीपासून निराळे आहेत. पालनपूर येथील मेहदवी आपणास सय्यद आणि पीरजादा असेंही म्हणवितात.

बेरमेहदींत बाटून मुसलमान झालेल्या हिंदूचा आणि परदेशी मुसलमानांचाही समावेश होतो. ते महंमद मेहदीचे अनुयायीं आहेत. महंमद मेहदीचा जन्म, महंमद पैगंबराचा नातू हुसेन याच्या वंशांत, काशीजवळ जानपूर येथें इ. स. १४४३ त झाला. आपल्या चाळिसाव्या वर्षीं महंमद आपणास साधू (वली) म्हणवून घेऊं लागला. जानपूर येथें व पुढें मक्केसही त्याला पुष्कळ अनुयायी मिळाले. मक्केंतून हिंदुस्थानांत परत आल्यावर इ. स. १४९७ त अहमदाबाद येथें, आणि इ. स. १४९९ त पट्टण येथें, तो उघड रीतीनें 'पुढें होणारा मेहदी तो आपणच आहें' असें म्हणूं लागला. त्यानें पुष्कळ प्रवास केला व इ. स. १५०४ ह्या वर्षीं खुरासानमधील करा नांवाच्या शहरांत तो मृत्यु पावला. त्याच्या मृत्यूनंतर त्याचे शिष्य चोहींकडे पसरले. त्यांपैकीं कांहीं सय्यद खोडीमारबरोबर गुजराथेंत आले. गुजराथेंतील त्याच्या अनुयायांस कांहीं काळपर्यंत कोणी उपद्रव दिला नाहीं; परंतु नंतर त्यांचा पुष्कळ छळ झाला आणि त्यांच्या पुढाऱ्यास ठार मारण्यांत आलें. अवरंगजेबाच्या कारकीर्दींत तर त्यांचा बहुतेक नायनाटच करण्यांत आला.

मेहदवींस आपलीं मतें प्रतिपादन करण्यास जरी मुभा आहे, तरी ते आपण कर्मठ मुसलमान आहों असें दर्शविण्याबद्दल फार काळजी घेतात. त्यांचा वली महंमद हाच शेवटचा इमाम होता, असें त्यांचें म्हणणें आहे. ते स्वज्ञातींतच विवाह करितात. गुजराथेंत त्यांचे कित्येक दैरे (संघ) असून त्यासंबंधींचे नियम त्यांनींच केलेले आहेत. अहमदनगर येथें त्यांची एक स्वतंत्र जमात असून, तिच्या मुख्यास मुर्शिद किंवा गुरु म्हणतात. तो लग्नें रजिस्टर करतो आणि जातिनियम मोडणारांस शिक्षा करतो. ते पोलिस शिपाई आणि खासगी नोकर असून, कांहीं शेतीही करितात.

**चाटला**—ही एक गांवोगांव भटकणारी जात असून ती उत्तर गुजराथेंत आढळते. तिची उत्पत्ति कशी झाली त्याबद्दलची माहिती उपलब्ध नाहीं. ते रानांतून लांकडें आणून विकतात आणि हेल करितात. ते केवळ नांवाचेच मुसलमान असून त्यांना आपल्या धर्माबद्दल कांहींच माहिती नाहीं. मनुष्य मेला म्हणजे पीर होतो, अशी त्यांची समजूत आहे. ते मृतांस उभे पुरतात. दर वर्षीं मृतदिनीं थडग्याजवळ जातीच्या लोकांस जेवण देतात. ते मेलेल्या जनावरांचेंही मांस खातात.

**चुडावाला**—किंवा बांगडया करणारे, गुजराथेंत सर्वत्र आढळतात. ते कांचेच्या, लाखेच्या आणि जस्ताच्या बांगडया करून विकतात. ते सुनी पंथाचे असून इतर मुसलमानांबरोबर लग्नें करितात.

**चुंदडीगिरा**—गुजराथेंत सर्वत्र आढळतात. आपण अरब वंशाचे असून सिंधमधून गुजराथेंत आलों असें ते सांगतात. परंतु त्यांच्यांतील बहुतेक मूळचे हिंदु असावे असें दिसतें. ते स्वज्ञातींतच लग्नें करितात. ते सुनी पंथाचे अनुयायी आहेत. ते रेशमाचे गोंडे करून विकतात. सुरतेंतील चुंदडीगिरा कापड रंगविण्याचेंही काम करितात. कांहीं पोलिसांत नोकरी करितात.

**छारा**—किंवा घागरिया गुजराथेंत सर्वत्र थोडथोडे आढळतात. पावसाळ्यांत ते एके ठिकाणीं जमतात व लग्नें व इतर विधि करून आपापसांतील तंटयांचा निवाडा करितात. पावसाळा संपला म्हणजे ते टोळ्यांटोळ्यांनीं भिक्षा मागत आणि चोऱ्या करीत गांवोगांव भटकत राहतात. ते नांवाचेच मुसलमान आहेत. त्यांची एक जमात असून तिच्या मुख्यास नाईक म्हणतात.

**जमाती**—हे शेख असून कोंकणी मुसलमानांची मुख्य शाखा आहे. त्यांचीं पुष्कळ कुटुंबें आपणांस खान असेंही म्हणवितात. ते मुख्यत्वेंकरून कुलाबा आणि रत्नागिरी जिल्ह्यांत आढळतात. ते उर्दू, फारसी आणि आरबी शब्दांनीं मिश्रित अशी कोंकणी मराठी भाषा बोलतात. ते आपल्या नांवापुढें खोत, काझी, चौगुले इत्यादि धंद्यांचीं निदर्शक अथवा तमरोळकर, तुंगेकर इत्यादि गांवांवरून पडलेलीं आडनांवें लावितात. त्यांच्या स्त्रिया आपल्या नांवापुढें बिबी हें पद जोडतात. ते स्वज्ञातींतच विवाह करितात. ते शाफी पंथाचे

सुनी आहेत. त्यांच्यापैकीं कित्येक जमीनदार असून, कित्येक तांदूळ, लांकूड आणि मीठ यांचा व्यापार करितात. कांहीं नावाडी आहेत. त्यांच्यांतील गरीब लोक शेती आणि शेतमजुरी करितात.

**ताई**—गुजराथेंत सर्वत्र आढळतात. महमद पैगंबराच्या जन्माच्या सुमारास आपल्या दातृत्वानें अरबस्थानांत प्रसिद्धीस आलेल्या ताई येथील हातीमचे आपण वंशज आहों, असें ते सांगतात. ते स्वज्ञातींतच लग्नें करितात. त्यांची स्वतंत्र जमातही आहे. ते कापसाचे दोर व पागोटीं विणून उपजीविका करितात. ते सुनी पंथाचे अनुयायी आहेत.

**दर्वेशी**—अस्वलांचे आणि वाघांचे तमाशे दाखवीत गांवोगांव भटकत असतात. ते स्वज्ञातींत अथवा इतर धार्मिक भिक्षेकऱ्यांशीं लग्नें करितात. त्यांची स्वतंत्र जमात असून तिच्या मुख्यास सगिरो असें म्हणतात. ते हनफी पंथाचे मुसलमान आहेत.

**दाल्दी**—मुख्यत्वेंकरून रत्नागिरी तालुक्यांत आणि जंजिरा संस्थानांत आढळतात. समुद्राच्या पलीकडून गलबतांतून आलेल्या मुसलमानांचे आपण वंशज आहों असें ते सांगतात. त्यांच्यापैकीं कांहीं बाटलेले कोळी असावे व कांहीं परदेशांतून आलेल्या मुसलमानांचे वंशज असावे असें दिसतें. त्यांच्या रीतिभाती जमातींप्रमाणेंच आहेत. ते आपसांत अथवा गरीब कोंकणी मुसलमानांबरोबर लग्नें करितात. ते शाफी पंथाचे सुनी आहेत. कांहीं दाल्दी नावाडी आहेत, कांहीं शेती करितात आणि कांहीं जाळीं आणि सर्व प्रकारचे दोरखंड करितात. रत्नागिरी जिल्ह्यांतील बहुतेक दाल्दी मासे मारण्याचा धंदा करितात.

**दूधवाला**—गुजराथेंत सर्वत्र आढळतात. त्यांची मुख्य वस्ती अहमदाबाद आणि बडोदें येथें आहे. त्यांस गाडित, सावलिया आणि गवळी असेंही म्हणतात. ते मुख्यत्वेंकरून गवळी आणि सावालिया जातींतून बाटून मुसलमान झालेले आहेत असें म्हणतात. ते स्वज्ञातींतच लग्नें करितात. त्यांची स्वतंत्र जमात आहे. ते दूध विकतात व गाड्या हांकतात. ते सुनी पंथाचे अनुयायी आहेत.

**घवड**—मुख्यत्वेंकरून सातारा जिल्ह्यांत महाबळेश्वराजवळील डोंगरांत आढळतात. ते मूळचे स्थानिक कोळी असून अवरंगजेबानें त्यांस बाटवून मुसलमान केलें असें म्हणतात. ते स्वज्ञातींतच लग्नें करितात. त्यांची स्वतंत्र जमात असून तिच्या मुख्यास पाटील म्हणतात. ते पूर्वी डोंगरांतील लोहमिश्रित माती गाळून लोखंड करीत व त्यांचे निरनिराळे जिन्नस करून विकीत. हल्लीं हा त्यांचा धंदा बसला आहे, तरी अजूनही ते लोखंडाचे खिळे, चिमटे आणि तवे करून विकतात. ते गवत कापून आणि मध गोळा करूनही विकतात. ते आपणास हनफी सुनी म्हणतात. तथापि सुंता करणें आणि काजीकडून लग्न रजिस्टर करून घेणें ह्याशिवाय ते कोणताच मुसलमानी रिवाज पाळीत नाहींत. ते हिंदु सण पाळतात, गोमांस वर्ज्य करितात आणि हिंदु देवतांस भजतात.

**धूळधोया**—गुजराथेंत सर्वत्र आढळतात. ते मूळ खत्री जातीचे हिंदु होते असें म्हणतात. ते सोनारांकडून राख विकत घेऊन ती धुऊन त्यांतून निघणारे सोन्याचांदीचे कण गोळा करून विकतात. ते स्वज्ञातींतच लग्नें करितात. त्यांची स्वतंत्र जमात आहे. ते सुनी पंथाचे अनुयायी आहेत.

**नगार्ची**—अथवा नकार्ची म्हणजे ढोल वाजविणारे. महाराष्ट्रांत व कर्नाटकांत कांहीं ठिकाणीं आढळतात. ते स्वज्ञातींतच लग्नें करितात. त्यांची स्वतंत्र जमात असून तिच्या मुख्यास चौधरी म्हणतात. लग्नकार्यांत व इतर उत्सवप्रसंगीं हिंदु व मुसलमान ढोल वाजविण्याच्या कामीं त्यांची योजना करितात. कांहीं शेती करितात. ते हनफी पंथाचे सुनी मुसलमान आहेत; तथापि त्यांची हिंदुधर्माकडे तीव्र प्रवृत्ति असून, ते हिंदु सण पाळतात, गोमांस वर्ज्य करितात व हिंदु देवतांस भजतात.

**नवायत**—फक्त कानडा जिल्ह्यांतच आढळतात. त्यांना सौदागर असेंही म्हणतात. इसवी सनाच्या सातव्या व आठव्या शतकांत हजाज बिन यूसफ ह्याच्या जुलमास कंटाळून कांहीं इराणी मुसलमान व्यापारी मलबार व कानडा जिल्ह्याच्या किनाऱ्यावर येऊन स्थायिक झाले. नवायत हे त्यांचे वंशज होत असें म्हणतात. ते स्वज्ञातींतच लग्नें करितात. ते हनफी पंथाचे सुनी आहेत. ते कापड विकण्याचा धंदा करितात. कांहीं शेती करितात.

**नक्षबंद**—हे धार्मिक भिकारी असून गुजराथेंत सर्वत्र थोडथोडे आढळतात. ते खाजा बहाउद्दीन नक्षबंद नांवाच्या साधूचे अनुयायी आहेत. ते हातांत एक पितळेचा जळता दिवा घेऊन आपल्या साधूच्या स्तुतिपर गाणीं गात भिक्षा मागत फिरत असतात. मुलांना ते फार आवडत असल्यामुळें तीं त्यांस पैसे देतात, व ते आपल्या दिव्यांतील तेल त्यांच्या कपाळास लावतात. ते सुनी पंथाचे अनुयायी आहेत.

**नाईकवारी**—दक्षिण महाराष्ट्रांत सर्वत्र आढळतात. ते मूळचे मराठा कुणबी असून हैदर (नाईक) अल्लीनें त्यांस बाटविलें, व त्यामुळें त्यांस नाईकवारी हें नांव पडलें असें सांगतात. श्रीरंगपट्टण पडल्यानंतर ते पेशव्यांच्या पदरीं नोकरीस राहिले, आणि त्यांच्यापैकीं बरेच लोक नाशिक जिल्ह्यांत स्थायिक झाले. हल्लीं ते लष्करांत आणि पोलिसांत नोकरीस राहतात, व कांहीं शेती करितात. ते सुनी पंथाचे अनुयायी आहेत. त्यांच्यापैकीं शहरापासून जे दूर राहतात ते बरेच हिंदु रीतरिवाज पाळतात. ते लग्न चालविण्याच्या कामीं मुल्लाची आणि ब्राह्मणाचीही योजना करितात. त्यांच्यांतील थोडेसे लोक वहबी पंथाचे अनुयायी आहेत.

**नालबंद**—इलाख्यांत सर्वत्र आढळतात. ते मूळ हिंदु असून अवरंगजेबानें त्यांस बाटवून मुसलमान केलें असें म्हणतात. ते आपणास शेख म्हणवितात. ते घोड्यांस व बैलांस नाल मारण्याचा धंदा करितात. ते स्वज्ञातींत अथवा इतर मुसलमानांबरोबरही लग्नें करितात. ते हनफी पंथाचे सुनी आहेत.

**पठाण**—इलाख्यांत सर्वत्र आढळतात. ते मूळचे अफगाण असून, इकडे येऊन स्थायिक झाल्यानंतर त्यांनीं इतर मुसलमानांशींही शरीरसंबंध केले आहेत. ते प्रथम मुसलमान राजांच्या सैन्यांत नोकरी धरण्यासाठीं म्हणून आले, पण पुढें येथेंच स्थायिक होऊन राहिले. त्यांच्यांतील पुरुष आपल्या नांवापुढें 'खान' हा शब्द लावतात, व बायका 'खातून', 'खातू' किंवा 'बिबी' हा शब्द लावतात. ते स्वज्ञातींत अथवा इतर मुसलमानांबरोबरही लग्नें करितात. ते सुनी पंथाचे अनुयायी आहेत. ते घोड्यांचा व्यापार करितात, लष्करांत आणि पोलिसांत नोकरी धरितात आणि व्याजबट्टयाचाही धंदा करितात.

**पांजणीगार**—गुजराथेंत सर्वत्र आढळतात. ते कापसाच्या सुतास खळ देण्याचा धंदा करितात. त्यांच्यांत हिर पांजणीगार म्हणून एक पोटभेद आहे, त्यांतील लोक रेशमी सुतास खळ देतात. ह्या दोन्ही पोटभेदांत परस्परांत लग्नें होतात. इतर मुसलमान जातींशीं ते शरीरसंबंध करीत नाहींत. ते सुनी पंथाचे अनुयायी आहेत.

**पिंजारा**—इलाख्यांत सर्वत्र आढळतात. गुजराथेंत त्यांस ताई आणि नडफ असेंही म्हणतात. ते मूळचे हिंदु असून अवरंगजेबानें त्यांस बाटवून मुसलमान केलें असें म्हणतात. कांहीं ठिकाणीं त्यांतील पुरुष आपल्या नांवापुढें शेख, सय्यद अथवा पठाण हा शब्द जोडतात. ते हनफी पंथाचे मुसलमान आहेत; तथापि ते गोमांस वर्ज्य करितात, हिंदु देवांस नवस करितात व हिंदु सण पाळतात. ते स्वज्ञातींतच लग्नें करितात. ते कांपूस पिंजून त्याच्या गाद्या, उशा व रजया भरण्याचा धंदा करितात.

**बरुतगार**—हे आपणास अवरंगजेबानें बाटवून मुसलमान केलें असें म्हणतात. ते स्वज्ञातींत अथवा इतर मुसलमानांबरोबरही लग्नें करितात. ते हनफी पंथाचे सुनी आहेत. ते आतषबाजीचें काम करितात.

**बागवान**— किंवा बागवान दक्षिण महाराष्ट्रांत आणि कर्नाटकांत सर्वत्र थोडथोडे आढळतात. अवरंगजेबाच्या कारकीर्दींत ज्या कुणब्यांस व माळ्यांस बाटविण्यांत आलें त्यांचे ते वंशज आहेत. अजूनही कुणब्यानें मुसलमानी धर्माचा स्वीकार केला तर त्यास बागवानच म्हणतात. ते स्वज्ञातींतच लग्नें करितात. त्यांची स्वतंत्र जमात असून तिच्या मुख्यास चौधरी म्हणतात. ते हनफी पंथाचे सुनी आहेत, तरी त्यांची हिंदुधर्माकडे तीव्र प्रवृत्ति असून, ते गोमांस वर्ज्य करितात, हिंदु देवांस नवस करितात आणि हिंदु सण पाळतात. ते भाजीपाला आणि फळफळावळ विकण्याचा धंदा करितात.

**बेनवा**—किंवा अलिफशाही गुजराथेंत सर्वत्र थोडथोडे आढळतात. हा एक भिक्षेकऱ्यांचा पंथ असून, ते पांच पांच, दहा दहा जणांच्या टोळ्या करून देवाच्या नांवानें भिक्षा मागत हिंडतात. प्रत्येक शहरांत त्यांचा एक प्रमुख असतो. त्यास भंडारी म्हणतात. प्रत्येक मनुष्य आपली सर्व कमाई त्याजकडे

नेऊन देतो. त्यापैकीं कांहीं खर्चासाठीं त्यांस परत देऊन, बाकीची रक्कम तो त्यांचा गुरु म्हणजे मुर्शिद याजकडे पाठवितो. अलीकडे बेनवांची संख्या कमी होत चालली आहे.

**बोजगार**—हे मूळचे भोई असून ते बेळगांव आणि सोलापूर जिल्ह्यांत थोडथोडे आढळतात. ते स्वज्ञातींतच विवाह करितात. ते दारू विकणें, मासे मारणें व पालख्या वाहण्याचा धंदा करितात. कांहीं मजुरी करितात.

**बोहोरा**—ह्यांची वस्ती सुरत आणि भडोच जिल्ह्यांत व मुंबई शहरांत पुष्कळ असून, ते इलाख्यांतील सर्व भागांत थोडथोडे आढळतात. हिंदुस्थानांतील सर्व मुख्य व्यापारी पेठांतही त्यांची वस्ती आहे. त्यांचें मूलस्थान सुरत असून तेथें त्यांच्यांतील प्रमुख पोटभेदाचा (दाउदी बोहोरांचा) धर्मगुरु राहतो.

बोहोरा हें नांव मारवाड, राजपुताना आणि संयुक्तप्रांत येथें अजूनही आढळणाऱ्या हिंदु बोहोरांवरून पडलें आहे, अशी सर्वसाधारण समजूत आहे. परंतु गुजराथेंत हिंदु बोहोरांचा कोठें मागमूसही नसल्यामुळें बोहोरा हें नांव गुजराथी 'वोहोरा' म्हणजे व्यापार करणें ह्या शब्दावरून पडलें असावें हें म्हणणें अधिक सयुक्तिक दिसतें. कारण, प्रथम इस्लामी धर्माचा स्वीकार करणाऱ्या बोहोऱ्यांचा धंदा व्यापार करणें हाच होता. तथापि गुजराथेंत मुसलमानी अंमल असतांना, अथवा हल्लींही, हा शब्द केवळ इस्माइली पंथाच्या बोहोरी व्यापाऱ्यांसच लाविला जात असे अथवा जातो असें नाहीं. व्यापारी बोहोऱ्यांपेक्षां खेड्यांत राहून शेती करणाऱ्या सुनी बोहोऱ्यांचीच संख्या मोठी आहे व त्यांची सांपत्तिक स्थितीही चांगली आहे. गुजराथेंत शिया पंथाचा प्रसार धर्मप्रचारकांच्या शिकवणीनें आणि सुनी पंथाचा प्रसार राज्यकर्त्यांच्या सामर्थ्यामुळें झाला ह्याचें हे बोहोऱ्यांतील दोन भेद हें उत्कृष्ट निदर्शक आहे. पहिल्या शिया धर्मप्रचारकांस अन्हिलवाड्याच्या हिंदु राजांनीं प्रेमानें वागविल्यामुळें ते मुख्यत्वेंकरून मोठमोठ्या व्यापारी पेठांत स्थायिक होऊन त्यांनीं व्यापाऱ्यांसच आपल्या धर्माची दीक्षा दिली. परंतु राजकीय दृष्ट्या, मुसलमान सुभेदारांस खेड्यांतील दणकट लोकांसच बाटविणें जास्त इष्ट होतें. गुजराथें-

तील लोकांत लढवय्ये आणि विनलढवय्ये असे दोन मोठे भेद असल्यामुळें, शहरांत आणि खेड्यांत राहणाऱ्या ह्या अत्यंत परस्परविरुद्ध अशा बोहोऱ्यांच्या दोन भेदांस 'बोहोरी' हें एकच नांव लावलें गेलें असावें असें दिसतें. रजपूत, कोळी इत्यादि लढवय्या जातींतील जे लोक बाटविले गेले त्यांस मुसलमान सुभेदारांनीं मोलेसलाम, मलिक, सिपाही इत्यादि नांवें दिलीं. व्यापारी वर्गांतून जे लोक बाटले त्यांस बोहोरी हें नांव देण्यांत आलें आणि हेंच नांव ब्राह्मण, कुणबी, कारागीर इत्यादि विनलढवय्या जातींतील लोकांसही लावण्यांत आलें.

सर्व बोहोरी इस्माइली पंथाच्या शिया धर्मप्रचारकांकडून इसवी सनाच्या अकराव्या शतकांत बाटविले गेले आहेत असें आढळतें. त्यांच्यांतील कित्येक इजिप्शियन–अरब व यमन-अरब पूर्वजांपासून आपली उत्पत्ति झाली आहे असें सांगतात. दुसर आपले पूर्वज हिंदु होते हें कबूल करितात.

गुजराथेंत बोहोरा लोकांचा उदय कसा झाला ह्याबद्दल पुढील हकीगत सर्वमान्य गणली गेली आहे.

मुस्ताली इस्माइली पंथाच्या धर्मगुरूनें यमनमधील हरासमधून अबदुल्ला नांवाच्या एका दाईस ( धर्मप्रचारकास ) हिंदुस्थानांत पाठविलें. तो इ. स. १०६७ च्या सुमारास खंबायत येथें येऊन पोहोंचला. अबदुल्ला हा फार विद्वान् असून तो लोकांचे रीतिरिवाज समजून घेण्यासाठीं खंबायत येथें कांहीं वर्षे राहिला. त्याच्या धर्मप्रचाराच्या कामांत त्यास जें यश मिळालें त्यासंबंधीं दोन गोष्टी सांगण्यांत येतात. एक अशी कीं, त्यानें एका शेतकऱ्याची कोरडी विहीर पाण्यानें भरून त्याचें हृदय काबीज केलें. खंबायत येथील एका देवळांत अधांतरीं लोंबकळत ठेवलेला एक हत्ती जमीनदोस्त करून त्यानें कांहीं पुजाऱ्यांचें मन वळविलें, अशी दुसरी गोष्ट आहे. नंतर अबदुल्ला त्या वेळची गुजराथची राजधानी जी अन्हिलवाडा किंवा पाटण येथें गेला. असें सांगतात कीं, त्या वेळचा तेथील राजा सिद्धराज जयसिंग ( इ. स. १०९४–११४३ ) ह्यास त्याला पहाण्याची फार उत्कंठा लागल्यामुळें, त्यानें कांहीं हत्यारबंद शिपाई त्यास आणण्यासाठीं पाठविले. अबदुल्लासभोंवतीं अग्निज्वालांचें वेष्टन आहे असें त्यांस दिसल्यामुळें ते परत

आले. नंतर राजा स्वतः तेथें गेला. तेव्हां अबदुल्लाच्या सांगण्यावरून अग्नीनें बाजूस होऊन त्यास वाट करून दिली. हें पाहून राजा आश्चर्यचकित झाला व त्याच्या धर्माचें श्रेष्ठत्व सिद्ध करण्यासाठीं त्यानें त्यास आणखी एक चमत्कार करून दाखविण्यास सांगितलें. तेव्हां अबदुल्लानें एका मूर्तीच्या मुखांतून अरबांचा धर्मच खरा आहे असें वदविलें. तें ऐकून ह्या नव्या धर्माबद्दल राजासुद्धां सर्व हिंदूंच्या मनांत फारच आदर उत्पन्न झाला. तेथपासून दोन शतकेंपर्यंत ( इ. स. ११३०–१३८० ) इस्माइली पंथाचा प्रसार गुजराथेंत एकसारखा होत गेला. परंतु मुजफरशहाची सत्ता स्थापन झाल्यापासून ( इ. स. १३९०–१४४३ ) सुनी पंथाला उत्तेजन देण्यांत आलें, आणि बोहोरा आणि इतर शिया पंथांची दडपशाही सुरू झाली. तेव्हांपासून पुढें बोहोऱ्यांचा अनेक वेळां छळ करण्यांत आला, तो एकोणिसाव्या शतकांत ब्रिटिशांची सत्ता स्थापन होईपर्यंत कमी झाला नाहीं. इ. स. १५३९ पर्यंत बोहोऱ्यांचा मुख्य धर्मगुरु यमन येथें रहात असे. त्या सालीं त्यानें आपलें स्थान गुजराथेंत सुरत येथें नेऊन कायम केलें.

बोहोऱ्यांत ( १ ) शिया अथवा व्यापार करणारे बोहोरी आणि ( २ ) सुनी अथवा शेती करणारे बोहोरी, असे दोन मुख्य पोटभेद आहेत. शिया बोहोऱ्यांत आणखी पांच पोटभेद आहेत. ते असेः—( १ ) अलिया, ( २ ) दाउदी–बोहोऱ्यांतील बहुजनसमाज याच पोटभेदांतील आहे, ( ३ ) जाफरी, ( ४ ) नागोशी आणि ( ५ ) सुलैमानी.

**भटयारा**—किंवा स्वयंपाकी इलाख्यांत सर्वत्र थोडथोडे आढळतात. अवरंगजेबानें त्यांस बाटवून मुसलमान केलें असें म्हणतात. ते स्वज्ञातींतच लग्नें करितात. ते हनफी पंथाचे सुनी आहेत.

**भिस्ती**—सर्व गुजराथभर व दक्षिण महाराष्ट्र व कर्नाटक प्रांतांतील मोठमोठ्या शहरांत आढळतात. त्यांस पखाली हें दुसरें नांव असून गुजराथेंत त्यांना मष्की असेंही म्हणतात. ते मूळचे भोई होते असें म्हणतात. सुरतेंत त्यांची स्वतंत्र जात नाहीं, पण इतर ठिकाणीं त्यांची जात स्वतंत्र असून, ते स्वज्ञातींतच लग्नें करितात. ठिकठिकाणीं त्यांच्या स्वतंत्र जमातीह

आहेत. ते हनफी पंथाचे सुनी आहेत. दक्षिण महाराष्ट्रांतील भिस्त्यांची हिंदु धर्माकडे तीव्र प्रवृत्ति असून ते हिंदु देवतांस भजतात, हिंदु सण पाळतात व गोमांस वर्ज्य करितात. ते मुसलमान, ख्रिश्चन आणि पार्सी लोकांच्या घरीं पखालींतून पाणी भरतात.

**मकवाना**—हे कोळ्यांतून व मकवाना रजपुतांतून बाटून मुसलमान झालेले आहेत. ते उत्तर गुजराथेंत पुष्कळ ठिकाणीं आढळतात. ते आपल्या मुलांचीं लग्नें मुसलमानांच्या, मकवाना रजपुतांच्या किंवा कोळ्यांच्या मुलींशीं करितात, आणि मुलींचीं लग्नें मकवाना, बाबी अथवा ढोलका पठाण जातींच्या मुसलमानांशीं करितात. लग्नाच्या वेळीं ते ब्राह्मण पुरोहिताची योजना करितात. ते सुनी पंथाचे अनुयायी आहेत. त्यांच्यांतील कित्येक लोक लहान लहान जमिनींचे मालक आहेत, कांहीं शेती करितात, व कांहीं पोलिसांत नोकरी धरितात.

**मणियार**—म्हणजे कांचेच्या बांगड्या करणारे. इलाख्यांत सर्वत्र आढळतात. त्यांस शिशगार असेंही म्हणतात. त्यांस औरंगजेबानें बाटविलें होतें असें म्हणतात. त्यांच्यांत मणियार आणि बंगरहरा असे दोन पोटभेद आहेत, त्यांचीं परस्परांत लग्नें होतात. ते इतर मुसलमानांशींही लग्नें करितात. त्यांचा पिढीजात धंदा कांचेच्या, लाखेच्या आणि हस्तिदंताच्या बांगड्या करणें हा होय. परदेशी बांगड्या येऊं लागल्यापासून त्यांचा हा धंदा बसला असून, ते आतां लहानसहान दुकानदारी करून व लोखंडी सामान आणि इतर जिन्नस विकून उदरनिर्वाह करितात. ते हनफी पंथाचे सुनी आहेत.

**मलिक**—गुजराथेंत सर्वत्र आढळतात. हे मूळचे रजपूत होते. त्यांच्यांतील कांहीं जमिनीचे मालक आणि शेतकरी असून कांहीं पोलिसांत नोकरी करितात. ते सुनी संप्रदायाचे आहेत. त्यांचे रीतरिवाज इतर बाटलेल्या रजपुतांप्रमाणेंच आहेत.

**महावत**—किंवा महात मूळचे रजपूत होते असें म्हणतात. ते आपणास शेख म्हणवितात. महातांची जरूरी आतां बहुतेक नाहींशी झाल्यामुळें ते पोलिसांत व इतर ठिकाणीं नोकरी करितात. ते इतर मुसलमानांबरोबर

लग्नें करितात. ते हनफी पंथाचे सुनी आहेत. तथापि त्यांची हिंदुधर्माकडे प्रवृत्ति असून त्यांच्यांतील पुष्कळ पुरुष व बहुतेक सर्व स्त्रिया गोमांस वर्ज्य करितात.

**मीर**—म्हणजे उमराव. ह्यांस मिराशी म्हणजे जमीनदार, लंघा म्हणजे गाणारे, ढोली म्हणजे ढोल वाजविणारे आणि डोम असेंही म्हणतात. ते गुजराथेंत सर्वत्र आढळतात. ते मूळचे भाट व उत्तर हिंदुस्थानांतील डोम होते असें म्हणतात. कांहीं मिरांच्या स्वतःच्या जमिनी असून त्यांच्यांतील पुष्कळ लोक पावसाळ्यांत शेती करितात. इतर दिवसांत ते एकएकटे, किंवा दोघे दोघे, तिघे तिघे मिळून पडघम, तंबुरा, सतार आणि सारंगी वाजवीत, गाणीं गात, आणि हिंदु-मुसलमानी गोष्टी सांगत, भिक्षा मागत गांवोगांव फिरत राहतात. त्यांच्या बायका घरींच राहतात. त्यांस डोम्नी किंवा लंघी म्हणतात. त्या मुसलमानांच्या लग्नकार्यांत बायकांसमोर गाणें बजावणें करितात. मीर अहमदाबादचा सय्यद दादा मियान याचे कट्टे अनुयायी आहेत. त्यांची सुसंघटित जमात असून तिचा मुख्य हा सय्यद असतो.

**मुसा सुहाग**—हा एक धार्मिक भिक्षेकऱ्यांचा पंथ असून, ते गुजराथेंत सर्वत्र थोडथोडे आढळतात. हा पंथ पंधराव्या शतकाच्या अखेरीस मुसा नांवाच्या साधूनें स्थापिला. असें सांगतात कीं, पत्नीचें जसें पतीवर प्रेम असतें, तसें आपलें ईश्वरावर प्रेम आहे, ही भावना दर्शित करण्याकरितां तो स्त्रियांचा पेहराव करीत असे. क्रियेकांचें असेंही म्हणणें आहे कीं, लोकांकडून जेव्हां त्याला फारच उपसर्ग पोहोचूं लागला, तेव्हां त्यांना चुकविण्याकरितां तो स्त्रीवेशानें फिरूं लागला. त्याच्या स्मरणार्थ ह्या पंथांतील भिकारी, जरी दाढी मिशा काढीत नाहींत, तरी विवाहित स्त्रियांप्रमाणें पोषाख करितात, व दागिनेही घालतात. ते एकएकटे, लोकांना आशीर्वाद देत भिक्षा मागत फिरत असतात. त्यांना फारसे अनुयायी मिळत नसल्यामुळें त्यांचा पंथ लुप्तप्राय होत आला आहे.

**मेमन**—ह्यांची मुख्य वस्ती गुजराथेंत असून ते इलाख्यांतील सर्व मोठ्या शहरांत थोडथोडे आढळतात. इलाख्याबाहेर कलकत्ता, मद्रास, मलबारचा

किनारा, ब्रह्मदेश, सयाम, सिंगापूर, जावा, अरबस्थान, मोझांबिक, झांझीबार इत्यादि ठिकाणीं ते व्यापाराकरितां वसाहती करून राहिलेले आहेत. ह्यांस मौमिन असेंही म्हणतात. त्यांच्या उत्पत्तीची हकीगत पुढें दिल्याप्रमाणें आहे.

मौलाना अबदुल कादिर महीमुद्दीन नांवाचा एक विख्यात साधु बगदाद येथें इ. स. ११६५ त मरण पावला. मरतांना त्यानें आपला पुत्र ताजउद्दीन यास हिंदुस्थानांत जाऊन इस्लामी धर्माचा प्रसार करण्याची आज्ञा केली. पुढें इ. स. १४२१ त ताजउद्दीनच्या कुलांतील ५ांचवा पुरुष सय्यद युसफउद्दीन कादिरी ह्यास सिंधमध्यें जाऊन तेथील लोकांस इस्लामी धर्म समजावून देण्याविषयीं स्वप्नांत दृष्टांत झाला. त्यावरून सय्यद युसफउद्दीन सिंध प्रांतांत आला. त्या वेळीं सिंधची राजधानी नगरठठ्ठा असून, तेथें सामा वंशांतील मर्कबखान ही पदवी धारण केलेला एक पुरुष राज्य करीत होता. त्यानें सय्यद युसफउद्दीन याचा सन्मानानें आदरसत्कार केला. ह्या वेळीं मर्कबखानच्या दरबारांत लोहाण्यांचा प्रमुख माणेकजी ह्याचें फार वजन होतें. पुढें मर्कबखान युसफउद्दीनचा अनुयायी झाला, तेव्हां माणेकजीही आपले दोवे पुत्र आणि दुसरीं सातशें लोहाणा कुटुंबें यांसह त्याचा अनुयायी बनला. त्यांतील माणेकजीच्या रावजी नांवाच्या मुलाचें नांव बाटल्यानंतर अहमद असें ठेवण्यांत आलें आणि रावजीच्या सुंदरजी आणि हंसराज ह्या दोन मुलांचीं नांवें अनुक्रमें आदम आणि ताज महम्मद अशीं ठेवण्यांत आलीं, आणि ह्या बाटलेल्या लोहाणांच्या समाजास मोमिन म्हणजे श्रद्धाळु असें नांव देण्यांत आलें. नंतर युसफउद्दीननें आदम ह्यास त्यांचा वंशपरंपरागत मुख्य करून ठठ्ठाजवळ वरा येथें त्याची स्थापना केली, आणि आपल्या वंशजांस धर्मगुरु मानण्याचें त्यांच्यांकडून कबूल करून घेऊन तो इराक येथें निघून गेला. त्यानंतर पुढें मेमनांची वस्ती हळू हळू इतर ठिकाणीं पसरली.

मेमनांत पांच पोटभेद आहेत. ते असेः--

१ कच्छी म्हणजे सिंध आणि कच्छमधील मेमन.

२ हलाई म्हणजे काठेवाडांतील हालार प्रांतांतील मेमन.

३ ढोका म्हणजे अहमदाबाद जिल्ह्यांतील ढोलका येथील मेमन.

४ धोरजी भावनगरी म्हणजे भावनगरांतील मेमन.

५ वेरावडा म्हणजे काठेवाडांतील वेरावळ येथील मेमन.

वरील पोटभेदांपैकीं कच्छी आणि हलाई हे काठेवाडांतील कच्छिच्या आणि सिंधमधील लोहाणा ह्या जातींतून बाटलेले आहेत. ढोका, भावनगरी आणि वेरावळ ह्या हलाईपासून उत्पन्न झालेल्या शाखा आहेत.

मेमन हनफी पंथाचे सुनी आहेत. त्यांच्यांतील बरेच लोक जवळ पुरेसा पैसा जमला म्हणजे मक्केची यात्रा करून येतात. त्यांचा धर्मगुरु कच्छ मांडवीच्या पूर्वेस वीस मैलांवर मुंद्रा येथें राहतो.

मेमन मादक पदार्थांशिवाय इतर सर्व जिनसांचा व्यापार करितात.

**मोगल**—इलाख्यांत सर्वत्र आढळतात. त्यांच्यांत इराणी मोगल आणि हिंदी मोगल असे दोन पोटभेद आहेत. हिंदी मोंगलांस चौघड्डा मोगल असेंही म्हणतात.

इराणी मोगल मुख्यत्वेंकरून सुरतेंत व खंबायतांत आढळतात. ते इराणांतून हिंदुस्थानांत आश्रयार्थ आलेले राजकारणी लोक व व्यापारी यांचे वंशज आहेत. ते आपल्या नांवाच्या पूर्वी ' मिर्झा ' व शेवटीं ' बेग ' हे बहुमानवाचक शब्द जोडतात. जसें, ' मिर्झा महम्मद बेग.' त्यांच्या स्त्रिया आपल्या नांवापुढें ' खानम ' हा शब्द लावतात. जसें, 'हसैनी खानम.' ते बहुधा शिया पंथाचे अनुयायी असतात. ते बहुधा स्वज्ञातींतच लग्नें करितात. त्यांच्यांतील कांहीं लोक व्यापार करितात, व कांहीं सरकारी नोकरी करितात.

हिंदी मोगल, मोगल राज्यकर्त्यांचे वंशज असावे असें दिसतें. इराणी मोगलांप्रमाणेंच ते आपल्या नांवाच्या मागें व पुढें ' मिर्झा ' आणि ' बेग ' हे शब्द लावतात व त्यांच्या स्त्रिया आपल्या नांवापुढें ' खानम ' हा शब्द लावतात. ते हनफी पंथाचे सुनी आहेत. त्यांच्यांतील बहुतेक लोक सरकारी नोकरी करून पोट भरतात.

**मोमिन**—इलाख्यांत सर्वत्र आढळतात. त्यांच्यांत गुजराथी आणि दक्षिणी असे दोन पोटभेद आहेत. गुजराथी मोमिन इस्लामिया सय्यदाच्या वंशांतील निरनिराळ्या पुरुषांनीं बाटवून शिया मुसलमान केलेल्या लोकांचे वंशज आहेत.

दक्षिणी मोमिन बाटलेल्या कोष्टी अगर साळी जातींतील लोकांचे वंशज आहेत असें म्हणतात. गुजराथी मोमिन शिया पंथाचे अनुयायी आहेत. दक्षिणी मोमिन हनफी पंथाचे सुनी आहेत. गुजराथी मोमिनांत कांहीं हिंदु चालीरीति आढळतात, तर दक्षिणी मोमिनांतील कांहीं लोकांची हिंदुधर्माकडे प्रवृत्ति असून ते हिंदु सण पाळतात व हिंदु देवतांस नवस करितात.

मोमिन कापड विणण्याचा व रंगविण्याचा धंदा करितात.

**रफई**—गुजराथेंत सर्वत्र आढळतात. त्यांस मूंफेडा अथवा मूंचिरा म्हणजे तोंड फोडणारे असेंही म्हणतात. ते आपल्या उजव्या हातांत गुर्झ म्हणजे खिळे बसविलेला व टोंकास लहान लहान सांखळया असलेला शूळ घेऊन तो वाजवीत दारोदार भिक्षा मागतात. त्यांस कोणी भिक्षा न घातल्यास ते हा शूळ आपल्या गालावर अथवा डोळयावर मारतात, तरीही त्यांस इजा झालेली दिसत नाहीं. ते फार हेकट व त्रासदायक असतात. ते सुनी पंथाचे अनुयायी आहेत.

**रफूगार**—आपणास अवरंगजेबानें बाटविलें असें सांगतात. ते हनफी पंथाचे सुनी आहेत. ते कपडयांस रफू करून आणि नोकरी करून पोट भरतात.

**राठोड**—उत्तर गुजराथेंत थोडथोडे आढळतात. ते मूळ राठोड रजपूत होते. ते आपणांस सुनी पंथाचे जरी म्हणवितात तरी स्वामीनारायण पंथाकडे त्यांचा ओढा दिसतो. त्यांचे धार्मिक विधि बहुतांशीं हिंदु पद्धतीप्रमाणेंच होतात. जेव्हां नवरी हिंदु असते तेव्हां हिंदूंचे आणि मुसलमानांचे असे दोन्ही प्रकारें विधि करण्यांत येतात. मृत्यु झाला असतां बायका ऊर बडवून शोक करितात. ते हिंदु आणि मुसलमान रजपुतांशीं आणि कोळयांशीं लग्नें करितात. ह्या शिवाय त्यांची स्वतंत्र अशी जात नाहीं. त्यांच्यांतील कांहीं लोक जमीनदार आहेत, कांहीं शेती करितात व कांहीं नोकरी करितात.

**लकरहारा**—अथवा लांकडें विकणारे दक्षिण महाराष्ट्रांत सर्वत्र थोडथोडे आढळतात. ते जळाऊ आणि इमारतींचींही लांकडें विकतात. त्यांच्यांत शेख आणि सय्यद यांचें मिश्रण असून, अवरंगजेबाच्या कारकीर्दींत पुष्कळ हिंदु बाटून त्यांच्यांत सामील झाले असें म्हणतात. ते सुनी पंथाचे अनुयायी आहेत. त्यांची स्वतंत्र जमात असून त्यांच्यांतीलच एक जण तिचा मुख्य असतो.

**शिकलगार**—किंवा शिकलीगार इलाख्यांत सर्वत्र थोडथोडे आढळतात. ते मूळचे घिसाडी आणि लोहार असून अवरंगजेबाच्या कारकीर्दीत बाटले असें म्हणतात. ते स्वज्ञातींत अथवा मणियार, अतार आणि पटवेगार यांच्याशीं लग्नें करितात. ते हनफी पंथाचे सुनी आहेत. तथापि ते गोमांस खात नाहींत, हिंदु देवांस नवस करितात आणि हिंदु सण पाळतात. ते शस्त्रांस उजळा आणि धार देतात व वस्तरे, सुऱ्या, सुताराचीं आउतें वगैरे जिन्नस करितात.

**शेखदास**—किंवा शेख मुख्यत्वेंकरून अहमदाबाद आणि भडोच जिल्ह्यांत आढळतात. ते बाळा महम्मद शहा नांवाच्या एका पिराणा पिराचे भक्त आहेत. त्यांचे रीतरिवाज बहुतांशीं मतिया कणब्यांप्रमाणें आहेत. त्यांचें नांव, आणि ते मृतांस पुरतात, ह्या गोष्टी वगळल्या तर त्यांच्या रीतिभाती हिंदूंप्रमाणेंच आहेत. ते सुंता करीत नाहींत आणि मुसलमानांच्या हातचें अन्नही खात नाहींत. ते कपाळास गंध लावतात आणि त्यांच्यांतील पुष्कळ लोक स्वामीनारायण पंथाचे अनुयायी आहेत. लग्नें चालविण्यास एक मुसलमान व एक हिंदु असे दोन पुरोहित लागतात. मुसलमानी विधि एखादा फकीर करतो, आणि हिंदु विधि ब्राह्मण करतो.

**सय्यद**—इलाख्यांत सर्वत्र आढळतात. त्यांस पीरजादा आणि मशेक असेंही म्हणतात. ते महम्मद पैगंबराची मुलगी फतिमा आणि तिचा नवरा अली यांजपासून आपली उत्पत्ति झाली असून, मुसलमानी अमलांत तुर्कस्थान, अरबस्थान आणि मध्य आशिया येथून जे सय्यद हिंदुस्थानांत आले त्यांचे आपण वंशज आहों असें म्हणतात. आपल्या जातीचें उच्चत्व दर्शविण्यासाठीं सय्यद पुरुष ' सय्यद ' अथवा ' मीर ' ही पदवी आपल्या नांवामागें अथवा ' शहा ' ही पदवी आपल्या नांवापुढें जोडतात. तसेंच त्यांच्या स्त्रिया आपल्या नांवापुढें ' बेगम ' अथवा ' बिबी ' ही पदवी लावतात.

सय्यद होतां होईल तों स्वज्ञातींतच लग्नें करितात. परंतु त्यांच्यांतील पुष्कळ लोक शेख, मोगल व पठाण जातींतील मुलींशींही लग्नें करितात. क्वचित् प्रसंगीं इतर उच्च मुसलमान जातींच्या मुलींशींही लग्नें करण्यांत येतात.

सय्यद सुनी पंथाचे अनुयायी आहेत. परंतु उत्तर गुजराथेंत पुष्कळ लोक गुप्तरीत्या शिया पंथाप्रमाणें चालतात.

सय्यद पुष्कळ धंदे करितात. कित्येक जमीनदार आहेत, कित्येक धर्मगुरु आहेत, कित्येक लष्करांत आहेत आणि कित्येक पोलिसांत आहेत. त्यांच्यांत बुखारी वंशाचे कांहीं भिकारी आहेत. ते रमझान महिन्यांत दोनदोन, चार-चार जणांच्या टोळ्या करून भिक्षा मागत गांवोगांव भटकत फिरतात.

**सलतानगर**—अथवा सलतानकर दक्षिण महाराष्ट्रांत कांहीं ठिकाणीं थोडथोडे आढळतात. ते मूळचे चांभार आणि मोची असून अवरंगजेबाच्या कारकीर्दींत बाटले असें म्हणतात. ते स्वज्ञातींतच लग्नें करितात. त्यांची सुसंघटित जमात असून तिचा मुख्य त्यांनींच निवडलेला असतो. ते हनफी पंथाचे सुनी आहेत. तथापि त्यांची हिंदु धर्माकडे तीव्र प्रवृत्ति असून ते गोमांस खात नाहींत, हिंदु देवतांस नवस करितात आणि हिंदु सण पाळतात. ते खाटकाकडून बकऱ्यांचीं आणि मेंढयांचीं कातडीं विकत घेऊन कमावून चांभारांस व मोचांस विकतात. त्यांचा हा धंदा हल्लीं बहुतेक बसला आहे.

**सारवान**—किंवा उंटें हांकणारे अनेक जातींतून बाटलेले असून त्यांत रजपुतांचा भरणा विशेष आहे. उंटें हांकणारांची सध्यां फारशी जरूर नसल्या-मुळें ते दुसरे धंदे करून पोट भरतात. ते स्वज्ञातींत आणि इतर मुसलमानां-बरोबरही लग्नें करतात. ते हनफी पंथाचे सुनी आहेत. त्यांच्यांतील कांहीं लोक गोमांस खात नाहींत व हिंदु देवतांस भजतात.

**सिद्दी**—किंवा हवशी गुजराथ, जंजिरा संस्थान व कानडा जिल्हा येथें थोडथोडे आढळतात. त्यांच्यांत विलायती आणि मुवल्लद असे दोन पोटभेद आहेत. त्यांचीं परस्परांत लग्नें होतात. ते सुनी पंथाचे अनुयायी आहेत. ते मुख्यत्वेंकरून राजपिंपळा संस्थानांतील अकीकाच्या खाणींजवळील टेंकडीवर असलेल्या बाबा घोर नांवाच्या हबशी पिरास भजतात. ते मुख्यत्वेंकरून घरकामास नोकरीस राहून व भिक्षा मागून पोट भरतात. तथापि त्यांच्यांत कांहीं थोर ऐतिहासिक पुरुषही होऊन गेले आहेत, आणि जंजिऱ्याचा आणि सचीनचा नबाब सिद्दीच आहे.

**सिपाही**—गुजराथेंत सर्वत्र आढळतात. त्यांची उत्पत्ति परदेशांतून आलेले मुसलमान व रजपुतादि अनेक जातींतून बाटून झालेले मुसलमान यांजपासून झाली आहे. ते इतर मुसलमानांबरोबर लग्नें करितात. तथापि त्यांची स्वतंत्र जमात आहे. ते सुनी पंथाचे अनुयायी आहेत. ते शेती व शेतावर मजुरी करितात व पोलिसांत व लष्करांत नोकरी धरतात.

**मुस्टिगर**—खेत्री जातीचें दुसरें नांव.

**मे**—ही एक अगदीं लहान जात असून ती फक्त कच्छमध्यें सांपडते. ते धड हिंदूही नाहींत व मुसलमानही नाहींत. शिकार करून व पानांच्या हातऱ्या करून ते उदरनिर्वाह करितात. ते मुसलमानांच्या हातचें अन्न खातात, पण मुसलमान त्यांच्या हातचें अन्न खात नाहींत.

**मेघवाळ**—फक्त कच्छ संस्थानांत आढळतात. त्यांना गणेशिया, रिशिया, रिखिया आणि राखिया अशीं दुसरीं नांवें आहेत. त्यांना कधीं कधीं धेढ किंवा धेड असेंही संबोधिण्यांत येतें. मेघवाळ हें नांव ह्या जातीचा संस्थापक मेघऋषि ह्यावरून पडलें आहे असें सांगतात. ह्या जातीचा कुलदेव गणेश आहे म्हणून त्यांस गणेशिया म्हणतात. रिशिया आणि रिखिया हीं नांवें ऋषि ह्या शब्दावरून पडलेलीं आहेत. ते मेलेल्या जनावरांस ओढून नेतात म्हणून त्यांस धेढ किंवा धेड म्हणतात.

ह्या जातीस अस्पृश्य मानण्यांत येतें. त्यांची स्थिति महाराष्ट्रांतील महारांप्रमाणेंच अत्यंत हीन आहे.

त्यांच्यांत चार पोटभेद आहेत. ते असेः—(१) माहेश्री किंवा कच्छी मेघवाळ, (२) गोर्ज्रा मेघवाळ, (३) मारवाडा मेघवाळ, (४) चारणिया मेघवाळ. ह्या पोटभेदांत परस्पर अन्नव्यवहार होतो, पण शरीरसंबंध होत नाहींत.

माहेश्री मेघवाळ माहेश्री वाणियांप्रमाणें सिंधमधून कच्छमध्यें आले असावे असें दिसतें. मारवाडांतून आलेले ते मारवाडा मेघवाळ. गुजराथेंतून आलेले ते गोर्ज्रा. चारणिया मेघवाळ हे मारवाडा मेघवाळांतून निघालेली एक शाखा असावी. त्यांचा संबंध काछेला चारणांशीं जेव्हां जडला तेव्हां त्यांस चारणिया मेघवाळ हें नांव पडलें.

मेघवाळांत अनेक कुळें आहेत. त्यांत मातंग ह्या नांवाचें जें कूळ आहे तें सर्वांत श्रेष्ठ समजलें जातें. ह्याचें कारण ह्या कुळाचा संस्थापक जो मातंग तो त्यांचा धर्मगुरु होता. एकाच कुळांतील स्त्रीपुरुषांत शरीरसंबंध होत नाहीं. मेघवाळ आणि माहेश्री मेघवाळ ब्राह्मण यांचा परस्पर शरीरसंबंध होतो.

मुलांमुलींचीं लग्नें बहुधा बारा ते सोळा वर्षांच्या दरम्यान करितात. विधवा-विवाहास मोकळीक आहे. माहेश्री मेघवाळांत मृत पतीच्या धाकट्या भावाशीं विधवेनें लग्न केलेंच पाहिजे असा नियम नाहीं. इतर पोटभेदांत तसा नियम आहे. सोडचिठ्ठी देतां येते. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रीस विधवाविवाहाच्या विधीनें दुसरें लग्न करतां येतें.

मेघवाळांची सर्व देवांत गणपतीवर जास्त भक्ति आहे. जेथें जेथें मेघवा-ळांची वस्ती असते तेथें तेथें गणेश ओट्टो किंवा गणेशाचें देऊळ असतें. ते भगवती, यक्ष, शीतळा आणि क्षेत्रपाळ यांसही भजतात. ह्या देवतांच्या बहु-तेक देवळांत मेघवाळ किंवा त्यांचे ब्राह्मण हेच पुजारी असतात.

माहेश्री मेघवाळांचे उपाध्ये माहेश्री मेघवाळ ब्राह्मण असतात. तसेंच इतर पोटभेदांचे उपाध्येही त्या त्या नांवाचे मेघवाळ ब्राह्मणच असतात. माहेश्री मेघवाळ आणि त्यांचे उपाध्ये यांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होतो. इतर पोटभेदांचा त्यांच्या उपाध्यांशीं फक्त रोटीव्यवहारच होतो, बेटीव्यवहार होत नाहीं. मेघवाळ ब्राह्मणांत श्रीमाळी, दवे, सोमेश्वर, इत्यादि उच्च ब्राह्मणांतील आडनांवें आढळतात. ह्यावरून ते पूर्वी उच्च दर्जाचे ब्राह्मण असून, मेघवा-ळांचा पहिला धर्मगुरु जो मातंग त्यानें त्यांस बाटविलें असावें असें दिसतें. ह्या मेघवाळ ब्राह्मणांचा दर्जा मेघवाळांप्रमाणेंच अति नीच आहे.

मृतांस पुरण्यांत येतें. माहेश्री मेघवाळांत मृतांस कधीं कधीं जाळण्यांतही येतें; पण असें केलें म्हणजे जातीस बारा जेवणें द्यावीं लागतात. ते सुतक बारा दिवस ते दोन महिनेपर्यंत पाळतात. मृतांच्या शांत्यर्थ दिवाळीच्या दिवशीं कावळ्यांस अन्न घालण्यांत येतें.

मेलेल्या जनावरांचीं कातडीं काढणें व कमावणें, लांकूड तोडणें व वस्त्रें विणणें हे त्यांचे वंशपरंपरागत चालत आलेले धंदे आहेत. मेघवाळ ब्राह्मण

कातडीं काढण्याचा व कमावण्याचा धंदा करीत नाहींत. मारवाडा मेघवाळांपैकीं बहुतेक लोक विणण्याचेंच काम करितात.

कांहीं मेघवाळ महारांप्रमाणें बाटाडयाचेंही काम करितात. त्यांस भोमिया म्हणतात. प्रत्येक खेडयांत भोमियांचें एक तरी कुटुंब असतेंच. भोमियांस त्यांच्या कामगिरीबद्दल जमिनी तोडून दिलेल्या असतात.

मेघवाळ महारांप्रमाणेंच मेलेल्या गाई, म्हशी, वगैरेचें मांस खातात. ते दारू पितात. ते मुसलमानांच्या हातचें अन्न खातात.

**मेडर**—बुरूड जातीचें दुसरें नांव.

**मेतरिया**—भंगी जातीचें दुसरें नांव.

**मेत्री**—कोटेगर जातीचें दुसरें नांव.

**मेर**—मुख्यत्वेंकरून काठेवाडांत आढळतात. अरब लोकांनीं ज्या वेळीं सिंध प्रांत जिंकला त्या वेळीं तेथें म्हेड, मेर किंवा मांड नांवाची एक अत्यंत प्रबळ जात होती. तेच हे मेर असावे असें दिसतें. ते आपणास रजपूत म्हणवितात आणि रणधीरजी नांवाच्या जेठवा रजपुतापासून आपली उत्पत्ति झाल्याचें सांगतात. जेठवा रजपुतांशीं जरी त्यांचा फार प्राचीन काळापासून संबंध आहे तरी ते हें त्यांचें म्हणणें कबूल करीत नाहींत. त्यांचा धंदा पूर्वीं शिपाईगिरीचा असून ते राण्यास वेळेस तीन ते चार हजारांपर्यंत उत्तम लढवय्ये पुरवीत असत. आतां त्यांनीं हा धंदा सोडला आहे, पण त्यांना ह्या कामाकरितां तोडून दिलेल्या जमिनी त्यांच्याकडे अजूनही चालत आहेत, व त्या बाबतींत त्यांना विशेष हक्कही आहेत. त्यांच्यांत केशवाला, राजसुखा, गोहिल आणि अदिद्रा असे चार पोटभेद आहेत. त्यांचा परस्पर शरीरसंबंध होतो. त्यांच्यांत विधवाविवाह रूढ आहे. इतर बाबतींत त्यांच्या चालीरीति रजपुतांप्रमाणें आहेत.

**मेराई**—दर्जी जातीचें दुसरें नांव.

**मेला**—भंगी जातीचें दुसरें नांव.

**मैय्या**—महिया जातीचें दुसरें नांव.

**मैराळ**—मुख्यत्वेंकरून पुण्यांत आढळतात. ते खंडोबाच्या देवळांत पुजारी असून भिक्षा मागून उदरनिर्वाह करितात. त्यांच्या चालीरीति कुणब्यांप्रमाणें आहेत.

**मोगेर**—कानडा जिल्ह्यांतील कुमठा आणि होनावर तालुक्यांतच आढळतात. हे लोक पूर्वी मासे मारण्याचा धंदा करीत. परंतु हल्लीं त्यांच्या कुमठ्यांत स्थायिक झालेल्या शाखेनें हा धंदा सोडला असून, ते कापूस, तांदूळ, सुपारी इत्यादि जिनसांचा व्यापार करितात, व आपण दलाल जातीचे आहों असें सांगतात. ते ब्राह्मणांचें अनुकरण करूं लागले असून इतर मोगेरांशीं आपला कोणत्याच प्रकारचा संबंध नाहीं असें म्हणूं लागले आहेत. त्यांच्यांत अलियसंतान, मक्कलसंतान आणि रंडेसंतान असे तीन पोटभेद आहेत. ज्यांच्यांत वारसाहक्क स्त्रीवंशाकडून चालतो ते.अलीयसंतान आणि पुरुषवंशाकडून चालतो ते मक्कलसंतान. विवाहित विधवांच्या संततीस रंडेसंतान असें म्हणतात. त्यांच्यांत तेरा बळी आहेत. ते असे:—

| | |
|---|---|
| १ शेट्टी बळी ... ... | शेट्टी=मासा. |
| २ देव बळी ... ... | देव. |
| ३ होन्ने बळी ... ... | होन्ने=एक प्रकारचें झाड. |
| ४ धवन बळी ... ... | धव=कांसव. |
| ५ केंडीबळी ... ... | केंडी=एक प्रकारचें झाड. |
| ६ चेंडी बळी ... ... | चेंडी=एक प्रकारचें झाड. |
| ७ गंगाधर बळी | |
| ८ होले बळी | |
| ९ बलिन बळी ... ... | बली=एक प्रकारचा समुद्रांतील मासा. |
| १० अने बळी ... ... | अने=हत्ती. |
| ११ शिरिन बळी ... ... | शेर किंवा शेरकूल=एक प्रकारचें झाड. |
| १२ तोळण बळी ... ... | तोळ=लांडगा. |

१३ शेंडी बळी ... ... शेंडी = शिंदीचें झाड.

प्रत्येक बळीचे लोक, ज्या पदार्थावरून त्यांच्या बळीचें नांव पडलें आहे, त्या पदार्थास पूज्य मानतात व त्यास कोणत्याही प्रकारें इजा करीत नाहींत. बळी स्त्रीवंशाकडून गणला जातो. मुलींचीं लग्नें वयांत येण्यापूर्वी करितात. मुलांच्या वयास मर्यादा नसते. विधवाविवाहास मोकळीक आहे; पण विधवाविवाह फारसे रूढ नाहींत असें सांगतात. सोडचिठ्ठी देतां येत नाहीं.

मोगेर वैष्णवसांप्रदायी आहेत. त्यांचे उपाध्ये हविक ब्राह्मण असतात. ते मासे खातात व दारू पितात.

**मोघा**—रबारी जातीचें दुसरें नांव.

**मोची**—मुख्यत्वेंकरून गुजराथेंत शहरांतून व मोठमोठ्या खेड्यांतून आढळतात. ते असें सांगतात कीं, मूळचे ते रजपूत असून चांपानेरजवळ राहात असत. त्यांच्यापैकीं एकानें वाघाच्या कातड्याचे मोजे (मोजू) केल्यामुळें त्यास मोची हें नांव पडलें. त्यांच्यांत रजपूत आडनांवें आढळतात.

मोच्यांत प्रांतिक स्वरूपाचे तीन मुख्य पोटभेद आहेतः—अहमदाबादी, खंबाती आणि सुरती. ते करीत असलेल्या निरनिराळ्या धंद्यांमुळें त्यांच्यांत आणखी पोटभेद झालेले आहेत. त्यांपैकीं मुख्य पुढें दिल्याप्रमाणें आहेतः—

| | | |
|---|---|---|
| १ अंगिगरा | ... ... | मूर्तींचे दागिने करणारे. |
| २ बखतरगरा | ... ... | चिलखतें करणारे. |
| ३ चांदलागरा | ... ... | लाखेच्या बांगड्या करणारे. |
| ४ चितारा | ... ... | चित्रें काढणारे. |
| ५ ढालगरा | ... ... | ढाल करणारे. |
| ६ जिनगर | ... ... | खोगीर करणारे. |
| ७ सुनागरा | ... ... | जिल्हई करणारे. |
| ८ मोची | ... ... | जोडे करणारे. |
| ९ नेत्रगरा | ... ... | मूर्तींचे डोळे करणारे. |
| १० पाखरिया | ... ... | घोड्यांचा साज करणारे. |
| ११ पानागरा | ... ... | चांदीसोन्याचा वर्ख करणारे. |

१२. रसाणिया ... ... मुलामा देणारे.

पूर्वी या सर्व पोटभेदांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होत असे. परंतु गेल्या कांहीं वर्षांत चांदलागरा, चितारा आणि रसणिया यांच्या स्वतंत्र जाती बनल्या आहेत. ते स्वच्छतेच्या दृष्टीनें श्रेष्ठ प्रकारचे धंदे करूं लागल्यापासून त्यांचा दर्जा कडये, सुतार इत्यादि कारागीर जातींप्रमाणें वाढला असून त्यांची अस्पृश्यताही दिवसेंदिवस कमी होऊं लागली आहे.

एकच आडनांव असलेल्या स्त्रीपुरुषांत शरीरसंबंध होत नाहीं. लग्नें अगदीं लहानपणींच करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. विधवेस आपल्या मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न लावितां येतें. सोडचिठ्ठी देतां येते.

वर सांगितल्याप्रमाणें मोची अनेक प्रकारचे धंदे करितात. परंतु त्यांचा मुख्य धंदा जोडे करण्याचाच आहे.

मोची रामानंदी, परणामी, स्वामीनारायण आणि बिजपंथी संप्रदायाचे अनुयायी आहेत. धर्मविधि चालविण्याच्या कामीं ते ब्राह्मणांची योजना करितात. ह्या ब्राह्मणांस मोचीगोर म्हणतात. इतर ब्राह्मणांपेक्षां त्यांस हलकें समजण्यांत येतें. ते मृतांस जाळतात व त्यांच्या शांत्यर्थ श्राद्धें करितात.

मोची मांस खातात व दारू पितात. अलीकडे पुष्कळ मोच्यांनीं स्वामीनारायण पंथाचा स्वीकार केल्यामुळें मांस व दारू यांचा प्रचार कमी होत चालला आहे, आणि कांहीं ठिकाणीं तर अजीबात बंद झाला आहे.

एकंदरींत मोची लोकांचा सामाजिक दर्जा अजून अगदीं हलकाच आहे. ते जरी खाल्पा, धेड व इतर अस्पृश्य जातींस स्पर्श करीत नाहींत, तरी उच्च जातीचे लोक त्यांच्या स्पर्शाचा विटाळ मानतात.

**मोंडिकर**—गारुडी जातीचें दुसरें नांव.

**म्हेत्रे**—महार जातीचें दुसरें नांव.

**यकळार**—ह्यांची थोडीशी वस्ती बेळगांव आणि धारवाड जिल्ह्यांत आहे. ते मद्रास इलाख्यांतून आलेले असून शेतीचा धंदा करितात.

**यहुदी**—बेने इस्राएलांचें दुसरें नांव.

**यादव**—भाटिया जातीचें दुसरें नांव.

**रजपूत**—ह्या जातीची वस्ती मुख्यत्वेंकरून गुजराथेंत आहे. त्यांतही काठेवाडांत विशेष आहे. इलाख्यांतील इतर भागांतही ह्यांची वस्ती तुरळक तुरळक आहे.

रजपूत हे चातुर्वर्ण्यापैकीं क्षत्रिय वर्णाचे आहेत. तथापि त्यांच्यांतील बहुजनसमाजांत इतर जातींच्या रक्ताची बरीच भेंसळ झालेली आहे. बऱ्याच काळापासून भिल्ल व कोळी जमीनदार व राजे यांच्याशीं त्यांनीं शरीरसंबंध केलेला आहे, व अजूनही खालच्या जातींतील ज्या लोकांची सांपत्तिक स्थिति सुधारते ते लोक हलक्या दर्जाच्या रजपुतांशीं शरीरसंबंध करून त्यांच्यांत मिसळून जातात.

रजपूत हे क्षत्रिय असल्यामुळें त्यांचा वंशपरंपरागत धंदाही क्षात्रवृत्तीचाच आहे. गुजराथेंतील रजपुतांचा अजूनही अर्ध्या गुजराथेवर व जवळ जवळ एक तृतीयांश लोकसंख्येवर अंमल आहे. ह्यांशिवाय गराशिया व तालुकदार यांचा मोठा वर्ग आहे तो निराळाच. ह्यांच्याकडे बऱ्याच जमिनी असून त्यांस विशेष हक्क आहेत. हल्लीं लढवय्यांची पूर्वीसारखी गरज राहिली नसल्यामुळें बरेच रजपूत शेतीचाही धंदा करूं लागले आहेत.

रजपुतांत बरींच कुळें आहेत. एकाच कुळांतील स्त्रीपुरुषांत शरीरसंबंध होत नाहीं. गुजराथेंतील रजपुतांत १०३ कुळें आढळतात. त्यांतील मुख्य पुढें दिलीं आहेत:—( १ ) चावडा, ( २ ) चुडासमा, ( ३ ) दाइमा, ( ४ ) चोहाण, ( ५ ) गोरी, ( ६ ) गोहिल, ( ७ ) जाडेजा, ( ८ ) जेठवा, ( ९ ) झाला, ( १० ) परमार, ( ११ ) सोलंकी, ( १२ ) राठोड, ( १३ ) रेहवर, ( १४ ) सिसोदिया, ( १५ ) बावेल आणि ( १६ ) वाघेला.

मुलांमुलींचीं लग्नें बहुधा वयांत आल्यावर करितात. विधवाविवाहास प्रतिबंध आहे. रजपूत शेतकऱ्यांत विधवाविवाहास मोकळीक आहे, पण त्यांस अस्सल रजपूत समजण्यांत येत नाहीं. रजपूत विशेषेंकरून शिवास भजतात. प्रत्येक कुळाची कुळदेवी निरनिराळी असते. जसें आशापुरी, आद्या, खोडियाड, विंध्यावासिनी, मंदावरी, चामुंडा, इत्यादि. लग्नापूर्वी मुलांचें मौंजीबंधन करितात. त्यांचे उपाध्ये राजगोर ब्राह्मण असतात. ते मांस खातात व दारू पितात.

अस्सल रजपूत कोंबडीं खात नाहींत. स्वामीनारायण, वल्लभाचार्य आणि रामानुजपंथाचे रजपूत मांसही खात नाहींत व दारूही पीत नाहींत. कोळ्यांतील रानटी जाती, वाघेर आणि अस्पृश्य जाती यांशिवाय इतर जातींच्या हातचें अन्न ते खातात.

**रड्डी**—ही एक शेतीचा धंदा करणारी मोठी जात असून, ती म्हैसूर आणि मद्रास इलाखा येथून प्राचीन काळीं इकडे आली असावी असें दिसतें. ह्या जातीचे लोक मुख्यत्वेंकरून विजापूर, धारवाड व बेळगांव ह्या जिल्ह्यांत आढळतात. म्हैसूर संस्थानांत त्यांची मोठी वस्ती असून त्यांच्यांत आठ पोटभेद आहेत. त्यांपैकीं पाकनाक हा पोटभेद ह्या इलाख्यांतही सांपडतो. राष्ट्रकूट किंवा रट्ट वंशाशीं त्यांचा कांहीं तरी संबंध होता असें दिसतें. कित्येक विद्वानांच्या मतें तर रट्ट हे रड्डीच होते. ते स्वतः आपण मद्रास इलाख्यांतील व्यंकटगिरीहून आल्याचें सांगतात. अजूनही ते श्रीव्यंकटेशास विशेष भजतात. शेती करणें हा त्यांचा वंशपरंपरागत धंदा आहे. कांहीं धान्याचा व्यापार करितात व कांहीं सावकारी करितात.

रड्डींत सात पोटभेद आहेत. ते असेः—( १ ) नामद, ( २ ) चिटमिट, ( ३ ) ललगोंद, ( ४ ) निर्मळ, ( ५ ) पाकनाक, ( ६ ) पेंटपेंट, ( ७ ) विठाला. यांपैकीं नामद हे हिंदु असून बाकीचे लिंगायत आहेत. लिंगायत पोटभेदांतील लोक नामदांच्या मुलींस लिंगायत धर्माची दीक्षा देऊन त्यांच्याशीं लग्न करितात. नामद रड्डयांत छत्तीस वेडगू आहेत. एकाच वेडगूच्या स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. आतेबहिणीशीं व मामेबहिणीशीं लग्न करतां येतें. भावाभावांस बहिणीबहिणींशीं लग्न करितां येतें. मुलींचीं लग्नें त्या वयांत येण्यापूर्वी करितात. विधवाविवाहास व सोडचिठ्ठीस मोकळीक आहे.

नामद रड्डी वैष्णवपंथानुयायी आहेत. ब्राह्मणांतील सोळा संस्कारांचा अधिकार आपणास आहे असें ते म्हणतात आणि त्यांच्यांतील सुखवस्तु लोक त्यांपैकीं नऊ संस्कार पाळतात. ते विशेषेंकरून श्री व्यंकटेशास भजतात. यल्लम्मा, मारुती, यामव्वा, केरेव्वा, मल्लय्या इत्यादि गौण देवतांसही ते भजतात. त्यांचे उपाध्ये स्थानिक ब्राह्मण असतात. मृत विवाहित असेल तर

त्यास जाळतात, अविवाहित असेल तर पुरतात. रड्डी मद्यमांस सेवन करीत नाहींत. ब्राह्मण त्यांची शूद्रांत गणना करितात, तरी ते ब्राह्मणांच्या हातचें अन्न खात नाहींत.

**रबारी**—ह्या जातीस भोपा, मोघा, रायका, विशोतर आणि सिनाई अशींही नांवें आहेत. ह्यांतील शेवटचें नांव फक्त कच्छमध्येंच प्रचारांत आहे. रबारी हे गुरें व मेंढरांचे कळप पाळणारी एक जात असून प्राचीन काळीं ते बलुचिस्थानांत व नंतर मारवाड व सिंध ह्या प्रांतांत राहात असावे असें दिसतें. अजूनही ते हिंगलाज देवीस भजतात, व बलुचिस्थानांतील त्या देवीच्या पवित्र स्थानास यात्रेस जातात. त्यांच्या कुलदेवीचें मुख्य स्थान जोधपूर संस्थानांत शिकोत्रा येथें आहे. ते आपण रजपूत वंशाचे आहों असें म्हणतात व हें आपलें म्हणणें सिद्ध करण्याकरितां अनेक दंतकथा सांगतात. हल्लींही ते गुरें व मेंढरें पैदास्त करण्याचाच धंदा करितात.

रबाऱ्यांत सहा पोटभेद आहेतः--( १ ) सोरठिया, ( २ ) वधियारा, ( ३ ) अलीगिया, ( ४ ) विणविया, ( ५ ) गुजराथी आणि ( ६ ) होना. त्यांच्यांत अनेक कुळें असून त्यांतील प्रत्येकांत एकदोन पोटकुळें असतात. मामेबहिणीशीं लग्न लावितां येतें, पण आतेबहिणीशीं अथवा मावसबहिणीशीं लग्न लावतां येत नाहीं. भावाभावांस बहिणींबहिणींशीं लग्न लावितां येतें. मुलींचीं लग्नें नऊ ते सोळांच्या दरम्यान व मुलांचीं बारा ते विसाच्या दरम्यान करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे; पण सुरत जिल्ह्यांत विधवाविवाहावर जातीचा इतका जबरदस्त कर आहे कीं, विधवेला लग्न करणें बहुतेक अशक्यच होतें. विधवेस मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न करितां येतें. कच्छ व काठेवाड प्रांतांत मृत पतीच्या धाकट्या भावाचा विधवेवर पहिला हक्क असतो. त्याच्या अभावीं त्याच्याहून दूरच्या नातलगाचा असतो. सोडचिठ्ठी देतां येते.

रबारी मुख्यत्वेंकरून मातांस भजतात. ते पाबू, यक्ष, क्षेत्रपाल इत्यादि गौण देवतांसही भजतात. त्यांचे उपाध्ये औदिच, सोमपुरा आणि राजगोर ब्राह्मण असतात. मृतांस जाळण्यांत येतें.

बहुतेक रबारी मांस खातात व दारू पितात. काठेवाडांतील रबारी मुसलमानांच्या हातचें अन्न खातात. रबाऱ्यांच्या हातचें अन्न रजपुतांस चालतें.

**राऊळ**—रावळिया जातीचें दुसरें नांव.

**राखिया**—मेघवाळ जातीचें नांव.

**राचेवर**—हे भोरपी व नाडे भोरपी असून म्हैसूर संस्थानांतून आलेले आहेत. ते अहमदनगर, खानदेश व धारवाड जिल्ह्यांत थोडथोडे आढळतात.

**रामोशी**–मुख्यत्वेंकरून पुणें, सातारा व अहमदनगर जिल्ह्यांत आढळतात. रामोशी हा शब्द रामवंशी ह्या शब्दाचा अपभ्रंश आहे असें म्हणतात. तो रानवासी म्हणजे ‘ रानांत रहाणारा ’ ह्या शब्दापासून झाला आहे अशीही त्याची व्युत्पत्ति लावतात. रामोशी हे मुख्यतः गांवाच्या सीमेवर रहात असल्या-मुळें, ही दुसरी व्युत्पत्ति विशेष अन्वर्थक दिसते. त्यांना नाईक अथवा नाईक-लोक असेंही म्हणतात. त्यांच्यापैकीं जे मांस खात नाहींत त्यांना रामभक्त म्हणतात. बेरड ह्या नांवाखालीं मोडणाऱ्या ज्या कानडी अथवा तेलगू जाती आहेत, त्यांतील उत्तरेकडची शाखा रामोशी असावे असें दिसतें. पूर्वीं त्यांचा बेरडांशीं हल्लींपेक्षां जास्त निकट संबंध असावा. बेळगांव जिल्ह्यांतील रामोशी अजूनही आपण आणि बेरड एकाच जातीचे आहों असें सांगतात. त्यांचा आणि बेरडांचा अन्नव्यवहार होतो, पण शरीरसंबंध होत नाहीं. रामोशांत बेरड ह्या नांवाचा एक पोटभेद आहे. त्यांच्यांतील पुरुषांचीं नांवें कानडी असतात. त्यांच्या भाषेंत तेलगू शब्द सांपडतात. त्यांच्यांतील पुढाऱ्यास नाईक ही पदवी लावतात. तसेंच बेरडांप्रमाणें त्यांचा वंशपरंपरागत धंदा चोरी करण्याचा आहे, इत्यादि गोष्टींवरून ते आणि बेरड मूळचे एकच असावे ह्या म्हणण्यास बरीच बळकटी येते. ह्या जातींत कुणबी, मांग इत्यादि दुसऱ्या जातींच्या लोकांचीही भर पडली असावी असें दिसतें. ते पूर्वीं कुणबी स्त्रियां-बरोबर लग्नें करीत व सध्यांही ते कुणबी रखेल्या ठेवतात. त्यांचा मांगांशीं जो संबंध झाला, त्याचा परिणाम त्यांच्यांत मांग रामोशी नांवाचा पोटभेद उत्पन्न करण्यांत झाला.

रामोशांत पांच पोटभेद आहेत. ते असे, ( १ ) बंदते, ( २ ) बेरड, ( ३ ) हळगे, ( ४ ) कडू, ( ५ ) मांग. यांतील मांग रामोशांस अस्पृश्य मानण्यांत येतें. प्रत्येक पोटभेदांत चव्हाण आणि जाधव अशीं दोन कुळें आहेत. त्यांतील पहिल्यांस दुसऱ्यांपेक्षां श्रेष्ठ समजण्यांत येतें.

ज्यांचें देवक एकच आहे त्यांच्यांत लग्नसंबंध होत नाहीं. त्यांचीं मुख्य देवकें पांचपालवी, पानकणिस, वासनवेल, सूर्यफूल, उंबर, जांभूळ, कदंब आणि शमी हीं आहेत. जें झाड ज्यांचें देवक असेल त्या झाडाचीं फळें ते खात नाहींत किंवा दुसऱ्या कोणत्याही प्रकारें त्यास इजा करीत नाहींत. आतेबहिणीशीं व मामेबहिणीशीं लग्न करतां येतें. मावसबहिणीशीं लग्न करतां येत नाहीं. लग्नें लहानपणीं अथवा वयांत आल्यानंतरही करतात. विधवाविवाहास आणि सोड-चिठ्ठीस मोकळीक आहे.

रामोशी आपण पूर्वीं लिंगायत होतों असें सांगतात. त्यांचा मुख्य देव शिव. त्यांचे उपाध्ये जंगम किंवा देशस्थ ब्राह्मण असतात. मृतांस लिंगायतांप्रमाणें पुरण्यांत येतें. मृतांच्या शांत्यर्थ भाद्रपद महिन्यांत पितृतिथीच्या दिवशीं जंग-मांस अथवा ब्राह्मणांस शिधा देतात.

रामोशांचा वंशपरंपरागत धंदा चोरी करण्याचा आहे. मराठ्यांच्या सत्तेच्या काळीं रामोशी आणि मांग यांच्या ताब्यांत डोंगरी किल्ले असत आणि त्यांनीं लुटालूट केल्यास तिकडे दुर्लक्ष्य करण्यांत येई. ब्रिटिश अंमल सुरू झाल्यापासून रामोशी व मांग यांची रोज रात्रीं हजिरी घेण्यांत येते व ज्यांना पूर्वीं सजा झालेली नसेल त्यांनाच फक्त घरीं जाऊन विश्रांति घेऊं देतात. हल्लीं रामोशी मुख्यत्वेंकरून सरकारी व खासगी रखवालदारीचा व शेतीचा धंदा करतात.

ते मांस खातात व दारू पितात.

**रायकरी**—फक्त ठाणें जिल्ह्यांतील भिवंडी तालुक्यांत आढळतात. त्यांना गळभोई असेंही म्हणतात. हें दुसरें नांव पडण्याचें कारण ते जाळ्यानें मासे न पकडतां गळानें पकडतात हें होय. रायकऱ्यांचें समुद्रकिनाऱ्यावरील दणकट कोळ्यांपेक्षां वाल्यांशीं विशेष साम्य आहे आणि त्यांचा सामाजिक दर्जाही वाल्यांप्रमाणेंच आहे. त्यांच्या चालीरीतींवरून वाल्यांप्रमाणेंच ते उत्तर

कोंकणांतील अगदीं मूळच्या रहिवाशांपकींच असावेत असें दिसतें. ते मासे मारून व भाजीपाला लावून उदरनिर्वाह करितात. ते वाघमारी, चेडा, हिरवा, गिरा आणि सवारी ह्या नांवांच्या अत्यंत क्षुद्र देवतांस भजतात. ते ब्राह्मणांस फक्त मुलांचीं नांवें ठेवण्यांस बोलावतात. इतर प्रसंगीं बोलावीत नाहींत. ब्राह्मणानें लग्न लावलेलें जोडपें फार दिवस जगत नाहीं अशी त्यांची समजूत आहे.

**रायका**—रबारी जातीचें दुसरें नांव.

**रावत**—मुख्यत्वेंकरून अहमदाबाद व काठेवाडांत आढळतात. त्यांना ठाकोर असेंही म्हणतात. त्यांच्यामध्यें रजपूत कुळांचीं नांवें आढळतात. ते घोड्यांची पैदास्त करण्याचा व गाड्या हांकण्याचा धंदा करितात. विधवा-विवाह व सोडचिठ्ठी यांस मोकळीक आहे. ते मुख्यत्वेंकरून तकथा नांवाच्या देवीस भजतात. त्यांचे उपाध्ये ब्राह्मण असतात. ते मांस खातात व दारू पितात.

**रावळ**—रावळिया जातीचें दुसरें नांव.

**रावळिया**—रावळ किंवा राऊळ मुख्यत्वेंकरून गुजराथेंत आढळतात. पण दक्षिण महाराष्ट्र, कोंकण आणि कर्नाटकांतही त्यांची वस्ती तुरळक तुरळक आहे. त्यांना कधीं कधीं जोगी ह्या नांवानेंही संबोधण्यांत येतें. दक्षिणेंतील रावळ हे पूर्वीं गुजराथेंतूनच आलेले असावे असें दिसतें. पण आतां त्यांचा गुजराथेंतील रावळियांशीं कोणत्याच प्रकारचा संबंध राहिलेला नसून ती एक स्वतंत्र जातच बनलेली आहे. रावळ स्तुतिपाठकांचा व भिक्षा मागण्याचा धंदा करितात. कांहीं फीत विणतात व कांहीं शेती करतात.

गुजराथी रावळियांत सात पोटभेद आहेत. ते असे:—( १ ) बरिया, ( २ ) भलिया, ( ३ ) भोरिया, ( ४ ) मकवाणिया, ( ५ ) पालिया किंवा मारू ( ६ ) सखिया आणि वहाता, ( ७ ) उदलिया. त्यांच्यांत परमार, चोहाण, पाटेलिया, गढेदिया, भाल्या, होरांची, इत्यादि आडनांवें आहेत. एकच आडनांव असलेल्या स्त्रीपुरुषांत शरीरसंबंध होत नाहीं. रावळियांनीं दहा दहा, बाराबारा खेड्यांचे संघ स्थापन केलेले आहेत. प्रत्येक संघांतील

लोकांनीं आपसांतच विवाह केले पाहिजेत, असा नियम आहे. मामेबहिण आतेबहिण अथवा मावसबहिण यांच्याशीं लग्न लावितां येत नाहीं. भावां-भावांस बहिणीबहिणींशीं लग्न लावितां येतें. मुलांमुलींचीं लग्नें पांच ते वीस वर्षांच्या दरम्यान करितात. विधवाविवाह व सोडचिठ्ठी यांस मोकळीक आहे. रावळिया हिंगलाज मातेची विशेष भक्ति करितात. त्यांचे उपाध्ये त्यांच्याच जातीचे साधू असतात. लग्नें चालविण्यास मात्र तपोधन ब्राह्मणांस बोलावण्यांत येतें. मृतांस पुरतात.

रावळिया मांस खातात व दारू पितात. ते कोळी, कणबी आणि रजपूत जातीच्या लोकांस आपल्या जातींत घेतात.

महाराष्ट्रांतील रावळ, गुजराथी वाणी, लिंगायत आणि ब्राह्मण यांशिवाय इतर जातींपेक्षां आपणांस श्रेष्ठ मानतात. तरी ते मराठ्यांच्या हातचें अन्न खातात. त्यांचा दर्जा मराठ्यांबरोबरचा अथवा त्याहूनही कमी समजण्यांत येतो.

**रिखिया**—मेघवाळ जातीचें दुसरें नांव.

**रिशिया**—मेघवाळ जातीचें दुसरें नांव.

**रेडा लोणारी**—लोणारी जातीचें दुसरें नांव.

**रंगारी**—निळारी जातीचें दुसरें नांव.

**लभाणा**—लमाणी जातीचें दुसरें नांव.

**लमाण**—लमाणी जातीचें दुसरें नांव.

**लमाणी**—ह्या जातीस वंजारी, वंजारा, बंजारी, ब्रिंजारी, लमाण, लंबाडी, लभाणा आणि सुकलीर अशीं दुसरीं नांवें आहेत. ही जात सर्व इलाख्याभर आढळते. वंजारी हा शब्द पंजाबी भाषेंतील बनज किंवा वनज (संस्कृत वाणिज्य) म्हणजे व्यापार ह्या शब्दावरून निघाला असावा असें दिसतें. लमाणी हा शब्द लवण म्हणजे मीठ ह्या शब्दावरून निघाला आहे. बैलगाडीचे रस्ते आणि आगगाडी निघण्यापूर्वी ह्या जातीचा मुख्य धंदा गांवोगांव मीठ वाहून नेण्याचा होता; त्यावरून हें नांव पडलें असावें. ए. एम्. टी. जॅकसन साहेबांच्या मताप्रमाणें सिंधमधील व्यापार करणारी मोठी जात लुहाणा आणि लमाणी हीं दोन्ही नांवें एकाच शब्दावरून निघालीं

आहेत. हें खरें असल्यास, ह्या जातीचीं सर्व नांवें, ह्या इलाख्यांतील धान्याचा व्यापार करणाऱ्या ज्या दोन मुख्य जाती म्हणजे वाणी किंवा बनिया आणि लुहाणा, त्यांचींच निरनिराळीं पर्यायनांवें आहेत असें ठरेल. हिंदुस्थानांतील लष्करें स्वारीवर निघालीं म्हणजे त्यांच्याबरोबर धान्यवाहक नेण्याची जरूरी पडे. तें काम ही जात करीत असल्यामुळें तिच्या धान्यवाहनाच्या धंद्यावरूनच तिला सांप्रतचें नांव पडलें असावें असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. ह्या धंद्यानिमित्त ती गांवोगांव भटकत असतांना तिच्यांत दुसऱ्या पुष्कळ जातींच्या लोकांची भर पडली आहे हेंही निश्चित आहे. इ. स. १५०४ मध्यें शिकंदरानें धोलपूरवर स्वारी केली तिचें जें वर्णन मुसलमान इतिहासकारांनीं केलें आहे, त्यांत ह्या जातीचाही उल्लेख आहे. महमद तघलकापासून औरंगजेबापर्यंत दिल्लीच्या बादशहांच्या दक्षिण महाराष्ट्रांतील लहान लहान राजांबरोबर ज्या दीर्घकाल लढाया झाल्या, त्या वेळीं ह्या जातींत दुसऱ्या पुष्कळ जातींच्या लोकांची भरती झाली असें अनुमान केल्यास तें चुकीचें होईलसें वाटत नाहीं. कित्येक वंजाऱ्यांनीं आपला भटकण्याचा व्यवसाय सोडून ते शेती अथवा दुसरा कसला तरी धंदा स्वीकारून स्थायिक झाले आहेत. असा धंदा स्वीकारलेल्यांचे, ज्यांचा धंदा त्यांनीं स्वीकारला आहे, त्यांचे पोटभाग बनलेले आहेत. जसें, वंजारी कुणबी, वंजारी चांभार, वंजारी न्हावी, वंजारी भाट, वंजारी मांग, वंजारी महार.

ह्या जातीचा मूळ धंदा धान्य, मीठ आणि व्यापाराचे इतर जिन्नस बैलांच्या पाठीवरून गांवोगांव वाहून नेण्याचा होता. हा धंदा त्यांचे लहान मोठे तांडे करीत असत. आगगाडी आणि बैलगाडीचे रस्ते झाल्यापासून त्यांचा हा धंदा बहुतेक बुडाला आहे. सध्यां त्यांच्यापैकीं पुष्कळ लोक शेतकरी बनून स्थायिक झाले आहेत. कांहीं धान्याचा व जळाऊ लांकडांचा व्यापार करितात व कांहीं रोजमजुरी करून पोट भरतात.

वंजाऱ्यांचे प्रांतिक स्वरूपाचे दोन विभाग आहेतः (१) मराठी आणि कानडी वंजारी, (२) गुजराथी लमाणा. मराठी लमाणांत वीस पोटभेद आहेत. ते असेः—(१) अगसा, (२) असाटकर, (३) भुसारे,

भुशारे किंवा भुसारजिन, (४) चांभार किंवा रोहिदास, (५) चारण किंवा गवार, (६) धाडे-हे मुसलमानी धर्म पाळतात, (७) धाल्या, मादिग किंवा मांग, (८) हजाम किंवा न्हावी, (९) जोगी, (१०) कान्हेरजिन, (११) खुडाणे, (१२) कोंगाडी, (१३) लाड, लाडजिन किंवा वाडी, (१४) मेहुरणा, (१५) महार किंवा शिंगाड्या, (१६) मराठा, (१७) माथुरा, लभाणा, लमाणा किंवा मथुराजिन, (१८) रावजिन, लामधा किंवा बोंबिलविके, (१९) सोनार, (२०) तंबुरी. ह्यांतील शेवटचे तंबुरी हे मुसलमान असून ते लमाणांचे भाट आहेत. गुजराथी लभाणांत पोटभेद नाहींत. लमाणांत अनेक कुळें असून कांहीं कुळांत पोट-कुळेंही आहे. एकाच कुळांतील किंवा कुळांच्या समुदायांतील स्त्रीपुरुषांत शरीरसंबंध होत नाहीं. आतेबहिणीशीं अथवा मामेबहिणीशीं लग्न करण्यास प्रतिबंध आहे. भावाभावांस बहिणीबहिणींशीं लग्न करतां येतें. चारण, मराठा आणि लभाणा वंजाऱ्यांच्या मुलींस वीस वीस तीस तीस वर्षांच्या होईपर्यंत अविवाहित ठेवण्यांत येतें. इतर पोटभेदांत मुलींचीं लग्नें बारा ते वीस वर्षांच्या दरम्यान करतात. कर्नाटकांतील कांहीं भागांत मुलींचीं लग्नें मुळींच करीत नाहींत. अशा मुली बहुधा कुमार्गगामी बनतात. मराठा आणि लभाणा पोटभेदांत विधवाविवाह नाहीं; इतरांत आहे. मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न लावतां येतें. चारणांमध्यें विधवेनें जर मृत पतीच्या भावाशीं लग्न न करतां दुसऱ्या कोणाशीं केलें, तर जातीचे पंच तिला दंड करतात. चारणाशिवाय इतर पोटभेदांत सोडचिठ्ठी देतां येते.

वंजाऱ्यांचा मुख्य देव बालाजी. बालाजी खालोखाल ते तुळजा भवानी, अंबाबाई, मरिअम्मा, मार्तंल आणि हिंगलाज यांस भजतात. गुजराथी लभा-णांचा मुख्य देव शिव असून त्यास ते सल्लाल्ला असें म्हणतात. पूर्वी लमाणी आपले सर्व धर्मविधि स्वतःच चालवीत. अलीकडे त्या कामीं कांहीं लोक ब्राह्मणांची योजना करूं लागले आहेत. मृत विवाहित असल्यास त्यास जाळ-ण्यांत येतें, नसल्यास पुरण्यांत येतें. लमाणी श्राद्ध करीत नाहींत.

मराठा, आणि लभाणाशिवाय बाकीचे सर्व वंजारी मांस खातात व दारू पितात.

**लवाणा**—लोहाणा जातीचें दुसरें नांव.

**लाखेरी**—ह्या जातीचे लोक मुख्यत्वेंकरून राजपुतान्याच्या हद्दीजवळील गुजराथेंतील संस्थानांत आढळतात. ह्यांची लहानशी वस्ती पुणें जिल्ह्यांतही आहे. त्यांच्या रीतिभाती व भाषा ह्यांवरून ते मारवाडांतून आले असावे असें दिसतें. त्यांचा वंशपरंपरागत धंदा लाखेच्या बांगड्या करून विकणें हा आहे. कांचेच्या बांगड्या प्रचारांत आल्यापासून त्यांचा धंदा अगदीं बसला आहे. त्यांच्यांतील पुष्कळ लोक हल्लीं रोजमजुरी करून पोट भरतात.

**लाड**—ह्या जातीचे लोक मुख्यत्वेंकरून बेळगांव, धारवाड व विजापूर जिल्ह्यांत आढळतात. त्यांची वस्ती म्हैसूर संस्थानांतही बरीच आहे. लाड अथवा लाट हें दक्षिण गुजराथेचें जुनें नांव आहे. ह्यावरून लाडांची उत्पत्ति तेथील एखाद्या जातीपासून झाली असावी असें कित्येकांचें अनुमान आहे. गेल्या शतकाच्या सुरवातीस म्हैसुरांतील लाडांविषयीं बुचाननें असें लिहिलें आहे कीं, "ते घोडेस्वारांची नोकरी करितात. ते जमिनींचेही मालक आहेत. ते आपणास क्षत्रिय म्हणवितात आणि ते जानवीं घालतात. त्यांच्यांत चौदा गोत्रें आहेत. नग्न स्त्रीच्या समोर ते शक्तीची उपासना करितात." ते जानवीं घालतात व घोडेस्वारांचें काम करितात, यावरून ते मूळचे रजपूत असावे असें दिसतें. परंतु ह्या इलाख्यांत त्यांचें रजपुतांच्या दर्जापासून पतन झालें असून, ते लहानसहान व्यापार करून व कित्येक तर खाटकाचेंही काम करून उदरनिर्वाह करितात. तथापि अजूनही त्यांच्यांतील पुष्कळ लोक जानवीं घालतात व आपणांस क्षत्रिय म्हणवितात. ते आपसांत चोरासी ह्या नांवाची भाषा बोलतात. त्यावरून ते सुरतेंतील चोरासींतून आले असावे असेंही कित्येकांचें अनुमान आहे.

लाडांत नऊ पोटभेद आहेत. ते असे:—(१) गुजर, (२) हलवेकरी, (३) काथित, (४) खाटीक, (५) मारवाडी, (६) सोव, (७) शेरोगर, (८) सुगंधी

किंवा क्षत्रिय, (९) सूर्यवंशी. ह्या पोटभेदांचा परस्परांशीं रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. यांत सूर्यवंशांची संख्या सर्वांत जास्त आहे.

**लाडक**—कच्छमध्यें व काठेवाडांतील जामनगर संस्थानांत आढळतात. ते पूर्वी रजपूत होते असें म्हणतात. त्यांचें मूळ ठिकाण सिंधमध्यें नगरसमोई येथें होतें. इसवी सनाच्या तेराव्या आणि सोळाव्या शतकांत ते जादेजा आणि रामरावळ यांजबरोबर कच्छ व काठेवाडांत आले. त्यांचा मूळ धंदा शिपाईगिरीचा होता. त्यांच्या लष्करी कामगिरीबद्दल त्यांस पूर्वीच्या जामांनीं गिरास जमिनी दिलेल्या आहेत. त्यांच्यांतील पुष्कळ लोक आपल्या जमिनीची स्वतःच लागवड करितात. त्यांच्यांत कच्छी आणि काठेवाडी असे दोन पोटभेद असून त्यांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. त्यांचीं आडनांवें रजपुतांतील कुळांच्या नांवासारखींच आहेत. एकाच आडनांवाच्या स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. मुलांमुलींचीं लग्नें पंधरा ते वीस वर्षांच्या दरम्यान करितात. विधवाविवाह आणि सोडचिठ्ठी यांस मोकळीक आहे. लाडक सर्व देवतांस भजतात आणि आपले धर्मविधि ब्राह्मणांकडून चालवितात. मृताच्या उजव्या हाताचें एक बोट कापून त्याचें विधिपुरःसर दहन करण्यांत येतें. बाकीचें शरीर मुसलमानांप्रमाणें पुरतात. ज्यांची स्थिति चांगली असते. ते पुरलेल्या शवांच्या जागीं थडगींही बांधतात. मेरमन जस्सा नांवाचा एक लाड दिल्लीच्या बादशहाच्या दरबारीं गेला असतांना बादशहाच्या आग्रहावरून त्यानें इस्लामी धर्माचा स्वीकार केला. पण आपल्या गांवीं परत आल्यानंतर त्यानें हिंदुधर्माची पुनः दीक्षा घेतली. तथापि बादशहाच्या सन्मानार्थ त्यानें वरीलप्रमाणें प्रेतें पुरण्याची चाल सुरू केली असें सांगतात.

**लिंगायत**—बेळगांव, विजापूर व धारवाड जिल्ह्यांत लिंगायतांची वस्ती फार मोठी आहे, आणि सर्व दक्षिण महाराष्ट्रांत व त्यांतील संस्थानांत त्यांची वस्ती थोडथोडी पसरलेली आहे. लिंगायतांस लिंगवंत, लिंगांगी, शिवभक्त आणि वीरशैव अशींही आणखी नांवें आहेत. लिंगायत हें नांव लिंग (महादेवाचें) आणि आयत म्हणजे विश्रांति या शब्दांवरून पडलें आहे. तें अत्यंत अन्वर्थक आहे. कारण, प्रत्येक लिंगायतास—तो स्त्री असो कीं पुरुष

असो–शिवाचें लिंग शरीरावर नेहमीं धारण करावें लागतें. लिंग दगडाचें करितात व तें चांदीच्या लहानशा डबींत घालून गळ्यांत घालतात.

लिंगायतांच्या धर्मास इसवी सनाच्या अकराव्या शतकाच्या सुरवातीस विशेष महत्त्व आलें. त्यांच्या धर्माचें मूलतत्व लिंग धारण करणारे सर्व लोक ईश्वराच्या दृष्टीनें समान दर्जाचे आहेत असें आहे. यावरून हा धर्म दुसऱ्या अनेक धर्मपंथांप्रमाणें ब्राह्मणांचें वर्चस्व हाणून पाडण्याकरितां प्रस्थापित करण्यांत आला असावा असें दिसतें. ब्राह्मणांच्या त्रिमूर्तिपैकीं लिंगायत फक्त शिवासच मानतात. ते वेदांस पूज्य मानतात. परंतु त्यांवरील नंतरच्या भाष्यांस ब्राह्मण जसे मानतात तसे ते मानीत नाहींत. पूर्वीं त्यांच्यांत बाल-विवाहास प्रतिबंध असे, विधवाविवाहास प्रतिबंध नसे, ते मृतांस पुरीत व हिंदूंच्या अशौचपरिहाराच्या मुख्य विधींस तर त्यांनीं अजीबातच फांटा दिला होता. परंतु त्यांचा मूळचा उत्साह जसजसा मंद होत गेला तसतसें जातिभेदाचें तत्त्व त्यांच्यांत पुनः शिरूं लागलें. आणि कालांतरानें ब्राह्मणांच्या धर्मविधींचा त्यांच्यावर पगडा बसून त्यांच्यांतही तशाच प्रकारचे विधि निर्माण झाले. जो पंथ हिंदूंतील जातिभेदाचें उच्चाटन करण्यासाठीं निर्माण करण्यांत आला होता, त्यानें हिंदूंतील एकही जात कमी न होतां उलट त्यांत पन्नास पाउणशें नवीन जातींची भर मात्र पडली! त्यांतील मुख्य जातींचीं नांवें येणेंप्रमाणें:—

(१) अगसा, (२) आदिबांजिग, (३) अंबिग, (४) इलिगेर किंवा कलाल, (५) कब्बलिगर, (६) कम्मार, (७) कलावंत, (८) काचारी, (९) कुडवक्कल (१०) कुंभार, (११) कुरुब, (१२) कुरुसाळी (१३) गणिगेर, (१४) गवळी, (१५) गवंडी किंवा उप्पार, (१६) चत्तेर, (१७) चलवाडी किंवा होलया, (१८) जाड, नेयकार, कोष्टी किंवा साळी–यांत बिलिजाड, देवांग, हटगर, कुर्विन शेट्टी, नीलकंठ, पदसाळी, पद्मसाळी, पट्टसाळी आणि समसाळी इतक्या पोटजाती आहेत—(१९) जंगम, अय्या किंवा महेश्वर—यांत गणकुमार, गणाचारी, गुरुस्थल, कंबेया, कयकडा, मठपती नंदी कोला, पंचसिंहासनाधीश, पुजारी, स्थावर, वस्त्रदवरू, विभुती,

विरक्त किंवा धस्थल इतके पोटभेद आहेत. ( २० ) ढोर, ( २१ ) तांबोळी, ( २२ ) तिलारी किंवा तिराली, ( २३ ) तुरकर ( २४ ) दास किंवा देवदास, ( २५ ) नागलिक किंवा बनगर, ( २६ ) नादिग किंवा न्हावी, ( २७ ) नीळगर, ( २८ ) नोनबर, ( २९ ) पंचाचारी, ( ३० ) बडिग, ( ३१ ) बलिगार, (३२) बसवी, (३३) बांजिग-यांत अथणीकर किंवा होलियाचीबल्की, चलगेरीबल्की, धुलपावद, लोकबल्की किंवा लोकवंत आणि शिलवंत किंवा चिलमी अग्नी इतके पोटभेद आहेत—( ३४ ) बुरूड, ( ३५ ) मल्लव, ( ३६ ) रड्डी, ( ३७ ) लालगोंडा, ( ३८ ) शिवशिंपिग, ( ३९ ) शिवयोगी, ( ४० ) समगार, जिनगर किंवा चमार, ( ४१ ) साईब, ( ४२ ) सादा, ( ४३ ) सुनगार किंवा चुनार, ( ४४ ) हंडेवंत—यांत हंडेवझीर, हंडेयबा, हंडेराऊत आणि हंडेगुरुब असे पोटभेद आहेत—( ४५ ) हेलव, ( ४६ ) हुगार, जीर, गुरव, मलगार किंवा तोतिगार.

लिंगायत पंथाची स्थापना बसवानें इसवी सनाच्या बाराव्या शतकाच्या उत्तरार्धांत केली अशी पूर्वी समजूत होती. परंतु अलीकडे उपलब्ध झालेल्या अनेक शिलालेखांवरून व ताम्रपटांवरून असें सिद्ध झालें आहे कीं, हा पंथ लैकुलीस नांवाच्या विख्यात धर्मगुरूनें अकराव्या शतकाच्या सुरवातीस स्थापित केला, आणि बसवानें फक्त त्याचा प्रसार करण्याच्या कामीं पुढाकार घेतला. परंतु हें मत सांप्रतच्या लिंगायत विद्वानांस मान्य नाहीं. त्यांच्या मतें हा पंथ ब्राह्मणी धर्माइतकाच जुना आहे. पण हें त्यांचें म्हणणें निश्चित प्रमाणांनीं सिद्ध झालेलें नाहीं. त्यांचें आणखी असेंही म्हणणें आहे कीं, शैवांत नेहमीं दोन भेद असलेले आढळून येतात. त्यांतील एक लिंग धारण करितात व दुसरे धारण करीत नाहींत. लिंग धारण करणारांस वीरशैव असें म्हणतात. त्यांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र असे चार वर्ण आहेत. पुष्कळ लिंगायतांची, आपली हिंदूंत गणना झाल्यास आपला सामाजिक दर्जा वाढेल अशी समजूत झाली आहे, त्याचें वरील मत हें निःसंशय निदर्शक आहे. वरील समजुतीमुळेंच ते लिंगायत हें नांव टाकून आपणास वीरशैव अथवा लिंगी ब्राह्मण असें म्हणूं लागले आहेत व हिंदूंप्रमाणें आपणांतही चातुर्वर्ण्य

आहे असें प्रतिपादन करूं लागले आहे. कदाचित् या त्यांच्या मताचा उगम त्यांच्यांतील सुशिक्षितांस ब्राह्मणांचें वर्चस्व खपत नाहीं यांतही असूं शकेल.

स्थूलमानानें लिंगायतांत तीन वर्ग आहेत. यांतील पहिल्या वर्गास अष्टवर्णांचा पूर्ण अधिकार असलेले पंचमसाळी असें नांव देतां येईल. या वर्गांत अय्या अथवा जंगम या नांवानें ओळखले जाणारे लिंगायतांचे उपाध्ये आणि व्यापार करणाऱ्या प्रमुख जाती किंवा बांजिग यांचा समावेश होतो. लिंगायत धर्माचे मूळ अनुयायी जातिभेद मानीत नसत व परस्परांशीं कोणताही प्रतिबंध न ठेवितां रोटीबेटीव्यवहार करीत असत. वर सांगितलेल्या पहिल्या वर्गांतील लोक ह्या मूळ अनुयायांशीं बरेच निकटवर्ती आहेत. ते अजूनही परस्पर रोटीव्यवहार करितात. परंतु लग्नाच्या बाबतींत मात्र त्यांच्यांत अनेक पोटभेद आहेत. त्यांतील प्रत्येक पोटभेदांतील लोकांस आपल्या खालील पोटभेदांतील मुलींशीं लग्न करतां येतें, परंतु आपल्या मुली त्या पोटभेदांतील पुरुषांस देतां येत नाहींत. ह्या वर्गांतील खालच्या पोटभेदांतील लोकांस कांहीं धार्मिक विधि करून वरच्या वर्गांत जातां येतें. ह्या वर्गांतील लोकांचा दर्जा बाकीच्या दोन वर्गांतील लोकांच्या दर्जापेक्षां बराच श्रेष्ठ आहे. दुसऱ्या वर्गांत अष्टवर्णांचा अधिकार असलेल्या, पण पंचमसाळ्यांत न मोडणाऱ्या लोकांचा समावेश होतो. या वर्गांत कोष्टी, तेली, गवंडी, रंगारी, शेतकरी, धनगर वगैरे उद्योगविशिष्ट सत्तरांहून अधिक पोटभेदांचा अंतर्भाव होतो. ह्या वर्गांतील लोकांनीं लिंगायत धर्माचा स्वीकार पंचमसाळ्यांनंतर बऱ्याच कालानंतर केला असावा असें दिसतें, व पंचमसाळ्यांबरोबर रोटीबेटीव्यवहार करण्याची त्यांना कधींच मोकळीक नव्हती असें अनुमान होतें. ह्या वर्गांतील प्रत्येक पोटभेद म्हणजे एक स्वतंत्र जातच आहे. म्हणजे कोष्टी पोटभेदांतील पुरुषाला कोष्टी पोटभेदांतील स्त्रीशीं, सुतार पोटभेदांतील पुरुषाला त्याच पोटभेदांतील स्त्रीशीं, याप्रमाणें लग्न करावें लागतें. ह्या बाबतींत हिंदूंतील जातींत व त्यांच्यांत कांहींच भेद नाहीं. एका पोटभेदांतील लोकांस दुसऱ्या पोटभेदांत जातां येत नाहीं. प्रत्येक पोटभेदाचें नांव विशिष्ट पोटभेदावरून पडलेलें आहे. तिसऱ्या वर्गांत अष्टवर्णांचा अधि-

कार नसलेल्या पंचमसाळ्यांत न मोडणाऱ्या लोकांचा समावेश होतो. यांत चांभारादि अस्पृश्य व परीट, कोळी वगैरे हीन जातींचा अंतर्भाव होतो.

वर वर्णन केलेल्या प्रत्येक पोटभेदांत अनेक कुळें आहेत, व वरच्या दर्जांतील पोटभेदांत लिंगायत साधूंच्या नांवांवरून प्रस्थापित झालेलीं नंदी, भृंगी, वीर, वृष आणि स्कंद अशीं पांच गोत्रें आहेत. एकाच कुळांतील अथवा गोत्रांतील स्त्रीपुरुषांचा विवाह होत नाहीं. मावसबहिणीशीं लग्न करतां येत नाहीं. बहिणींच्या मुलींबरोबर लग्न करतां येतें. पण धाकट्या बहिणीच्या मुलीशीं लग्न करणें प्रशस्त मानीत नाहींत. लग्नें लहानपणीं व वयांत आल्यानंतरही करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. सोडचिठ्ठी देतां येते. सर्व लिंगायत शाकाहारी आहेत. लिंगायतांशिवाय दुसऱ्यांच्या हातचें अन्न ते खात नाहींत.

लिंगायतांचा मुख्य देव शिव. ते कधीं कधीं हनुमान, गणपति, यल्लम्मा, मारुती आणि इतर गौण देवतांचीही पूजा करितात. ज्यांस अष्टवर्णांचा अधिकार आहे त्या सर्वांस हा संस्कार करावा लागतो. अष्टवर्णांत (१) गुरु, (२) लिंग, (३) विभूति, (४) रुद्राक्ष, (५) मंत्र, (६) जंगम, (७) तीर्थ आणि (८) प्रसाद अशा आठ विधींचा समावेश होतो. मृतांस पुरण्यांत येतें. श्राद्धविधि करण्यांत येत नाहीं. तथापि दर वर्षी भाद्रपद अथवा आश्विन महिन्याच्या अमावास्येस पितरांस अन्न व वस्त्र अर्पण करण्यांत येतें.

**लवाणा**—लोहाणा जातीचें दुसरें नांव.

**लुहार**—लोहार जातीचें दुसरें नांव.

**लोणारी**—ह्या जातीचे लोक सर्व दक्षिण महाराष्ट्रांत आढळतात. ते चुना व कोळसे तयार करून विकण्याचा धंदा करितात. त्यांना कधीं कधीं गाढव लोणारी अथवा रेडा लोणारी असेंही म्हणतात. त्यांच्या नांवावरून त्यांचा मूळ धंदा मीठ (लोण) करण्याचा होता असें दिसतें. अजूनही त्यांच्यांत 'मीठ' या नांवाचा एक पोटभेद आहे. त्यांच्या रीतिभाती व धर्मसमजुती मराठ्यांप्रमाणें आहेत. एकाच आडनांवाच्या अथवा आडनांवांच्या समुदायां-

तील स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. आतेबहिणीशीं लग्न करितां येतें. भावाभावांस बहिणीबहिणींशीं लग्न करितां येतें.

लोणारी मांस खातात व दारू पितात.

**लोधा**—मुख्यत्वेंकरून अहमताबाद, काठेवाड व पालनपूर येथें आढळतात. संयुक्त आणि मध्य प्रांतांत त्यांची बरीच वस्ती आहे. पंजाबांतील लुधियानाशीं त्यांचा संबंध आहे अशी दंतकथा प्रचलित आहे. ते बुंदेलखंडांत स्थायिक होऊन पुष्कळ काळ लोटला आहे. गुजराथ आणि काठेवाडांतील ज्या चालीरीति त्यांनीं उचलल्या आहेत त्यांवरून ते तिकडे मोगल बादशहांच्या कारकीर्दींत किंवा त्याच्या पूर्वींही आले असावे असें दिसतें. संयुक्त प्रांतांतील ललितपूर येथील आपल्या जातिबांधवांप्रमाणें ते आपणास ठाकूर ही पदवी लावतात. ते आपसांत अजूनही हिंदुस्थानी भाषा बोलतात.

लोधांत जरिया आणि पतरिया असे दोन मुख्य पोटभेद आहेत. पांच-सहा पिढयांच्या आंत लग्नें होत नाहींत. विधवाविवाहास मोकळीक आहे. विधवेस मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न करितां येतें. अविवाहितास विधवेशीं लग्न करावयाचें असल्यास प्रथम शमीबरोबर लग्न करावें लागतें. सोडचिठ्ठीस मोकळीक नाहीं.

लोधा वैष्णव मताचे अनुयायी आहेत. तथापि त्यांच्या कुलदेवता देवीच आहेत. त्यांचे उपाध्ये उत्तर हिंदुस्थानांतील ब्राह्मण असतात. ते शेती, मजुरी, जळाऊ लांकडांची विक्री इत्यादि धंदे करून उदरनिर्वाह करितात.

ते मांस खातात व दारू पितात.

**लोहाणा**—लुवाणा किंवा लवाणा मुख्यत्वेंकरून सिंध, काठेवाड आणि कच्छ येथें आढळतात. सिंधमध्यें त्यांना वैश्य, वाणी किंवा बनिया असेंही म्हणतात. ते मूळचे राठोड रजपूत असून त्यांना मुलतानमधील लोहाणपूर किंवा लोहकट यावरून लोहाणा हें नांव पडलें आहे असें सांगतात. मुसलमानांनीं त्यांना पंजाब व सिंध येथून हांकून दिल्यानंतर तेराव्या शतकाच्या सुमारास ते कच्छमध्यें आले. कच्छमध्यें सतराव्या शतकांत, विशेषेंकरून लाखाजी आणि रायधनाच्या कारकीर्दींत, ते दिवाणासारख्या मोठमोठ्या

हुद्यांवर अंमलदार होते. हल्लीं ते बहुधा शेती, मजुरी व गवंडीकाम करितात. कांहीं कारकुनी करितात, कांहीं धान्याचा व्यापार करितात व कांहीं दुकानदार आहेत. सिंधमध्यें कित्येक जमीनदार आहेत.

सिंधमधील लोहाणांत १३६ नुख ( कुळें ) आहेत. त्याचप्रमाणें कच्छ व काठेवाडमधील लोहाणांत अनेक नुख आहेत. एकच नुख असलेल्या स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. लग्नें वयांत आल्यावर होतात. विधवाविवाहास मोकळीक आहे. सिंधमध्यें विधवेनें मृत पतीच्या भावाशीं लग्न करणें जास्त इष्ट मानलें जातें; पण तिनें त्याच्याशीं लग्न केलेंच पाहिजे असा निर्बंध नाहीं. गुजराथेंतील लोहाणांत सोडचिठ्ठी देण्याची चाल आहे, पण सिंधमध्यें तो प्रघात नाहीं.

लोहाणांची कुलदेवी रांडेल माता; पण ते दर्यापीर म्हणजे सिंधुनदाची विशेष भक्ति करितात. त्यांचे उपाध्ये सारस्वत ब्राह्मण असतात. त्यांचे धार्मिक आचार भाटियांप्रमाणें आहेत.

ते मांस खातात व दारू पितात.

**लोहार**—किंवा लुहार इलाख्यांत सर्वत्र आढळतात. त्यांच्यांत ( १ ) मराठा, ( २ ) पांचाळ, ( ३ ) कन्नड, ( ४ ) कोंकणी आणि ( ५ ) गुजराथी असे पांच मुख्य पोटभेद आहेत. ह्या पांचही पोटभेदांचा धंदाच काय तो एक आहे. बाकी त्यांचा परस्परांशीं कोणत्याच प्रकारचा संबंध नाहीं. त्यांचा परंपरागत धंदा शेतीचीं आउतें करणें व त्यांची दुरुस्ती करणें हा आहे. त्याबद्दल खेड्यांतील लोक त्यांना धान्य देतात आणि कांहीं ठिकाणीं साऱ्याची थोडी सूट देऊन त्यांना जमिनीही देण्यांत आलेल्या आहेत. परदेशी मालाच्या आयातीमुळें त्यांचा धंदा बसल्यापासून गुजराथेंतील कांहीं लोहार चांदीचें काम व कांहीं सुतारकाम करूं लागले आहेत. कानडा जिल्ह्यामध्यें सुद्धां कित्येक जण सुतारकाम करूं लागले आहेत. पुष्कळ लोहारांनीं शेतीचा धंदा उचलला आहे.

**मराठा लोहार**—देवांचा शिल्पकार जो विश्वकर्मा त्याच्या मनु नांवाच्या पुत्रापासून आपली उत्पत्ति झाली आहे असें सांगतात. सोलापूर जिल्ह्याखेरीज इतरत्र त्यांच्यांत पोटभेद नाहींत. तेथें त्यांच्यांत ( १ ) अकूज,

( २ ) कळ्साबद, ( ३ ) कामळे, ( ४ ) पकलघट, ( ५ ) पर्वाळे, (६) शिंदे आणि ( ७ ) तिंगारे असे सात पोटभेद आहेत. त्यांचा रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. त्यांचीं कुळें मराठ्यांतील कुळांप्रमाणें आहेत. एकाच कुळांतील स्त्री-पुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. मामेबहिणीशीं लग्न करतां येतें, आतेबहिणीशीं किंवा मावसबहिणीशीं करतां येत नाहीं. भावाभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करतां येतें. मुलींचीं लग्नें सात ते बारा व मुलांचीं बारा ते वीस वर्षांच्या दरम्यान करितात. कांहीं ठिकाणीं लग्नाच्या पूर्वीं दोन दिवस मुलांस जानवीं घालतात. विधवाविवाहास मोकळीक आहे. सोडचिठ्ठी देतां येते.

मराठा लोहारांचीं कुलदैवतें भवानी, खंडोबा, विठोबा, जोतिबा, महादेव, जनाई, बहिरोबा, आणि कालिका हीं आहेत. बेळगांव जिल्ह्यांत त्यांचे उपाध्ये त्यांच्या जातीचेच असतात; इतर ठिकाणीं ब्राह्मण असतात. मृतांस जाळतात अथवा पुरतात. कांहीं ठिकाणीं श्राद्ध करण्यांत येतें.

बेळगांव जिल्ह्यांतील मराठा लोहार मांस खात नाहींत; इतर ठिकाणचे मांस खातात व दारू पितात.

**कन्नड लोहार**—ह्यांस कम्मार असेंही म्हणतात. जेव्हां ते लांकडांचें काम करतात तेव्हां त्यांस आचारी म्हणतात, आणि जेव्हां ते लोखंडाचें काम करितात तेव्हां त्यांस लोहार म्हणतात. त्यांच्यांतील बहुतेक कुळांचीं नांवें दक्षिण कोंकण व गोवें येथील गांवांवरून पडलेलीं आहेत. तसेंच त्यांचा स्वामी व कुलदैवतें गोव्यांतच आहेत. ह्या गोष्टीवरून ते कोंकणी लोहारांचीच एक शाखा असावी असें दिसतें. सरासरी पंचवीस तीस वर्षांमागें कांहीं कन्नड लोहार म्हैसुरांतील शृंगेरी मठाचे अनुयायी बनले, त्याबरोबर जातींतील इतर लोकांनीं त्यांच्याशीं सर्व व्यवहार बंद केला. त्यामुळें आतां त्यांचा एक स्वतंत्रच पोटभेद बनला आहे. कन्नड लोहारांत गोत्रें व कुळेंहीं आहेत. गोत्र अथवा कूळ एकच असेल तर लग्नसंबंध होत नाहीं. आतेबहिणीशीं अथवा मामेबहिणीशीं लग्न करतां येतें. मुलींचीं लग्नें बहुधा दहा ते बारा व मुलांचीं पंधरा ते वीस वर्षांच्या दरम्यान करितात. विधवांचें केशवपन करितात. त्यांस पुनर्विवाह करतां येत नाहीं. सोडचिठ्ठी देतां येत नाहीं.

कन्नड लोहारांची मुख्य देवी अकोल्याची कालम्मा. त्यांचे उपाध्ये कर्नाटक ब्राह्मण असतात. गोव्यांत मात्र त्यांचे उपाध्ये त्यांच्याच जातीचे असतात. मृतांस जाळतात व त्यांच्या शांत्यर्थ श्राद्धें करतात. ते मांस खातात व दारू पितात. ते दुसऱ्या जातीच्या लोकांच्या हातचें अन्न खात नाहींत.

**कोंकणी लोहार**--ह्यांस सावंतवाडी संस्थानांत धवड असें म्हणतात. त्यांच्यांत स्थानिक स्वरूपाचीं अनेक कुळें आहेत. त्यांचे रीतरिवाज मराठा लोहारांप्रमाणेंच आहेत.

**गुजराथी लोहार**—किंवा लुहार आपली उत्पत्ति पिठवोपासून झाली आहे असें सांगतात. धंधार आणि धंधकार ह्या दैत्यांबरोबर शिवाचें युद्ध चाललें असतां त्यास हत्यारें करून देण्यासाठीं पार्वतीनें पिठवोस शिवाच्या पाठीवरील मळापासून उत्पन्न केलें अशी दंतकथा आहे.

गुजराथी लोहारांत भावनगरी, पांचाल, शिरोहिया, सुरती, खंभाती आणि परजिया असे सहा पोटभेद आहेत; त्यांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. ह्यांशिवाय काठेवाडांत सोरठिया, मच्छुकोठिया आणि झिल्का असे आणखी तीन पोटभेद आहेत. त्यांच्यांत अनेक कुळें आहेत. त्यांपैकीं कांहींचीं नांवें रजपूत कुळांसारखीं असून कांहींचीं स्थानिक स्वरूपाचीं आहेत. दक्षिण गुजराथेंतील कांहीं भागांत आतेबहिणीशीं अथवा मामेबहिणीशीं लग्न करितां येतें. इतर ठिकाणीं हा प्रघात नाहीं. अगदीं जवळच्या नातलगाशीं लग्न करतां येत नाहीं. भावाभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करतां येतें. लग्नें बहुधा अगदीं लहानपणींच करितात. कच्छमधील कांहीं लोहार शिवाय करून इतर लोहारांत विधवाविवाहास मोकळीक आहे, परंतु मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न करण्याचा फारसा प्रघात नाहीं. सोडचिठ्ठी देतां येते.

गुजराथी लोहार मुख्यत्वेंकरून भवानी देवीस भजतात. त्यांचे उपाध्ये औदिच ब्राह्मणांच्या लोहारगोर ह्या नांवाच्या पोटभेदांतील असतात. ते लोहारांच्या हातचें अन्न खात असल्यामुळें त्यांस हलके समजण्यांत येतें. मृतांस जाळतात व त्यांच्या तृप्त्यर्थ श्राद्धें करितात.

दक्षिण गुजराथ व कच्छमधील कांहीं लोहार गुप्तपणें मांस खातात व दारू पितात. त्यांशिवाय इतर सर्व लोहार पक्के शाकाहारी आहेत.

**लंबाडी**—लमाणी जातीचें दुसरें नांव.

**लुंडा**—खवास जातीचें दुसरें नांव.

**वजीर**—खवास जातीचें दुसरें नांव.

**वडार**—ओड जातीचें दुसरें नांव.

**वडारी**—भामटा जातीचें दुसरें नांव.

**वड्डर**—ओड जातीचें दुसरें नांव.

**वंजारी**—लमाणी जातीचें दुसरें नांव.

**वल्हेर**—मुख्यत्वेंकरून दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानांत आढळतात. ते मुरल्या आणि ढोलकीं वाजवीत भिक्षा मागतात. त्यांचे रीतरिवाज कुणब्यां-प्रमाणें आहेत.

**वाघेर**—मुख्यत्वेंकरून काठेवाडांत ओखामंडळ प्रांतांत आढळतात. ते आपण काठेवाडांतील सर्वांत जुने रहिवासी आहों असें सांगतात. परंतु हल्लीं ते कच्छच्या आखाताच्या दक्षिण किनाऱ्याभर पसरले असून, नवानगर संस्थानां-तील हालार प्रांतांत समुद्रकिनाऱ्यावरील बहुतेक खेड्यांत व शहरांत त्यांची बरीच वस्ती असून, कांहीं खेड्यांत तर सर्व वस्ती त्यांचीच आहे. तेथें त्यांस अर्नाळा आणि द्वारकेच्या वाढेल राजांनीं दिलेल्या गिरास जमिनी आहेत.

वाघेर लोक लढवय्ये व युद्धप्रिय असून पुष्कळ काळपर्यंत चांचेगिरी व लूटमार करून ते लोकांस उपद्रव देत असत. त्यांस इ. स. १८६७ त गाइ-कवाड आणि ब्रिटिश ह्या दोघांनींही मिळून जेरीस आणलें. अजून सुद्धां त्यांची लुटारूपणाची प्रवृत्ति सर्वस्वीं नष्ट झालेली नाहीं. त्यामुळें त्यांच्या प्रांता-वर एका स्वतंत्र अधिकाऱ्याची नेमणूक केलेली असते.

वाघेर लोक आपण क्षत्रिय आहों असें म्हणतात. त्यासंबंधीं त्यांच्यांत कांहीं दंतकथाही प्रचलित आहेत. त्यांची उत्पत्ति कोळ्यांपासून झाली असून जाति-भ्रष्ट झालेल्या रजपुतांची त्यांत भेसळ झाली असावी असें दिसतें.

वाघेरांत हिंदु आणि मुसलमान असे दोन पोटभेद आहेत. हिंदु वाघेर मुसलमान वाघेरांच्या हातचें अन्न खात नाहींत, परंतु मुसलमान वाघेरांनीं भरपूर पैसा दिल्यास त्यांस आपल्या मुली लग्नांत देतात. कच्छच्या दक्षिण किनाऱ्यावरील आणि हालार प्रांतांतील समुद्रकिनाऱ्यावरील खेड्यांतील मुसलमान वाघेरांस मात्र हिंदु वाघेर आपल्या मुली देत नाहींत.

वाघेरांत अनेक शाखा आहेत. एकाच शाखेंत शरीरसंबंध करतां येत नाहीं. आतेबहिणीशीं व मामेबहिणीशीं लग्न करतां येतें. भावाभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करतां येतें. मुलींचीं लग्नें बहुधा तेरा ते अठरा व मुलांचीं अठरा ते पंचवीस वर्षांच्या दरम्यान करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. त्यांच्या जातीच्या प्रमुखाच्या ( माणेक ) कुटुंबाशिवाय इतर कुटुंबांतील विधवांस मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न करतां येतें. सोडचिठ्ठी देतां येते.

वाघेर मुख्यतः शैवमतानुयायी आहेत. तथापि द्वारकेंत आणि द्वारकेच्या आजूबाजूस राहणारे वाघेर विष्णु आणि रणछोडजी यांची अत्यंत भक्ति करितात. त्यांचीं कुलदैवतें आशापुरा, वाछडो, मोहमाया, खोडियार, कालिका, विजवसन, बेला आणि वलवी हीं आहेत. त्यांचे उपाध्ये राजगोर ब्राह्मण असतात; परंतु त्यांचे धार्मिक विधि बहुधा गुगली ब्राह्मणाच्या वैद नांवाच्या पोटभेदांतील लोक चालवितात. मृतांस जाळतात व त्यांच्या शांत्यर्थ दर वर्षीं भाद्रपद वद्य नवमीस कांहीं विधि करितात.

कांहीं वाघोर जमीनदार आहेत, कांहीं मासे मारण्याचा धंदा करितात, कांहीं खलाशाचें काम करितात व कांहीं मजुरी करितात.

ते मांस खातात व दारू पितात.

**वाघ्या**—पहा–मुरळी.

**वाघ्री**—गुजराथेंत सर्वत्र आढळतात. वाघ्र्यांचे उपाध्ये ( भुवा ) वाघ्री शब्दाचा अर्थ ' वाघाप्रमाणें ' असा करितात, परंतु तो शब्द राजपुतान्यांतील ओसाड प्रदेशांतील वागड ( वाळूचा डोंगर ) ह्या शब्दावरून निघाला आहे असें अनुमान करणें जास्त सयुक्तिक होईल. संयुक्तप्रांतांतील बागर प्रांतांत राहणाऱ्या बागर जातीशीं त्यांचा संबंध कित्येक जोडतात, पण त्यांची उत्पत्ति

कोळ्यांपासून झाली असावी असें दिसतें. ते स्वतः आपली उत्पत्ति रजपुतांपासून झाली आहे असें सांगतात. त्यांचा सामाजिक दर्जा कोळ्यांच्या सर्व जातींच्या खालीं आहे.

वाघ्र्यांत चुनारिया, दातणिया, वेदू आणि पातानेजी असे चार पोटभेद आहेत. चुनारिया चुना तयार करितात, शेती करितात आणि पक्षी पकडतात. दातणिया दांत घांसण्याच्या काड्या विकतात. वेदू अरियाची लागवड करितात. पातानेजी वेळू आणि लांकडें विकण्याचा धंदा करितात आणि अंडीं विकतात. वर सांगितलेल्या पोटभेदांशिवाय त्यांच्यांत तळबदा, पोर्नाळा, सुणिया, मोरी, बजानिया, कंकोडिया, सलाट इत्यादि आणखीही पोटभेद आहेत. यांपैकीं तळबदा आणि पोर्नाळा इतर पोटभेदांशीं रोटीव्यवहार करीत नाहींत. इतर पोटभेदांचा परस्पर रोटीव्यवहार होतो, पण बेटीव्यवहार होत नाहीं.

वाघ्र्यांत कुळें नाहींत. एकाच खेड्यांत राहणाऱ्यांचा व एकच कुलदैवत असणारांचा शरीरसंबंध होत नाहीं. तसेंच ज्यांच्यांत नात्याचा कांहीं संबंध आहे त्यांचाही शरीरसंबंध होत नाहीं. लग्नें बहुधा वयांत आल्यानंतर करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. विधवेस मृत पतीच्या धाकट्या भावाशीं लग्न करतां येतें. सोडचिठ्ठी देतां येते.

कांहीं वाघ्री बिजपंथी आहेत. ते मुख्यत्वेंकरून मेलडी, विहात, कालिका, खोडियार, हडकाई, विशोत्री आणि सेमल माता ह्या देवी व हनुमान देव ह्यांस भजतात. त्यांचे उपाध्ये ( भुवा ) त्यांच्याच जातीचे असतात. ते मृतांस बहुधा पुरतात. श्राद्ध बहुधा करीत नाहींत.

ते मांस खातात व दारू पितात. ते आपल्याहून उच्च जातीच्या लोकांस आपल्या जातींत घेतात. जातींत घेतल्या जाणाऱ्या मनुष्यास त्यांस जेवण द्यावें लागतें.

वाघ्री लोक अट्टल चोर आहेत अशी त्यांची प्रसिद्धि आहे.

**वाघ्री**—टकारी जातीचें दुसरें नांव.

**वाणी**—किंवा वाणिया ह्या जातींत व्यापार करणाऱ्या बहुतेक जातींचा समावेश होतो. दक्षिण महाराष्ट्र आणि कर्नाटकांतील व्यापारी मात्र लिंगायत

बांजिग असतात. वाणी, वाणिया किंवा बांजिग हें धंदेवाचक नांव असल्यामुळें ज्यांचा धंदा व्यापार करण्याचा आहे त्या सर्व जातींस तें लावण्यांत येतें. वरील तिन्ही शब्द संस्कृत ' वणिव्ह ' म्हणजे 'व्यापारी' ह्या शब्दावरून निघाले आहेत. वाणिया हा गुजराथी शब्द आहे, वाणी हा मराठी शब्द आहे आणि बांजिग हा कानडी शब्द आहे.

वाणी आपण चातुर्वर्ण्यांपैकीं वैश्य आहों असें म्हणतात. गुजराथी वाणी प्राचीन वैश्यांचे वंशज असावे असें दिसतें. मराठा वाण्यांसंबंधीं तसें निश्चित विधान करतां येत नाहीं. त्यांची उत्पत्ति मराठ्यांपासून झाली असावी असें दिसतें.

**गुजराथी वाणी**—गुजराथी वाण्यांत पुढील पोटजातींचा समावेश होतो:—

( १ ) अगरवाल, ( २ ) अगर्या, ( ३ ) उंबड, हुंबड किंवा हुमड, ( ४ ) ओस्वाल, ( ५ ) कपोल ( कपोला, ) ( ६ ) कत्रिवाल ( खदरवाल ) ( ७ ), कराड, ( ८ ) खदायता, ( ९ ) खंडेवाल, ( १० ) गुर्जर, ( गुजर ), ( ११ ) गोवळवाल ( गोयलवाल ), ( १२ ) छेब्रोदा, ( १३ ) जेलवाल ( जैलवाल ), ( १४ ) झारोला ( झारोरा ) ( १५ ), दसरा, ( १६ ) दिंडू ( दिडू ), ( १७ ) देशावळ ( दिशावळ ) ( १८ ) नर्सिपुरा, ( १९ ) नागर, ( २० ) नागोरी, नाघोरी किंवा नाग्री, ( २१ ) नोदारा ( नंदोरा ), ( २२ ) नेमा ( निमा ), ( २३ ) पलिवाल ( पलेवाल ), ( २४ ) पुष्कर्वाल, ( २५ ) पोर्वाड ( पोर्वाल ), ( २६ ) बगरिया ( बगडा ), ( २७ ) बाज, ( २८ ) मड, ( २९ ) मेदोरा ( मेदेरा ), ( ३० ) मेवाडा, ( ३१ ) मोडिया, ( ३२ ) मोढ, ( ३३ ) येरोला, ( ३४ ) लाड, ( ३५ ) लाडसक्का, ( ३६ ) वायडा, ( ३७ ) श्रीमाळी, ( ३८ ) सर्वियई ( सर्विजा ) ( ३९ ) सोरठिया, ( ४० ) हर्सोला, ( हर्सोरा ).

वर दिलेल्या पोटजातींपैकीं पुष्कळ पोटजातींत हिंदु आणि जैन असे दोन दोन पोटभेद आहेत. हिंदु पोटभेदास मेश्री आणि जैनास श्रावक असें म्हणतात. पोर्वाड आणि श्रीमाळींत जैनांचा भरणा जास्त आहे आणि उम्मड आणि

ओस्वाल तर सर्वस्वी जैन आहेत. वरील पोटजातींपैकीं पुष्कळांत ' विसा ' म्हणजे ' वीस ' आणि ' दसा ' म्हणजे ' दहा ' असे आणखी पोटभेद आहेत. ज्यांची संख्या जास्त त्यांस ' विसा ' आणि ज्यांची संख्या कमी त्यांस 'दसा ' हें नांव पडलें असावें. ह्या दोहोंशिवाय ' पंचा ' म्हणजे ' पांच ' असा आणखीही एक पोटभेद कांहीं पोटजातींत आढळतो. त्यांस हलकें समजण्यांत येतें आणि इतर वाणी त्यांच्याशीं अन्नव्यवहार करीत नाहींत. सर्व मुख्य पोटजातींचा ( दसा, विसा आणि स्थानिक पोटभेदांसुद्धां ) परस्पर रोटीव्यवहार होतो. पण बेटीव्यवहार होत नाहीं. वाण्यांच्या निरनिराळ्या पोटजातींतील श्रावक आणि मेश्री ह्या पोटभेदांचा जो निकट संबंध आहे, त्यावरून गुजराथेंत जातिबंधनापेक्षां सामाजिक बंधनाचें महत्त्व विशेष आहे ही गोष्ट निदर्शनास येते. उत्तर गुजराथ, कच्छ आणि काठेवाडांत श्रावक आणि मेश्री वाण्यांचा रोटीव्यवहार होतो. अलीकडे पंथभेदाचें प्राबल्य जें वाढलें आहे तत्पूर्वी त्यांच्यांत वारंवार बेटीव्यवहारही होत असे. परंतु गुजराथेंत विवाहनिर्बंधाची मजल जात अथवा पोटजातीपर्यंतच थांबलेली नाहीं. अजूनही ही फूट चालूच आहे. प्रत्येक पोटजातींत खेड्यांचे अथवा शहरांचे विवाहसंघही स्थापन झाले आहेत. त्यांस ' एकदा ' किंवा ' गोल ' असें म्हणतात. प्रत्येक गोलांतील मुलीचें त्याच गोलांतील मुलाबरोबर लग्न केलें पाहिजे असा निर्बंध आहे. शहरांत राहणारे लोक आपल्या मुली खेड्यांतील गांवढळ लोकांच्या मुलांस देण्यास तयार नसत. परंतु त्यांच्या मुली आपल्या मुलांस करण्यास मात्र त्यांची हरकत नसे, आणि खेड्यांतील लोकही शहरांत आपल्या मुली विशेष सुखांत व चैनींत पडतील अशा समजुतीनें होतां होईल तों शहरांतील मुलांसच देत असत. ह्याचा परिणाम असा झाला कीं, खेड्यांतील मुलांस मुली मिळेनाशा झाल्या. ह्या गोष्टीस आळा घालण्यासाठीं गोल प्रथमतः निर्माण करण्यांत आले. पण हे गोलही स्थिर स्वरूपाचे नाहींत. त्यांच्यांत वारंवार बदल होतो. एका गोलांतील खेडीं दुसऱ्या गोलांत सामील करण्यांत येतात, तसेंच कांहीं गोलांतील खेडीं कमी करण्यांतही येतात. एखाद्या मुलास त्याच्या गोलांत मुलगी न मिळाल्यास

दुसऱ्या गोलांतील पंचांच्या परवानगीनें त्या गोलांतील मुलीशीं लग्न करतां येतें. कधीं कधीं त्याबद्दल पंचांस त्यांस दंड अथवा फी म्हणून कांहीं रकम द्यावी लागते इतकेंच. ह्यावरून हे गोल केवळ अगदींच दुर्लंघ्य नाहींत असें दिसून येईल. एखाद्यानें आपली मुलगी दुसऱ्या गोलांत दिल्यामुळें त्यास जातिबहिष्कृत केल्यास त्यास ह्या दुसऱ्या गोलांत थारा मिळतो. मात्र त्या गोलांत सामील होण्याकरितां कधीं कधीं त्यास त्या गोलांतील लोकांस जेवण द्यावें लागतें.

मुलींचीं लग्नें बहुधा सात ते अकरा वर्षांच्या दरम्यान करितात. कपोल वाण्यांत ही मर्यादा सोळा वर्षेपर्यंतही लांबविली जाते. कच्छमधील लोटा ह्या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या ओस्वालांत आणि कांहीं पंचांत विधवाविवाह रूढ आहे. इतर वाण्यांत त्यास सक्त प्रतिबंध आहे.

गुजराथी वाणी वल्लभाचार्य पंथाचे कट्टे अनुयायी आहेत. ते आपल्या पंथाच्या महाराजास अत्यंत पूज्य मानतात. पण अलीकडे शिक्षणाचा प्रसार वाढल्यामुळें त्याचें महत्त्व दिवसेंदिवस कमी होऊं लागलें आहे. ब्राह्मण ज्याप्रमाणें जानवीं घालतात त्याप्रमाणें वाण्यांतील पुरुष व स्त्रियाही तुळशीच्या मण्यांची कंठी गळ्यांत घालतात. फक्त अगरवाल आणि बमनागर वाणी जानवीं घालतात. ते दररोज वल्लभाचार्य संप्रदायाच्या देवळांत दर्शनास जातात, व घरींही देवाची पूजा करितात. पूर्वी दर्शन रोज घेतलेंच पाहिजे अशी समजूत असे. त्यामुळें दर्शनास प्रतिबंध करण्याची धमकी देऊन महाराजांस त्यांच्यावर बरीच सत्ता गाजवितां येत असे. परंतु अलीकडे दर्शनाचें काम सेवेनें ( घरांतील पूजेनें ) भागतें अशी समजूत प्रचलित झाल्यामुळें, महाराजांच्या ह्या सत्तेस बराच आळा बसला आहे. गुजराथी वाण्यांचे उपाध्ये त्यांच्याच नांवाचे ब्राह्मण असतात. त्यांचे धार्मिक विधि बहुतांशीं ब्राह्मणांप्रमाणेंच आहेत.

वाणी कट्टे शाकाहारी आहेत. त्यांच्यांत दारू पिण्यास प्रतिबंध आहे. ते फक्त ब्राह्मणांच्याच हातचें अन्न खातात.

**श्रावक वाणी**—वर सांगितल्याप्रमाणें जैन असून ते श्वेतांबर आणि दिगंबर ह्या दोन मुख्य जैन पंथांचे अनुयायी आहेत. जैनांचा ढुंडिया म्हणून एक तिसराही पंथ आहे. त्याचे अनुयायी मुख्यतः काठेवाडांत आढळतात. श्रावक वाण्यांतील लग्नाचे निर्बंध मेश्री वाण्यांप्रमाणेंच आहेत. मात्र त्यांच्या पोटजातींतील एकाच नांवाच्या गौण पोटभेदांत कधीं कधीं लग्नें होतात. जसें, दसा श्रीमाळ्यांचें दसा पोर्वाडांशीं लग्न होऊं शकतें.

श्रावक वाण्यांचे धर्मविधि मेश्री वाण्यांप्रमाणेंच आहेत. मात्र त्यांच्यांत श्राद्धें करीत नाहींत.

वाण्यांच्या मुख्य पोटजातींचें पुढें संक्षिप्त वर्णन दिलें आहे.

**अगरवाल**—मुख्यत्वेंकरून उत्तर गुजराथेंत आढळतात. उज्जनीच्या ईशान्येस चाळीस मैलांवर असलेल्या अगर नांवाच्या जुन्या शहरावरून त्यांचें नांव पडलेलें आहे. राजपुतान्यांत त्यांची संख्या मोठी आहे, आणि तेथूनच ते गुजराथेंत आले असें सांगतात. त्यांच्यांत विसा आणि दसा असे दोन पोटभेद आहेत. त्यांचे उपाध्ये अगरवाल ब्राह्मण असतात.

**उंबड**—मुख्यत्वेंकरून उत्तर गुजराथेंत आढळतात. त्यांच्यांत विसा आणि दसा असे दोन पोटभेद आहेत. त्यांचा परस्पर रोटीव्यवहार होतो, पण बेटीव्यवहार होत नाहीं. हुमडा नांवाच्या गुरूनें ह्या जातीची स्थापना केली असें सांगतात.

**ओसवाल**—गुजराथेंत सर्वत्र आढळतात. त्यांच्या उत्पत्तीविषयीं अशी हकीगत सांगतात कीं, देसल नांवाचा श्रीमाळचा राजा आपल्या राजधानींत लक्षाधीशांशिवाय कोणासच राहूं देत नसे. ह्या लक्षाधीशांत 'राड' नांवाचा एक श्रीमाळी वाणी असून त्याला 'साड' नांवाचा एक भाऊ होता. त्याच्याजवळ राजधानींत रहाण्यापुरता पैसा नसल्यामुळें त्यानें आपल्या भावाजवळ पैशांची मदत मागितली. ती त्यानें त्यास न दिल्यामुळें तो श्रीमाळच्या राजाच्या जयचंद नांवाच्या मुलाकडे गेला. ह्या मुलाचें व राजाचें पटत नसल्यामुळें तो नेहमीं असंतुष्ट असे. त्याचें मन वळवून त्यास आणि पुष्कळ श्रीमाळ्यांस

आणि रजपुतांस बरोबर घेऊन त्यानें श्रीमाळ सोडलें आणि ते सर्व मंडोवाड येथें स्थायिक होऊन त्यांनीं त्या ठिकाणास 'ओस' म्हणजे 'सरहद्द' असें नांव दिलें. त्यांच्यांत पुष्कळ भाविक शैव रजपूत होते. तेथें रतनसुरी नांवाच्या एका जैन साधूनें कांहीं चमत्कार करून जयचंदासुद्धां त्या सर्व रहिवाशांच्या मनांत जैनधर्माबद्दल पूज्यबुद्धि उत्पन्न केली. तेव्हां त्या सर्वांनीं जैन धर्माचा स्वीकार केला. रतनसुरीनें त्यांस ओस्वाल हें नांव देऊन त्यांची एक स्वतंत्रच जात बनविली. ह्या गोष्टींत बरेंच तथ्य दिसतें. कारण ओस्वालांत बरींच रजपूत कुळांचीं नांवें आढळतात.

ओस्वालांत दसा, विसा आणि पंचा किंवा लेटा असे तीन पोटभेद आहेत. ह्यांत पंचांचा दर्जा सर्वांत हलका आहे. त्यांच्यांत विधवाविवाह रूढ आहे. त्यामुळें श्रावक किंवा मेश्री वाणी त्यांच्याशीं अन्नव्यवहार करीत नाहींत. ओस्वालांची कुलदेवी मारवाडांत आहे. तिचें नांव ओशिया. दसा ओस्वालांचा दसा श्रीमाळी आणि दसा पोर्वाडांशीं शरीरसंबंध होतो, पण दसा आणि विसा ओस्वालांचा जरी अन्नव्यवहार होतो तरी शरीरसंबंध होत नाहीं. ओस्वालांचे उपाध्ये औदिच ब्राह्मण असतात.

**कपोल**—मुख्यत्वेंकरून काठेवाडांत आढळतात. त्यांच्यांत दसा, आणि विसा हे पोटभेद नाहींत. त्यांचे उपाध्ये कंडोलिया ब्राह्मण असतात. त्यांची कुलदेवी समुद्री माता. तिचें मुख्य पवित्र स्थान ध्रांगध्रामधील सुंद्री नांवाच्या खेड्यांत आहे. पुष्कळ कपोल वाणी आज १५०–२०० वर्षे मुंबईंत स्थायिक झाले असून तेथें त्यांचें फार वजन आहे.

**कराड**—मुख्यत्वेंकरून कच्छमध्यें आढळतात. ते मूळ मारवाडचे असून तेथून गुजराथ, काठेवाड व कच्छ येथें आले असें सांगतात. कच्छमधील कंठीकोटच्या एका राजाचा, त्याचा मेहुणा घेडियाचा राजा धरण, ह्यानें खून केला. त्या वेळीं त्याचा मुलगा फूल ह्यास अज आणि अंगोरे ह्या दोन मेश्री वाण्यांनीं आश्रय दिला. फूल जेव्हां वयांत आला तेव्हां त्यानें अज, अंगोरे आणि त्यांची वहीण बोलाडी यांस आपल्या दरबारांत बोलावून आणिलें आणि त्या दोन्ही भावांनीं त्यास आश्रय दिला होता त्याच्या स्मरणार्थ

आपल्या दोन किल्ल्यांस त्यांचीं नांवें दिलीं. ही गोष्ट इ. स. ९०७ च्या सुमारास घडली असें सांगतात. पुढें अज आणि अंगोरे ह्यांचें आपल्या जातींतील लोकांबरोबर भांडण झालें आणि करार मोडून त्यांनीं आपली एक नवीनच जात बनविली. हेच कराड वाणी होत. त्यांनीं करार मोडला म्हणून त्यांस कराड हें नांव पडलें असें म्हणतात.

कराड वाण्यांत पुष्कळ पोटभेद आहेत. त्यांत बडद, ध्रोण, खोंभडिया, कुर्वा, मान्दन, रबडिया आणि बितारिया हे मुख्य आहेत. ह्या जातीची लोकसंख्या अगदीं कमी झाली असल्यामुळें त्यांनीं स्वतःच्या जातींत लग्न करूं नये असा निर्बंध घालण्यांत आलेला आहे. त्यांनीं दसा ओस्वाल वाण्यांच्या मुलींबरोबरच लग्न केलें पाहिजे असा नियम आहे. ते जरी हिंदु आहेत तरी दसा ओस्वाल वाण्याशीं जडलेल्या त्यांच्या संबंधामुळें त्यांच्यापैकीं कांहीं जैनांच्या श्वेतांबर आणि दिगंबर पंथाचे अनुयायी बनले आहेत. तरीही त्या सर्वांची शिवाची भक्ति करण्याकडे प्रवृत्ति आहे. इतर बाबतींत त्यांचे आचारविचार इतर वाण्यांप्रमाणेंच आहेत.

**खदायता**—गुजराथेंत सर्वत्र आढळतात. अहमदाबाद जिल्ह्यांतील खदात नांवाच्या गांवावरून त्यांस खदायता हें नांव पडलेलें आहे. त्यांच्यांत दसा आणि विसा असे दोन पोटभेद आहेत. त्यांचा कुलदेव बडोदें संस्थानांत विजापुराजवळील खदात–महुडी गांवाचा कोटयारकेश्वर होय. त्यांचे उपाध्ये खदायता ब्राह्मण असतात. खदायता वाणी हे नागर वाण्यांचीच एक शाखा आहे असें म्हणतात.

**गुर्जर**—किंवा गुजर मुख्यत्वेंकरून दक्षिण गुजराथेंत, अहमदाबाद आणि भडोच जिल्ह्यांत आढळतात. इतर सर्व वाण्यांपूर्वीं गुजराथेंत हे स्थायिक झाले असें म्हणतात. हे विशेषतः कारकुनी आणि व्यापार करितात; पण कांहीं इनाम जमिनीचे मालकही आहेत. ह्या जमिनी त्यांस त्यांनीं त्या प्रांतांतील जमिनी लागवडीस आणल्या म्हणून इनाम देण्यांत आल्या असें म्हणतात. गुजर वाणी मूळ रजपूत होते असें दिसतें. त्यांतील कांहीं लोक चावडा, परमार आणि सोळंकी ह्या नांवांचे असून ते अजूनपर्यंत रजपूतच राहिले आहेत.

इसवी सनाच्या सातव्या शतकांत उत्तर गुजराथ आणि भडोचवर ज्या गुर्जर राजांचा अंमल होता ते यांच्यापैकींच होते.

गुजर वाण्यांत पूर्वीं दसा आणि विसा असे दोन पोटभेद होते. विसांची संख्या दिवसेंदिवस फारच कमी होऊं लागल्यामुळें ते दसांत सामील झाले आहेत. त्यांचे उपाध्ये श्रीमाळी ब्राह्मण असतात.

**झारोला**—किंवा झालोरा मुख्यत्वेंकरून बडोद्यांत आणि पूर्व गुजराथेंत आढळतात. मारवाडांतील प्रसिद्ध किल्ला आणि व्यापारी पेठ जी झालोर त्यावरून त्यांस झालोरा हें नांव पडलेलें आहे. सतराव्या शतकांत गुजराथेची उत्तर हद्द येथेंच संपत असे. झारोलांत विसा, दसा, आणि पंचा असे तीन पोटभेद आहेत. विसा आणि दसा यांचा रोटीव्यवहार होतो, पण बेटीव्यवहार होत नाहीं. पंचा ही एक अगदीं निराळीच पोटजात आहे. झालोरांचे उपाध्ये झालोरा ब्राह्मण असतात.

**दिड**—मुख्यत्वेंकरून सुरतेंत आढळतात. तीनशें वर्षांपूर्वीं सुरतेचा व्यापार जेव्हां भरभराटींत होता तेव्हां ते मारवाडाहून सुरतेस आले असें म्हणतात. मारवाडांतील दिंडवाना ह्या शहरावरून त्यांस दिडू हें नांव पडलेलें आहे. त्यांच्यांत दिडू आणि नाघोरी असे दोन पोटभेद आहेत. त्यांचा परस्पर रोटी-बेटीव्यवहार होतो. त्यांचे उपाध्ये श्रीमाळी ब्राह्मण असतात.

**देशावळ**—मुख्यत्वेंकरून उत्तर गुजराथेंत आढळतात. दीसा ह्या प्राचीन शहरावरून त्यांस देशावळ हें नांव पडलेलें आहे. त्यांच्यांत विसा, दसा आणि पंचा असे तीन पोटभेद आहेत. दसा आणि विसा यांचा परस्पर रोटीव्यवहार होतो, पण बेटीव्यवहार होत नाहीं. पंचा हा पोटभेद अगदीं स्वतंत्र आहे. दसांत अहमदाबादी, सुरती आणि घोघारी असे आणखी पोटभेद आहेत. सुरती आणि अहमदाबादी यांच्यांत कधीं कधीं लग्नें होतात. पण त्याबद्दल त्यांस जातीस दंड द्यावा लागतो. देशावळांचे उपाध्ये देशावळ ब्राह्मण असतात.

**नर्सिपुरा**—मुख्यत्वेंकरून बडोद्यांत आढळतात. पालनपुरांतील नर्सिपूर गांवावरून त्यांस नर्सिपुरा हें नांव पडलेलें आहे असें सांगतात. त्यांच्यांतील

कांहीं लोक वैष्णव व कांहीं जैन आहेत. त्यांचे उपाध्ये निरनिराळ्या जातींचे गुजराथी ब्राह्मण असतात.

**नागर**--गुजराथेंत सर्वत्र आढळतात. नागर ब्राह्मणांप्रमाणें तेही आपलें मूलस्थान वडनगर आहे असें म्हणतात. त्यांच्यांत दसा आणि विसा असे दोन पोटभेद आहेत. त्यांचे उपाध्ये नागर ब्राह्मण असतात. त्यांचा कुलदेव वडनगरचा हटकेश्वर होय. नागरांत बम नागर नांवाचा एक लहानसा पोटभेद आहे. ते आपण धार्मिक आचार अगदीं कडकपणें पाळतों असें म्हणतात आणि इतर वाण्यांशीं अन्नव्यवहार करीत नाहींत. ते शैवमतानुयायी असून जानवीं घालतात.

**नंदोरा**—सुरतेंत आणि रेवाकांठांत आढळतात. राजपिंपळाची राजधानी नांदोड ह्या शहरावरून त्यास नंदोरा हें नांव पडलेलें आहे. त्यांचे उपाध्ये नंदोरा ब्राह्मण असतात. त्यांचा कुलदेव नांदोडचा नंदिकेश्वर महादेव.

**निमा**—मुख्यत्वेंकरून पंचमहालांत आढळतात. ते दोनशें वर्षांपूर्वी मार-वाडांतून गुजराथेंत आले असें म्हणतात. त्यांच्यांत दसा आणि विसा असे दोन पोटभेद आहेत. त्यांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. विसांत वैष्णव आहेत आणि जैनही आहेत. दसा वल्लभाचार्य पंथाचे अनुयायी आहेत. निमांचे उपाध्ये उदांबरा ब्राह्मण असतात. त्यांचा कुलदेव ईदरजवळील शाम-ळाजी. दसांमधील लग्नें प्रत्येक दुसऱ्या वर्षीं जात ठरवील त्याच दिवशीं होतात.

**पोर्वाड**—गुजराथेंत सर्वत्र आढळतात. दक्षिण मारवाडची जुनी राज-धानी जी श्रीमाळ त्याजवळील पोर्वाड नांवाच्या भागावरून त्यांस पोर्वाड हें नांव पडलेलें आहे. त्यांच्यांत विसा आणि दसा असे दोन पोटभेद आहेत. त्यांचे उपाध्ये श्रीमाळी ब्राह्मण असतात. त्यांची कुलदेवता श्रीमाळची श्री अथवा महालक्ष्मी. त्यांच्यांत कांहीं लोक वैष्णव आहेत व कांहीं जैन आहेत.

**मेवाडा**—मुख्यतः बडोदें, खेडा आणि सुरत येथें आढळतात. ते मेवा-डांतून आले आहेत असें म्हणतात. त्यांच्यांत विसा आणि दसा असे दोन पोटभेद आहेत. त्यांचे उपाध्ये मेवाडा ब्राह्मण असतात. त्यांच्यांतील कांहीं लोक वल्लभाचार्य पंथाचे वैष्णव व कांहीं जैन आहेत.

**मोढ**—गुजराथेंत सर्वत्र आढळतात. पण त्यांची वस्ती उत्तर गुजराथेंत आणि काठेवाडांत जास्त आहे. वात्रक नदीवरील मोढेरा गांवावरून त्यांस मोढ हें नांव पडलेलें आहे. त्यांच्यांत अदालजा, घोघवा आणि मांडलिया असे तीन पोटभेद आहेत. खुद्द गुजराथेंत ह्या तिन्ही पोटभेदांत परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. परंतु काठेवाड आणि कच्छमध्यें घोघवा आणि अदालजा यांचा परस्पर बेटीव्यवहार होतो. त्यांच्यांत दसा आणि विसा हे दोन पोटभेद आहेत. मोढ वाण्यांच्या लग्नांत तरवार आणि चक्र लागतात. तरवार लागते यावरून ते मूळ रजपूत असावे असें दिसतें; परंतु रजपूत आडनांवें त्यांच्यांत आढळत नाहींत. मोढ वाण्यांचे उपाध्ये मोढ ब्राह्मण आहेत आणि त्यांची कुलदेवता मोढेरा येथें आहे. व्यापाराशिवाय मोढ वाण्यांनीं देशी संस्थानांत मोठमोठ्या हुद्यांवर उत्तम प्रकारें काम केलें आहे. गुजराथेंतील मोढघांची नांवाचे तेली मूळ मोढ वाणी होते. ते तेल काढण्याचा आणि विकण्याचा धंदा करूं लागल्यापासून मोढ वाण्यांपासून वेगळे झाले.

**लाड**—मुख्यत्वेंकरून बडोदें, भडोच, डभोई आणि सुरत येथें आढळतात. दक्षिण गुजराथेचें जुनें नांव जें लाटदेश त्यावरून त्यांस लाड हें नांव पडलेलें आहे. त्यांच्यांत विसा आणि दसा हे दोन पोटभेद आहेत. त्यांचे उपाध्ये खेडावाळ ब्राह्मण असतात. त्यांची कुलदेवी पेटलादजवळील अशनई येथील आशापुरी होय.

**श्रीमाळी**—गुजराथेंत सर्वत्र आढळतात. त्यांच्यांत विसा, दसा आणि लाडवा असे तीन पोटभेद आहेत. विसा श्रीमाळ्यांत अहमदाबादी, कठोरिया, पटणी, सोरठिया, तलबदा आणि थराडिया असे पोटभेद असून दसांत होरासाथ, चनापहुआ आणि इडदिया असे तीन पोटभेद आहेत. लाडवांत पोटभेद नाहींत. हे तिन्ही मुख्य पोटभेद व त्यांचे पोटभेद यांचा परस्पर रोटीव्यवहार होतो, पण बेटीव्यवहार होत नाहीं. उत्तर गुजराथेंत मेश्री दसा श्रीमाळी आणि श्रावक दसा श्रीमाळी यांचा लग्नव्यवहार होतो. श्रीमाळी वाण्यांचे उपाध्ये श्रीमाळी ब्राह्मण असतात. दसा आणि लाडवा श्रीमाळ्यांची कुलदेवी महालक्ष्मी. विसांच्या महालक्ष्मी आणि सचाई अशा दोन कुलदेवी आहेत.

**हर्सोला**—मुख्यत्वेंकरून उत्तर गुजराथेंत आढळतात. अहमदाबादेपासून तीस मैलांवर असलेल्या हर्सोल ह्या गांवावरून त्यांस हर्सोला हें नांव पडलेलें आहे. त्यांचे उपाध्ये हर्सोला ब्राह्मण असतात.

**मराठा वाणी**—मराठा वाण्यांत (१) बावकुले, (२) कठर, (३) खरोटे (४) कुडाळे, (५) कुलूम, कुणबी किंवा मराठा, (६) नेवे, (७) पाटणे आणि (८) संगमेश्वरी अशा आठ पोटजाती आहेत. त्यांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं.

**बावकुले**—फक्त कारवारांत आढळतात. ते कोंकणी भाषा बोलतात आणि त्यांच्या कुलदेवताही गोव्यांत आहेत यावरून ते गोव्यांतून आले असावे असें दिसतें. मुलींचीं लग्नें बहुधा सात ते बारा आणि मुलांचीं चौदा ते अठरा वर्षांच्या दरम्यान करितात. लग्नाच्या दिवशीं मुलांस जानवें घालतात. विधवांचें केशवपन करितात. त्यांस पुनर्विवाह करण्यास प्रतिबंध आहे. कारवारांतील अंगडीचा शिवनाथ आणि गोव्यांतील माङ्गोळची म्हाळसा ह्या त्यांच्या कुलदेवता आहेत. त्यांचे उपाध्ये चित्पावन, कऱ्हाडे किंवा कर्नाटक ब्राह्मण असतात. ते मांस खातात, पण दारू पीत नाहींत. त्यांचे आचारविचार कुडाळे वाण्यांप्रमाणें आहेत.

**कठर**—पूर्व खानदेशांत जळगांव आणि नसिंदाबाद येथें आढळतात. त्यांच्यांत भारद्वाज, काश्यप, कौंडिण्य आणि वशिष्ठ इत्यादि गोत्रें आहेत. सगोत्रांत विवाह होत नाहीं. आतेबहिण, मामेबहिण किंवा मावसबहिणीशीं लग्न करितां येत नाहीं. विधवाविवाहास मोकळीक आहे. सोडचिठ्ठी देतां येते. त्यांचे धार्मिक विधि व आचार आजूबाजूच्या कुणब्यांप्रमाणेंच आहेत.

**कुडाळे**—मुख्यत्वेंकरून रत्नागिरी जिल्ह्याचा दक्षिण भाग, सावंतवाडी संस्थान, गोवें व कानडा जिल्हा येथें आढळतात. त्यांना बांदेकर वाणी असेंही म्हणतात. त्यांची वस्ती सावंतवाडी संस्थानांतील कुडाळ आणि बांदें या पेट्यांत विशेष असल्यामुळें, त्यांना कुडाळे आणि बांदेकर हीं नांवें पडलेलीं आहेत. ते आपणांस आर्य वैश्य किंवा आर्य दक्षिणी वैश्य असें म्हणवितात, पण लोकांत ते नुसत्या वाणी या नांवानेंच ओळखले जातात. त्यांचें

मूलस्थान गोव्यांत असावें असें दिसतें. तेथें ते शेती आणि व्यापार हे दोन्ही धंदे करीत. परंतु सावंतवाडी संस्थानांत आल्यानंतर त्यांनीं शेती सोडून दिली व फक्त व्यापारच करूं लागले. हाच त्यांचा हल्लींचा धंदा आहे. ते आपण वैश्य आहों असें म्हणतात. परंतु इ. स. १८५० पर्यंत सावंतवाडीस दरबारी श्राद्धाच्या वेळीं ते मराठ्यांच्या पंक्तीस जेवीत असत आणि कधीं कधीं मराठ्यांच्या मुलीं-बरोबर लग्नेंही करीत असत, ह्यावरून मुळांत त्यांचा आणि मराठ्यांचा एकच वंश होता असें दिसतें. तथापि येथें ही गोष्ट लक्ष्यांत ठेविली पाहिजे कीं, जरी ते मराठ्यांच्या मुली करीत असत तरी त्यांनीं आपल्या मुली मराठ्यांस कधींही दिलेल्या नाहींत.

कुडाळ्यांत अठरा गोत्रें आहेत. सगोत्रांचा विवाह होत नाहीं. आतेबहिणी-बरोबर अथवा मामेबहिणीबरोबर लग्न करितां येतें. मावसबहिणीबरोबर करतां येत नाहीं. मुलींचीं लग्नें बहुधा बाराव्या वर्षाच्या सुमारास करितात; मुलांचीं अठरा ते वीस वर्षांच्या दरम्यान करितात. विधवाविवाहास प्रतिबंध असून विधवांचें केशवपन करण्यांत येतें. सोडचिठ्ठी देतां येत नाहीं.

कुडाळे सर्व मुख्य देवांस व स्थानिक देवतांस भजतात. जरी ते आपणास वैश्य म्हणवितात तरी ते मुलांचें मौंजीबंधन करीत नाहींत. फक्त लग्नाच्या वेळीं कोणताच विधि न करितां जानवें घालतात. रत्नागिरी जिल्ह्यांत आणि सावंतवाडी संस्थानांत त्यांचे उपाध्ये चित्पावन आणि कऱ्हाडे ब्राह्मण असतात; कानडा जिल्ह्यांत हविक ब्राह्मण असतात.

ते मांस खातात, पण दारू पीत नाहींत.

**कुळूम**—कुणबी किंवा मराठा वाणी ही जात व्यापार करणाऱ्या मराठा कुणब्यांतून निर्माण झाली आहे. त्यांच्या चालीरीति मराठा कुणब्यांप्रमाणेंच आहेत.

**खरोटे**—मुख्यत्वेंकरून पूर्व खानदेशांतील जामनेर तालुक्यांत आढळतात. खरोटे शब्दचा अर्थ अनौरस असा असल्यामुळें ते आपणास लाड वाणी असें म्हणवितात. त्यांच्यांत भारद्वाज, गौतम, शांडिल्य आणि वशिष्ठ इत्यादि गोत्रें आहेत. त्यांचे रीतरिवाज कठर वाण्यांप्रमाणें आहेत.

**नेवे**—मुख्यत्वेंकरून खानदेश आणि नाशिक जिल्ह्यांत आढळतात. त्यांच्यांत बारा गोत्रें आहेत. स्वतःच्या गोत्राशिवाय मामाच्या गोत्रांतीलही मुलीशीं लग्न करितां येत नाहीं. ही गोष्ट शिवाय करून बाकी त्यांच्या चाली-रीति कठर वाण्यांप्रमाणेंच आहेत.

**पाटणे**—हे सातारा जिल्ह्यांत पाटण येथें विशेष आढळतात. ते कुलूम वाण्यांचीच एक शाखा असावी असें दिसतें. त्यांचे रीतरिवाज कुलूम वाण्यां-प्रमाणेंच आहेत.

**संगमेश्वरी**—मुख्यत्वेंकरून रत्नागिरी जिल्ह्यांत आढळतात. त्यांस संगमेश्वरी हें नांव त्या जिल्ह्यांतील संगमेश्वर ह्या गांवावरून पडलेलें आहे. त्यांच्यांत अनेक देवकें असून ज्यांचें देवक एकच असतें त्यांच्यांत शरीरसंबंध होत नाहीं. ह्या गोष्टीवरून ते येथील मूळ रहिवाशांपैकीं असावे असें दिसतें. त्यांच्यांतील मुख्य आडनांवें व त्यांचीं देवकें पुढें दिलीं आहेतः—

| आडनांव | | | देवक. |
|---|---|---|---|
| १ बेंडखळे | ... | ... | मोराचा पंख. |
| २ चौधरी | ... | ... | पोंवळें. |
| ३ चिंगले | ... | ... | शंख. |
| ४ गंधी | ... | ... | तुळस. |
| ५ गांगण | ... | ... | इस्वोगर. |
| ६ खेडेकर | ... | ... | नाग. |
| ७ लगमकर | ... | ... | उंबर. |
| ८ रेडिज | ... | ... | कळंब. |
| ९ सडविलकर | ... | ... | कोचा. |
| १० शेटे | ... | ... | करंज. |
| ११ टकले | ... | ... | शिंदी. |

मामेबहिणीशीं लग्न करितां येतें, पण आतेबहिणीशीं अथवा मावसबहि-णीशीं करितां येत नाहीं. मुलींचीं लग्नें बहुधा दहा ते तेरा व मुलांचीं पंधरा ते पंचविसांच्या दरम्यान करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे, पण

अविवाहितास विधवेशीं लग्न करितां येत नाहीं. संगमेश्वरी वाण्यांत सप्तपदी करीत नाहींत. बाकी सर्व बाबतींत त्यांचें कुडाळे वाण्यांशीं साम्य आहे.

**वादी**—मुख्यत्वेंकरून काठेवाडांत आढळतात. ते साप बाळगतात आणि जादूचे खेळ करीत गांवोंगांव भटकत असतात.

**वारली**—मुख्यत्वेंकरून ठाणें जिल्हांत आढळतात. ते तेथील मूळ रहिवाशांपैकीं असून हिंदु धर्माचा त्यांच्यावर फारच थोडा परिणाम झालेला दिसतो. त्यांना उपाध्ये नसतात आणि मूळ रहिवाशांच्या पुष्कळ जातींप्रमाणें रोगांची उत्पत्ति भुतांपासून होते अशी त्यांची समजूत आहे. ते वर्षांतील बहुतेक दिवस खेड्यांत किंवा वाड्यांत वस्ती करून राहतात. परंतु त्यांच्यापैकीं कांहीं लोक पावसाळ्याचे दिवस खेरीज करून इतर दिवसांत मजुरीच्या शोधार्थ बऱ्याच लांबवर जात असतात. कुटुंबांत मृत्यु झाला म्हणजे (विशेषत: तो मृत्यु जर देवीमुळें अथवा पटकीमुळें झाला असेल) तें सर्व कुटुंब गांव सोडून दुसऱ्या गांवीं जाऊन राहतें. ठाकूर कातकरी वगैरे इतर जंगली जातींप्रमाणेंच वारल्यांनाही विवक्षित असा कांहींच धंदा नसतो. ते बहुधा गवत आणि जळाऊ लांकूड-गोळा करून विकतात व जंगलांत शिकार करतात. पावसाळ्यांत कांहीं जणांना शेतांतून काम मिळतें.

वारल्यांत शुद्ध, मुर्डे, डावर आणि निहिर असे चार पोटभेद आहेत. त्यांपैकीं मुर्डे आणि डावर यांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होतो. त्यांच्यांत अनेक कुळें आहेत. एकाच कुळांतील स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. त्यांच्या लग्नास विशेष महिना, दिवस अथवा मुहूर्त लागत नाहीं. लग्न जातींतील एखादी म्हातारी बाई चालविते. तिला डवलेरी म्हणतात. गुजराथेंतील वारल्यांत खंडाळिओचा प्रघात आहे. ह्या प्रघाताप्रमाणें लग्न करणारास नवरीच्या आईबापांची कांहीं मुदतपर्यंत नोकरी करावी लागते. विधवाविवाह आणि सोडचिठ्ठी यांस मोकळीक आहे.

वारल्यांचे मुख्य देव वाघ्या आणि हिरवा. ते खंडोबा आणि बहिरोबाचीही पूजा करितात असें सांगतात. अंगावर जखम असतांना ज्यांस मृत्यु

त्यांस ते पुरतात, इतरांस जाळतात. ज्यांची स्थिति बरी असते ते वर्षाच्या अखेरीस जातींतील लोकांस जेवण देतात.

ते मांस खातात व दारू पितात.

**वारिक**—न्हावी जातीचें दुसरें नांव.

**वालंद**—न्हावी जातीचें दुसरें नांव.

**वाल्मिक**—बेरड जातीचें दुसरें नांव.

**वावडो चसको**–पहा–न्हावी.

**वासुदेव**—ही एक धार्मिक भिक्षेकऱ्यांची गांवोगांव भटकणारी जात असून ते दक्षिण महाराष्ट्रांत सर्वत्र आढळतात. एका ब्राह्मण ज्योतिषास कुणबी बाईपासून झालेल्या सहदेव नांवाच्या मुलापासून आपली उत्पत्ति झाली आहे असें ते सांगतात. ते मराठा कुणब्यांप्रमाणें दिसतात आणि त्यांचे रीतरिवाजही त्यांच्याप्रमाणेंच आहेत.

ते भिक्षा मागून उदरनिर्वाह करितात. मुलगा भिक्षा मागण्याजोगा झाला म्हणजे त्यास भिक्षा मागण्याची दीक्षा देण्याचा समारंभ करितात. ते अगदीं पहाटेस उठून टाळ चिपळ्या वाजवीत व गाणीं गात दारोदार भिक्षा मागत हिंडतात. कांहीं वासुदेव शेतीही करितात.

**वांझा**—मुख्यत्वेंकरून काठेवाडांत आढळतात. परशुरामानें जेव्हां क्षत्रियांचा संहार आरंभिला तेव्हां कांहीं क्षत्रिय आपलें रक्षण करण्यासाठीं हिंगलाज मातेस शरण गेले. तिनें त्यांजकडून क्षात्रवृत्ति सोडून विणकऱ्यांचें काम करूं असें वचन घेऊन त्यांचें रक्षण केलें. पुढें ते विंध्याचल पर्वतावर गेले. तेथें तंतुपाल नांवाच्या ऋषीनें त्यांस विणण्याची कला शिकविली. वांझांच्या उत्पत्तीसंबंधी वरीलप्रमाणें दंतकथा प्रचलित आहे. आपण आणि ब्रह्मक्षत्री मूळचे एकाच वंशाचे आहों असेंही ते सांगतात. त्यांचीं नांवें वाण्यांप्रमाणें असतात आणि आडनांवें अथवा कुळें रजपुतांप्रमाणें असतात. ह्या गोष्टीवरून मुळांत त्यांचा ह्या दोन्ही जातींशीं कांहीं तरी संबंध असावा असें दिसतें.

एकाच कुळांत अथवा कुळांच्या विशिष्ट समुदायांत लग्न करितां येत नाहीं. आतेबहिण, मामेबहिण अथवा मावसबहिणीशीं लग्न करितां येत नाहीं. काठे-

वाडांतील वांझा काठेवाडाबाहेरील वांझांबरोबर लग्नें करीत नाहींत; कारण काठेवाडी वांझा मांस खात नसून बाहेरचे खातात. मुलींचीं लग्नें बहुधा बारा ते चौदा वर्षांच्या दरम्यान करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. बायकोशीं पटत नसेल अथवा ती दुराचारी असेल तर तिला सोडचिठ्ठी देतां येते. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रीस दुसरें लग्न करतां येतें.

वांझा कबीर आणि रामानंद पंथाचे अनुयायी आहेत. कांहीं रामदासी आहेत. त्यांचीं कुलदैवतें चामुंडा, पोथड, हर्शद, जगराई, चोरवाड, घुगरमल, कंकई, गंगाभवानी, आशापुरी आणि वाछडो हीं होत. त्यांचे उपाध्ये औदिच ब्राह्मण असतात.

वांझांचा परंपरागत धंदा कापड विणण्याचा आहे. कांहीं सुतारकाम करितात व कांहीं शेती करितात.

काठेवाडांतील वांझा मांस खात नाहींत, इतर ठिकाणचे खातात.

**वांसफोडा**—विंटोळिया जातीचें दुसरें नांव.

**विटोलाना**—विंटोळिया जातीचें दुसरें नांव.

**विंटोरिया**—विंटोळिया जातीचें दुसरें नांव.

**विंटोळिया**—मुख्यत्वेंकरून सुरत जिल्ह्यांत आढळतात. त्यांना वांसफोडा, पालवडा कोतवालिया, घांच कोतवालिया, विटोलाना, आणि विंटोरिया अशींही नांवें आहेत. ते आपल्या जातींत चोध्रा, दुबला, गामीट इत्यादि जातींच्या लोकांस घेतात, आणि याच जातींतून त्यांची जात निर्माण झाली असावी असें दिसतें.

चार पिढ्यांच्या आंत लग्नें होत नाहींत. विधवाविवाहास मोकळीक आहे. सोडचिठ्ठी देतां येते. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रीस पुनर्विवाहाच्या विधीनें दुसरें लग्न करतां येतें.

विंटोलिया सोनगढची देवाली, पंडरदेव, सिमारिओ आणि काकाबलिया यांस भजतात. त्यांचे सर्व धर्मविधि तेच चालवितात.

मृतांस जाळण्यांत अगर पुरण्यांत येतें. मृत्यूनंतर दोन महिन्यांनीं एका दगडास शेंदूर फांसून तो मृताच्या नांवानें एखाद्या झाडाखालीं ठेवितात.

विंटोलियांचा परंपरागत धंदा वेळूंच्या टोपल्या, सुपें व हांतऱ्या करण्याचा आहे. कांहीं शेती करितात व कांहीं मजुरी करितात.

विंटोलिया गोमांस खातात. ते दारूही पितात. त्यांच्या हातचें अन्न भंग्यांशिवाय कोणी खात नाहींत.

**विणकर**—देवांग जातीचें दुसरें नांव.

**विशोतर**—रबारी जातीचें दुसरें नांव.

**वीर**—दक्षिण महाराष्ट्रांत आढळतात. ते जेजुरीच्या खंडोबाचे भक्त असून त्याच्या नांवानें भिक्षा मागून उदरनिर्वाह करितात.

**वेगू**—भंसाळी जातीचें दुसरें नांव.

**वेल्लाळ**—फक्त पुण्यांतच आढळतात. ते मद्रासेंतून तेथें आलेले असून कारकुनी करून उदरनिर्वाह करितात.

**वेसकर**—महार जातीचें दुसरें नांव.

**वैती**—मुख्यत्वेंकरून ठाणें जिल्ह्यांत आढळतात. ते सोन कोळ्यांचीच एक शाखा असावी असें दिसतें. पण सोन कोळ्यांपेक्षां त्यांचा दर्जा हलका आहे. आपल्या जातीचा संस्थापक वाल्या कोळी होता असें त्यांपैकीं कित्येक लोक सांगतात. कित्येक म्हणतात त्याचें नांव वाल्या कोळी नसून कैवर्तक होतें. कुलाबा जिल्ह्यांतील चौल हें आपलें मूल स्थान आहे, असें ते मानितात.

लग्नें वयांत येण्यापूर्वी अथवा नंतरही करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. अविवाहितास विधवेशीं लग्न करतां येत नाहीं. सोडचिठ्ठी देतां येत नाहीं.

वैती मुख्यत्वेंकरून रामास आणि समुद्रास भजतात. त्यांचे उपाध्ये माध्यंदिन शाखेचे ययुर्वेदी देशस्थ ब्राह्मण असतात, पण अंत्यविधी जातीचे जाणते चालवितात.

त्यांचा परंपरागत धंदा मासे मारणें व खलाशांचें काम करणें हा होय. कांहीं शेती व मजुरीही करितात.

ते मांस खातात व दारू पितात.

**वैदू**—महाराष्ट्रांत सर्वत्र आढळतात. त्यांना गोल, गंडगीर आणि पंडित अशींहीं नांवें आहेत.

ही जात भोई, धनगर, कोळी, माळी, फुलमाळी इत्यादि अनेक जातीच्या मिश्रणापासून निर्माण झाली आहे असें दिसतें. आपण मूळ हैदराबादेकडील प्रदेशांतून आलों असें ते सांगतात. हें त्यांचें म्हणणें खरें दिसतें. कारण अजूनही त्यांचा धर्मगुरु हैदराबाद जवळील कुडरेमट्टी गांवचा एक धनगर आहे. तसेंच त्यांचा कुलदेव तिरुपतीचा व्यंकोबा आहे. पुष्कळ वैदू अजून घरीं तेलगू भाषाच बोलतात.

वैदूंत तीन मुख्य पोटभेद आहेत. ते असे:—झोळीवाले म्हणजे झोळी वापरणारे, दाढीचेवाले म्हणजे दाढी ठेवणारे आणि चटईवाले म्हणजे चटया विणणारे. दाढीचेवाल्यांत पुढें दिल्याप्रमाणें आणखी पोटभेद आहेत. (१) भोई, (२) धनगर, (३) खुटेकर, (४) कोळी, (५) माळी, (६) मिरजू माळी (७) फुलमाळी, (८) रावळ, (९) वागमुंडी, (१०) झिंगा. ह्या दहाही पोटभेदांचा परस्पर रोटीव्यवहार होतो, पण बेटीव्यवहार होत नाहीं.

वैदू सर्व महाराष्ट्रभर बाराही महिने औषधें विकीत व भिक्षा मागत गांवोगांव भटकत असतात. चटईवाल्यांच्या बायका चालतां चालतां चटयाही विणीत असतात आणि दाढीचेवाल्यांच्या बायका रांगोळी दळतात. कोणाही वदूस मजुरी करण्याची मनाई आहे. मजुरी करींत असलेला कोणी आढळला तर त्यास जातीबाहेर टाकतात, व जातीस जेवण दिल्याशिवाय त्यास पुनः जातींत घेत नाहींत.

वैदूंत आडनांवानें दर्शविलीं जाणारीं अनेक कुळें आहेत. एकाच कुळांतील लोकांचा लग्नसंबंध होत नाहीं. मुलींचीं लग्नें बहुधा वयांत आल्यानंतर करितात. मुलांचीं सोळा वर्षांच्या पुढें करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. सोडचिठ्ठी देतां येते. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रीस विधवाविवाहविधीनें दुसरें लग्न करतां येतें.

वैदू मुख्यत्वेंकरून व्यंकोबा, मरीअम्मा आणि मारुती यांस भजतात. ते लग्नाचा मुहूर्त मात्र ब्राह्मणाच्या विचारें ठरवितात. लग्नविधि न्हावी चालवितो, व इतर सर्व विधि जातीचे जाणते चालवितात.

मृतांस जाळतात अथवा पुरतात. त्यांच्या तृप्त्यर्थ श्राद्ध अथवा दुसरा कोणताच विधि करण्यांत येत नाहीं.

ते मांस खातात व दारू पितात.

**शनवार तेली**—बेने इस्रायल जातीचें दुसरें नांव.

**शिकारी**—पारधी जातीचें दुसरें नांव.

**शिंदीगार**—इलिगेर जातीचें दुसरें नांव.

**शिंपी**—महाराष्ट्रांत आणि कर्नाटकांत सर्वत्र आढळतात. इतर पुष्कळ जातींप्रमाणें शिंपीही आपण क्षत्रियवंशाचे आहों असें सांगतात. ही जात उद्योगप्रधान आहे हें अगदीं स्पष्ट आहे. पूर्वी ते कपडे शिवण्याचा व रंगविण्याचाही धंदा करीत असत. परंतु पुढें रंगविण्याचा धंदा हलका समजण्यांत येऊं लागला व तो करणारांची रंगारी ह्या नांवाची एक स्वतंत्रच जात बनली. अजूनही शिंप्यांत रंगारी ह्या नांवाचा एक पोटभेद आहे. त्यास इतर सर्व पोटभेदांहून हलकें समजण्यांत येतें.

पुष्कळ शिंपी आपल्या जातीची स्थापना इ. स. चौदाव्या शतकांत प्रसिद्धीस आलेल्या शिंपी जातीच्या नामदेव नांवाच्या साधूनें केली असें सांगतात; पण नामदेवापूर्वी शिंपी नव्हते अशी कल्पना करणें अगदीं अशक्य आहे. शिंप्यांमध्यें नामदेव शिंपी नांवाचा एक पोटभेद आहे. ज्याप्रमाणें देशस्थ ब्राह्मणांत एकनाथाच्या वंशजांचा एकनाथी ब्राह्मण या नांवाचा एक पोटभेद झाला आहे, त्याप्रमाणें हा पोटभेद नामदेवाच्या वंशजांचा असूं शकेल. परंतु अलीकडे सर्वत्र शिंप्यांची प्रवृत्ति आपणास नामदेव शिंपी म्हणविण्याची आहे. निदान ते आपल्या पोटभेदाच्या नांवाच्या मागें नामदेव हें नांव तरी लावितात. जसें, नामदेव कोंकणी शिंपी, नामदेव मराठा शिंपी, इ.

शिंप्यांत (१) अहिर, (२) भवसार, (३) चतुर, (४) कोंकणी, (५) मराठा, (६) नागलिक, (७) नामदेव, (८) रंगारी किंवा गोपाल काली, (९) पंचम, (१०) शेतवाल, (११) श्रावक किंवा जैन आणि (१२) यकताटे असे बारा पोटभेद आहेत. ह्याशिवाय नाशिक जिल्ह्यांतील नामदेव शिंप्यांतून एक नवाच पोटभेद निर्माण झाला असून तो इतर शिंप्यांप्रमाणें कुणब्यांच्या आणि

मराठ्यांच्या हातचें अन्न खात नाहीं. त्यांनीं १५५ खेड्यांचा एक संघ केला असून ते आपसांतच लग्नें करितात. शिंप्यांतील पुष्कळ पोटभेदांत अनौरस संततीपासून उत्पन्न झालेला अकरमासे नांवाचाही एक पोटभेद आहे.

शिंप्यांत आडनांवांनीं दर्शविलीं जाणारीं अनेक कुळें आहेत. कित्येकांनीं अलीकडे गोत्रेंही स्वीकारिलीं आहेत. एकाच कुळांतील स्त्रीपुरुषांचा लग्नसंबंध होत नाहीं. मामेबहिणीशीं लग्न करितां येतें, मावसबहिणीशीं करितां येत नाहीं. मुलांचीं लग्नें बहुधा पांच ते पंचवीस व मुलींचीं तीन ते बारा वर्षांच्या दरम्यान करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. कोंकणी शिंप्यांशिवाय इतर शिंप्यांत सोडचिठ्ठी देतां येते. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रीस विधवाविवाहविधीनें दुसरें लग्न करतां येतें.

शिंपी मुख्यत्वेंकरून वारकरी पंथाचे अनुयायी आहेत. त्यांचे उपाध्ये स्थानिक ब्राह्मण असतात. मृतांस जाळतात. ते श्राद्धें करितात. श्राद्धांत पितरांच्या स्थानीं मराठे आणि कुणबी यांची योजना करितां येते, यावरून ह्या तिन्ही जाती मूळ एक असून धंद्यामुळें पुढें विभागल्या गेल्या असें अनुमान निघतें.

शिंप्यांचा परंपरागत धंदा कपडे शिवण्याचा. कित्येकांचीं कापड विकण्याचीं दुकानेंही आहेत. कांहीं कारकून आहेत, कांहीं सावकार आहेत, कांहीं शेती व मजुरी करितात.

ते मांस खातात व दारू पितात.

**शूद्र**—सुदीर जातीचें दुसरें नांव.

**शेणवा**—सिंधवा जातीचें दुसरें नांव.

**शेरोगार**—फक्त कानडा जिल्ह्यांतच आढळतात. त्यांना कोंकण वालेगार असेंही म्हणतात. शेरोगार या शब्दाचा अर्थ जासूद असा आहे. वले ह्या कानडी शब्दाचा अर्थ ताडपत्र. पूर्वीं ताडपत्रावर पत्रें लिहीत असत, त्यावरून त्यांस वालेगार हें नांव पडलें असावें. शेरोगारांचा मूळ धंदा शिपाईगिरीचा, पण हल्लीं ते शेती करितात. मुलींचीं लग्नें आठ ते अकरा व मुलांचे बारा ते अठरा वर्षांच्या दरम्यान करितात. विधवाविवाहास प्रतिबंध आहे.

त्यांच्या कुलदेवता रवळनाथ, निरंकार, कालभैरव आणि महामायी ह्या असून त्यांचीं पवित्र स्थानें गोव्यांत आहेत. ते मृतांस जाळतात व श्राद्धें करितात. ते मांस खातात, पण दारू पीत नाहींत.

**सई**––दर्जी जातीचें दुसरें नांव.

**सई सुतार**––दर्जी जातीचें दुसरें नांव.

**सगर**––मुख्यत्वेंकरून काठेवाड, महीकाठा, अहमदाबाद आणि भडोच येथें आढळतात. सूर्यवंशी सगर राजापासून आपली उत्पत्ति झाली आहे असें ते सांगतात. आपण पूर्वी गिराशिया ( जमीनदार ) होतों अशी त्यांची समजूत आहे; पण हल्लीं त्यांच्यापैकीं बहुतेक शेतकरीच आहेत.

सगरांत गुजराथी आणि सोरठिया असे प्रांतिक स्वरूपाचे दोन पोटभेद आहेत. त्यांच्यांत अनेक कुळें आहेत. त्यांची नांवें उद्योगदर्शक आहेत. आतेबहिण, मामेबहिण अथवा मावसबहिण हिच्याशीं लग्न करितां येत नाहीं. मुलींचीं लग्नें बारा वर्षांच्या आंत व मुलांचीं वीस वर्षांच्या आंत करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. जातीच्या पंचांच्या परवानगीनें नवऱ्यास, बायकोस काडी मोडून देतां येते.

सगर रामानंदी पंथाचे अनुयायी आहेत. ते रामदेपीर ह्या साधूस विशेष भजतात. त्यांचे उपाध्ये बाज खेडावळ ब्राह्मण असतात. ते मृतांस जाळतात व श्राद्धें करितात.

ते मांस खात नाहींत.

**सनगर**––मुख्यत्वेंकरून दक्षिण महाराष्ट्रांत आढळतात. ते लोंकरीच्या घोंगड्या विणण्याचा धंदा करितात. हा धंदा कांहीं महार व धनगरही करीत असल्यामुळें त्यांनाही सनगर असें म्हणतात. पण तें जातीचें निदर्शक नसून धंद्याचें निदर्शक आहे.

सनगरांवर एके काळीं लिंगायत धर्माचा बराच पगडा असावा असें दिसतें. ते मद्यमांस सेवन करूं लागल्यापासून लिंगायतांपासून वेगळे झाले, तथापि अजूनही ते लग्नें व अंत्यविधि चालविण्यास जंगमांस बोलावितात, मृतांस पुरतात व लिंगायतांचा तीर्थ नांवाचा संस्कार पाळतात. त्यांचा धर्म व

चालीरीति पुष्कळ बाबतींत मराठा कुणब्यांप्रमाणें आहेत. त्यांचे उपाध्ये जंगम किंवा ब्राह्मण असतात.

**सनगर**—कब्बलिगर जातीचें दुसरें नांव

**सन्मुख**—न्हावी जातीचें दुसरें नांव.

**सप्पलिग**—किंवा देवदिग फक्त कानडा जिल्ह्यांत आढळतात. सप्पलिग हा शब्द कानडी 'सप्पल' म्हणजे आवाज ह्या शब्दावरून निघाला असून त्याचा अर्थ 'आवाज करणारा' असा आहे. देवदिग हा शब्द 'देव' आणि 'वदिग' म्हणजे 'वाद्य' ह्या शब्दावरून निघाला असून त्याचा अर्थ देवांचा वाजंत्री असा आहे.

सप्पलिगांत मक्कलसंतान आणि अलियसंतान असे दोन पोटभेद आहेत. त्यांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. मक्कलसंतानांत वारसाहक्क पितृवंशाकडे जातो, अलियसंतानांत मातृवंशाकडे जातो.

ह्या जातींत बारा बळी आहेत. ते असे:—

| | | | |
|---|---|---|---|
| १ अज्जन बळी | ... | ... | अज्ज = एक्के झाडाचें फळ. |
| २ अने बळी | ... | ... | अने = हत्ती. |
| ३ बालेर बळी | ... | ... | बाला = केळ. |
| ४ चेंडी बळी | ... | ... | चेंडी = एक प्रकारचें झाड. |
| ५ गंगार बळी | ... | ... | गंगा = गंगावळी नदी. |
| ६ होले बळी | ... | ... | होले = शेत. |
| ७ होन्ने बळी | ... | ... | होन्ने = एक प्रकारचें झाड. |
| ८ साल्यण बळी | ... | ... | सालेर = साळू. |
| ९ शेट्टी बळी | ... | ... | शेट्टी = मासा. |
| १० शिविन बळी | ... | ... | शिवनी = एक प्रकारचें झाड |
| ११ शिरिन बळी | ... | ... | शिरे = एक प्रकारचें झाड. |
| १२ तोळण बळी | ... | ... | तोळा = लांडगा. |

बळीनें दर्शविल्या जाणाऱ्या झाडाची अथवा प्राण्याची त्या त्या बळीचे लोक पूजा करितात व त्यास कधींही इजा करीत नाहीत.

एकाच बळीच्या लोकांत लग्नसंबंध करितां येत नाहीं. मुलींचीं लग्नें बहुधा आठ ते बारा वर्षांच्या दरम्यान करितात. मुलांच्या लग्नास वयाची मर्यादा नाहीं. बारा वर्षेपर्यंत मुलीचें लग्न न झाल्यास ती जातिबहिष्कृत झाली असें मानतात. मग ती बहुधा वेश्यावृत्तीचा स्वीकार करिते. विधवेस मूल नसल्यास तिला दुसरें लग्न करतां येतें. जातीच्या शेटीच्या (प्रमुख) परवानगीनें सोडचिठ्ठी देतां येते. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रीस दुसरें लग्न करतां येत नाहीं.

सप्पलिग मुख्यत्वेंकरून तिरुपतीच्या व्यंकटरमणास भजतात. ते इतर सर्व देवता व चवडी, जतगा, एरू आणि म्हस्ती इत्यादि ग्रामदेवतांसही भजतात. त्यांचे उपाध्ये हविक ब्राह्मण असतात. ज्यांना ऐपत असते ते मृतांस जाळतात, इतर पुरतात. मृतांच्या शांत्यर्थ श्राद्धें करितात.

सप्पलिगांचा परंपरागत धंदा वाद्यें वाजविण्याचा आहे. ते देवळांत व लग्नकार्यासारख्या प्रसंगीं घरांत व रस्त्यांतून वाद्यें वाजवितात. कांहींच्या मालकीच्या जमिनी आहेत, त्यांची ते स्वतःच लागवड करितात. कांहीं खंडानें शेती करितात, व कांहीं शेतावर मजुरी करितात.

ते मांस खातात व दारू पितात.

**समगार**—चांभार जातीचें दुसरें नांव.

**सरवडे**—फक्त रत्नागिरी जिल्ह्यांत आढळतात. ते पावसाळा खेरीज करून इतर दिवसांत आपल्या मुलांमाणसांसुद्धां गांवोगांव भविष्य सांगून भिक्षा मागत फिरत असतात. त्यांच्या भविष्यकथनावर कोणी विश्वास ठेवीत नाहीं. आणि पुष्कळ वेळां त्यांना दारांतून हांकूनही लावण्यांत येतें. कधीं कधीं लोक त्यांना जुने कपडे, पैसे किंवा थोडेंसें धान्य देतात. ते सांगतात कीं, सत्ययुगांत आपण देवांचे ज्योतिषी होतों, व हल्लीं लोक आपणांस जें कांहीं देतात तें दान नसून सत्ययुगांत केलेल्या कामगिरीबद्दलचें बक्षिस होय.

सरवडे शैव मतानुयायी असून घरांत जोखाबाई, यल्लम्मा आणि खंडोबाच्या मूर्तींची पूजा करितात. ते बाळंतिणीचा किंवा रजस्वला स्त्रीचा विटाळ मानीत नाहींत. ते मृतांस पुरतात, व त्यांच्या शांत्यर्थ दर वर्षी मृत्युदिनीं आप्तांस जेवण देतात व कावळ्यांस अन्न घालतात.

सरवडे यांना कोणी कांहीं दिलें तरी तें ते खातात. ते मांस खातात, पण दारू बहुधा पीत नाहींत.

**सराणिया**—मुख्यत्वेंकरून काठेवाडांत व त्याच्या आंजूबाजूच्या प्रदेशांत आढळतात. सराणियांत दोन पोटभेद आहेत. त्यांपैकीं एक स्थायिक असून दुसरे गांवोगांव भटकत असतात. दोघेही शस्त्रांस धार देण्याचा धंदा करितात. दोघांतही विधवाविवाह आणि काडी मोडून देण्याचा प्रघात रूढ आहे.

**सलाट**—गुजराथेंत सर्व मोठमोठ्या शहरांत आढळतात. त्यांच्यांत सोमपरा सलाट, कुंभार सलाट आणि तळबदा कोळी सलाट असे तीन पोटभेद आहेत. त्यांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. ह्या तिहींत सोमपरा सलाटांचा भरणा मोठा आहे.

ज्या कुंभारांनीं आपला धंदा सोडून सलाटांचा धंदा उचलला त्यांतून कुंभार सलाट निर्माण झाले. त्याचप्रमाणें तळबदा कोळी सलाटांविषयींही समजावें. हे दोन्ही पोटभेद आपापल्या मूळ जातीचे रीतरिवाज पाळतात.

सोमपरा सलाट आपण मूळ ब्राह्मण होतों असें म्हणतात व त्याच्या समर्थनार्थ अनेक दंतकथा सांगतात. ते जानवीं घालतात. मात्र जानवीं घालण्याचा विधि लग्नाच्या वेळीं किंवा कुटुंबांत दुसरें एखादें शुभकार्य असेल तेव्हां उरकण्यांत येतो. त्यांच्या धर्मविधींत आणि ब्राह्मणांच्या धर्मविधींत म्हणण्यासारखा फरक नाहीं. ते मुलींचीं लग्नें एक वर्षापासून तेरा वर्षांच्या वयापर्यंत करितात. त्यांच्यांत सोडचिठ्ठी देतां येत नाहीं, पण विधवाविवाह रूढ आहे. विधवा कधीं कधीं मृत पतीच्या धाकट्या भावाशींही लग्न करिते.

सलाट स्वामीनारायण आणि शैव पंथाचे अनुयायी आहेत. त्यांचे उपाध्ये औदिच आणि सोमपरा ब्राह्मण असतात.

सलाट पाथरवट काम करून उदरनिर्वाह करितात.

ते मद्यमांस सेवन करीत नाहींत.

**सहदेव जोशी**—मुख्यत्वेंकरून पुणें आणि रत्नागिरी जिल्ह्यांत आढळतात. त्यांस हुसेनी ब्राह्मण असेंही म्हणतात. पण हें नांव त्यांस कां पडलें

तें कळत नाहीं. एका ब्राह्मण जोतिषास कुणबी बाईपासून झालेल्या सहदेव नामक मुलीपासून आपली उत्पत्ति झाली आहे असें ते सांगतात. ते भविष्य सांगून आणि भिक्षा मागून उदरनिर्वाह करितात. मृतांस पुरण्याच्या चालीशिवाय त्यांच्या इतर चालीरीति व धर्मविधि मराठा कुणब्यांप्रमाणें आहेत.

**संघाडिया**—खरादी जातीचें दुसरें नांव.

**सारेकरी**—ह्यांची संख्या अगदींच अल्प असून ते कुलाबा जिल्ह्यांतील माणगांव आणि महाड तालुक्यांतच आढळतात. ते पूर्वी ताडी काढण्याचा धंदा करीत, पण हल्लीं त्यांनीं तो धंदा सोडला असून ते मजुरी करून उदरनिर्वाह करितात.

**सारोडा**—किंवा डाकोजी हे वऱ्हाडांतून आलेले असून भविष्य सांगण्याचा धंदा करितात.

**साळी**—देवांग जातीचें दुसरें नांव.

**सिंधवा**—किंवा शेणवा खेडा जिल्ह्यांत व पालनपूर संस्थानांत आढळतात. त्यांचा दर्जा धेडांच्या खालीं व भंग्यांच्या वर असून त्यांच्याप्रमाणेंच त्यांची गणना अस्पृश्यांत होते.

चार पिढ्यांच्या आंत लग्न करण्यास प्रतिबंध आहे. लग्नें अगदीं लहानपणींच करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. विधवा बहुधा मृत पतीच्या धाकट्या भावाशींच लग्न करिते. अविवाहितास विधवेशीं लग्न करावयाचें असल्यास प्रथम त्याला शमीच्या किंवा झिंगीच्या झाडाशीं लग्न करावें लागतें. सोडचिठ्ठी देतां येते.

सिंधवा बिजमार्गी आणि रामानुज पंथाचे अनुयायी असून विशेषतः रामडे पीर आणि भिलडी माता यांस भजतात. त्यांस देवळांत जाऊं देत नाहींत. देवळाच्या दाराबाहेर उभे राहून ते देवास नमस्कार करितात. त्यांचे उपाध्ये गारुडा असतात. ते मृतांस पुरतात. मृतांच्या शांत्यर्थ ते कोणतेच विधि करीत नाहींत.

सिंधवा शिंदीच्या पानाच्या चटया करितात आणि भिंडीच्या तंतूंचे दोर व केरसुण्या करितात. कांहीं पत्रें पोंचविण्याचें काम करितात, कांहीं न्हाव्यांचा धंदा करितात व कांहीं गांवकामगार असतात.

ते गोमांसासुद्धां सर्व प्रकारचें मांस खातात व दारू पितात.

**सिनाई**—रबारी जातीचें दुसरें नांव.

**सुई**—दर्जी जातीचें दुसरें नांव.

**सुकलीर**—लमाणी जातीचें दुसरें नांव.

**सुतार**—किंवा सुथार इलाख्यांत सर्वत्र आढळतात. महाराष्ट्रांत त्यांस सुतार म्हणतात आणि गुजराथेंत सुतार किंवा सुथार म्हणतात. कानडी मुलखांत त्यांस बाढिग म्हणतात. महाराष्ट्रांतील सुतार आणि गुजराथेंतील सुतार यांचा धंदा जरी एकच असला तरी त्या अगदीं पृथक् जाती आहेत. त्यांचा परंपरागत धंदा गाड्या, नांगर आणि शेतीचीं दुसरीं आउतें करणें व बिघडलेलीं दुरुस्त करणें हा होय. ते गांवच्या बलुतेदारांपैकीं असून पिकाच्या वेळीं गांवचे लोक त्यांस धान्य देतात. गुजराथेंतील सुतारांस साऱ्याची थोडी सूट देऊन जमिनीही दिलेल्या आहेत. शहरांतील सुतार घरें व तारवें बांधतात व खुर्च्या, टेबलें, कपाटें वगैरे नाना तऱ्हेचें लांकूडकाम करितात.

महाराष्ट्रांतील सुतार आपणास पांचाळ म्हणवितात. देवांचा शिल्पकार जो त्वष्टा त्याचे आपण वंशज आहों असें ते सांगतात. त्यांच्यांत आपण ब्राह्मण आहों असें प्रस्थापित करण्याची चळवळ सुरू असून, त्याकरितां त्यांनीं आपल्यांतील कांहीं लोकांस उपाध्येगिरीच्या कामांत तयार केलें आहे. तसेंच त्यांनीं इतर जातींच्या लोकांच्या हातचें अन्नपाणीही घेण्याचें सोडून दिलें आहे. त्यांच्यांत देशी, कोंकणी, पांचाळ आर्यक्षत्री आणि विदूर असे पांच पोटभेद आहेत. विदुरांत त्यांच्या अनौरस संततीचा समावेश होतो. त्यांस कडू, दासीपुत्र, अकरमासे किंवा शिंदे असेंही म्हणतात.

**देशी सुतार**—देशी सुतारांत आडनांवांनीं दर्शविलीं जाणारीं कुळें आहेत. अलीकडे त्यांनीं पुष्कळ गोत्रांचाही स्वीकार केला आहे. आतेबहिणीबरोबर व मामेबहिणीबरोबर लग्न करतां येतें, मावसबहिणीबरोबर करतां येत

नाहीं. भावाभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करतां येते. मुलींचीं लग्नें बहुधा पांच ते बारा व मुलांचीं दहा ते वीस वर्षांच्या दरम्यान करितात. लग्नापूर्वी मुलांची मुंज करितात. कांहीं ठिकाणीं विधवाविवाहास मोकळीक आहे, कांहीं ठिकाणीं नाहीं. सोडचिठ्ठीस कांहीं ठिकाणीं जरी मोकळीक आहे तरी सोडचिठ्ठी देणें प्रशस्त मानलें जात नाहीं.

देशी सुतार सर्व देवदेवतांस भजतात. त्यांचे उपाध्ये त्यांच्याच जातीचे अथवा ब्राह्मण असतात. मृतांस जाळतात व त्यांच्या शांत्यर्थ श्राद्धें करितात.

कांहीं देशी सुतार मांस खातात व दारू पितात. कांहीं आपण केवळ शाकाहारी आहों असें सांगतात. ते फक्त ब्राह्मणांच्याच हातचें अन्न खातात.

**कोंकणी सुतार**—रत्नागिरीच्या कांहीं भागांत त्यांस थवी अथवा वाडवे असेंही म्हणतात. त्यांच्यामध्यें धवड सुतार किंवा दाभोळे म्हणून एक पोटभेद आहे. तो दापोली तालुक्याच्या आसपास आढळतो. पोर्तुगीज लोकांनीं जेव्हां हिंदु लोकांचा छळ आरंभिला तेव्हां कांहीं कोंकणी सुतार सोलापूर जिल्ह्यांत जाऊन स्थायिक झाले. त्यांना तेथें शिव ब्राह्म सुतार असें म्हणतात. त्यांचा अजूनही गोवें आणि रत्नागिरी येथील त्यांच्या जातिबांधवांशीं रोटी-बेटीव्यवहार होतो. रत्नागिरी जिल्ह्यांत एकाच खेड्यांत राहाणारांस एकीच कुळाचे समजण्यांत येतें, म्हणजे त्यांचा आपसांत बेटीव्यवहार होऊं शकत नाहीं. त्यांच्यांत कळंब, कोचा, जांभूळ, पळस, उंबर, वड इत्यादि देवकें आढळतात. एकच देवक असलेल्या लोकांचा शरीरसंबंध होऊं शकतो. देवकांनीं दर्शविलीं जाणारीं झाडें ते तोडीत नाहींत, अथवा त्यांचें लांकूड किंवा पानें यांचा उपयोग कोणत्याही कामीं करीत नाहींत. रत्नागिरी जिल्ह्याचे कांहीं भाग खेरीज करून इतर ठिकाणीं विधवाविवाहास प्रतिबंध आहे. सोडचिठ्ठी देतां येत नाहीं. त्यांचें अन्नपाणी, धर्म व रीतरिवाज मराठ्यांप्रमाणें आहेत.

**गुजराथी सुतार**—देवांचा शिल्पकार जो विश्वकर्मा त्याजपासून आपली उत्पत्ति झाली आहे असें सांगतात. त्यांच्यांत गुजर, मेवाडा, पंचोळी, मारवाडी आणि वैश असे पांच मुख्य पोटभेद आहेत. त्यांतील मेवाडा आणि मारवाडी मेवाड मारवाडांतून आलेले आहेत. बाकीच्यांत वैश सर्वांत श्रेष्ठ समजले

जातात. ते दुसऱ्या पोटभेदांतील लोकांच्या हातचें अन्न खात नाहींत, पण ते मात्र त्यांच्या हातचें अन्न खातात. पंचोळींस सर्वांत हलकें समजण्यांत येतें. कारण ते तारवें बांधणें व ज्यांत जीवांची हत्या होते अशा दुसऱ्या लांकडाच्या वस्तु करितात. प्रत्येक पोटभेदांत बरींच कुळें आहेत. त्यांचीं नांवें रजपुतांच्या आडनांवांसारखीं किंवा खेड्यांवरून पडलेलीं आहेत. मातृवंशाकडून चारपांच पिढ्यांच्या आंत लग्नसंबंध करितां येत नाहीं. आतेबहीण, मामेबहीण किंवा मावसबहिणीशीं लग्न करतां येत नाहीं. भावाभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करतां येतें. मुलींचीं लग्नें बहुधा अकरा वर्षांपूर्वीं व मुलांचीं सोळा वर्षांपूर्वीं करितात. उत्तर गुजराथेंतील वैशांत आणि मेवाडांत विधवाविवाह आणि सोडचिठ्ठी यांस प्रतिबंध आहे. इतर सर्व पोटभेदांत विधवांस लग्न करण्यास मोकळीक आहे व सोडचिठ्ठी देतां येते. त्यांचे धार्मिक विधि कणब्यांप्रमाणें आहेत. मात्र उत्तर गुजराथेंतील वैशांत आणि मेवाडांत ब्राह्मणांप्रमाणें विधियुक्त मुलांची मुंज करितात. ते मृतांस जाळतात, व त्यांच्या शांत्यर्थ श्राद्धें करितात.

गुजराथी सुतार मांस खात नाहींत व दारूही पीत नाहींत.

**सुदीर**—किंवा शूद्र फक्त कानडा जिल्ह्यांतच आढळतात. ते आपलें मूलस्थान कोल्हापुरांत आहे असें सांगतात. कोल्हापुरांतून ते गोंव्यास जाऊन तेथें स्थायिक झाले. पुढें पोर्तुगीज लोकांनीं जेव्हां हिंदूंचा अनन्वित छळ चालविला तेव्हां तेथून निघून ते कानडांत येऊन राहिले. त्यांची एक कुलदेवता कोल्हापुरास आहे व बाकीच्या बहुतेक गोंव्यांत आहेत, यावरून ते मूळ त्या प्रांतांतीलच असावे असें दिसतें.

सुदीरांत तेवीस कुळें आहेत. प्रत्येक कुळाची एक एक कुलदेवता आहे. एकाच कुळांतील स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. मामेबहिणीशीं व आतेबहिणीशीं लग्न करतां येतें. लग्नाच्या वयाची निश्चित अशी मर्यादा नाहीं. मुलींचीं लग्नें वयांत आल्यानंतरही करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. अविवाहितास विधवेशीं लग्न करावयाचें असल्यास प्रथम त्यास रुईबरोबर लग्न करावें लागतें. सोडचिठ्ठी देतां येत नाहीं.

सुदीर स्मार्तमतानुयायी आहेत. ते सर्व देवदेवतांस भजतात. ते घरांतील देवांत मृत पूर्वजांचे सोन्याचे टांक करून ठेवितात. त्यांचे उपाध्ये हविक, कर्नाटक, कऱ्हाडे किंवा चित्पावन ब्राह्मण असतात. त्यांस ते फक्त लग्नें आणि महालय चालविण्यास बोलावितात. मृतांस पुरण्यांत येतें. त्यांच्या शांत्यर्थ दर वर्षी महालय करितात.

सुदीरांचा परंपरागत धंदा शेतीचा. पण ते घरकामास राहतात व मजुरीही करितात.

ते मांस खातात व दारू पितात.

**सुन्नकल्लू बेष्टा**—कब्बलिगर जातीचें दुसरें नांव.

**सुलतानकर**—अलिटकर जातीचें दुसरें नांव.

**सुलेर**—ही वेश्यांची एक जात असून ती मुख्यत्वेंकरून धारवाड जिल्ह्यांत आढळते. मुलगी दहा वर्षांची झाली म्हणजे तिचें परशुरामाशीं लग्न करितात व तेव्हांपासून ती वेश्येच्या धंद्यास सुरवात करते. सुलेर मुख्यत्वें-करून यामव्वा, दुर्गव्वा आणि येल्लव्वा ह्या देवींस भजतात. त्या मांस खातात व दारू पितात.

**सुवार**—ही पाणी भरणारांची एक लहानशी जात असून ती मुख्यतः काठेवाडांत व अहमदाबाद जिल्ह्यांत आढळते.

**सोनार**—महाराष्ट्रांत आणि कर्नाटकांत सर्वत्र आढळतात. कानडा जिल्ह्यांत त्यांना अकसाळी, अगसाळी किंवा पट्टार असेंही म्हणतात. सुतार, लोहार, तांबट इत्यादि दुसऱ्या कारागीर जातींप्रमाणें ते देवांचा शिल्पकार जो विश्वकर्मा त्याजपासून आपली उत्पत्ति झाली आहे असें सांगतात. केव्हां केव्हां ते आपणांस पांचाळ असेंही म्हणवितात. कांहीं सोनार आपणांस ब्राह्मण म्हणवितात. त्यांत जे आपणास दैवज्ञ ब्राह्मण म्हणवितात त्यांचा दर्जा सर्वांत श्रेष्ठ आहे असें दिसतें. कधीं कधीं वैश्य सोनारांचाही दैवज्ञांत समावेश करण्यांत येतो. कांहीं ठिकाणचे अहिर सोनारही ब्राह्मणत्वाचा हक्क सांगूं लागले आहेत. दैवज्ञांच्या खालोखाल लाड सोनारांचा दर्जा आहे. शीलवंत आणि इतर सोनार ह्यांचा दर्जा त्यांच्याही खालीं आहे. सोनार

ह्या उद्योगनिदर्शक समुदायांत निरनिराळ्या सामाजिक दर्जाचे इतके लोक सामील झाले आहेत कीं, सोनार ह्या नांवाचें महत्त्व त्यामुळें कमी झालें, असें म्हणण्यास कांहीं प्रत्यवाय दिसत नाहीं. ह्याचा परिणाम असा झाला कीं, जे उच्च दर्जाचे लोक हा धंदा करीत असत, त्यांस तें नांव कमीपणाचें वाटूं लागलें. हे उच्चवर्णीय सोनार सामाजिक व धार्मिक बाबतींत ब्राह्मणांच्या अगदीं बरोबरीचे आहेत.

सोनारांत बारा पोटभेद आहेत. ते असेः—(१) अहिर किंवा खानदेशी, (२) अझरा, (३) देवांगण, देवाग्नि किंवा दैवज्ञ, (४) कडू, दासीपुत्र किंवा विदूर, (५) कानडे किंवा अकसाळी, (६) लाड, (७) माळवी, (८) मराठा किंवा देशी, (९) परदेशी, (१०) सादा, (११) शिलवंत, (१२) वैश्य किंवा जैन.

वरील पोटभेदांपैकीं दैवज्ञांचा बाकीच्यांशीं कोणत्याच प्रकारचा संबंध नाहीं. त्यांची एक अगदीं स्वतंत्रच जात आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. ते सोनाराचें काम करितात इतकेंच. त्यांचें वर्णन शेवटीं निराळें दिलें आहे.

दैवज्ञांशिवाय इतर पोटभेद बहुधा प्रांतिक स्वरूपाचे आहेत. अहिर हे अहिर ह्या मोठ्या जातींतून निघाले आहेत. वैश्य अथवा जैन जैनधर्माचे अनुयायी आहेत. ह्या पोटभेदांचा परस्परांशीं रोटीबेटीव्यवहार होत नाहीं.

जे सोनार ब्राह्मणत्वाचा हक्क सांगतात त्यांच्यांत गोत्रें आहे. इतरांत गोत्रांचें काम आडनांवांनीं केलें जातें.

एकच गोत्र अथवा आडनांव असलेल्या कुटुंबांचा शरीरसंबंध होत नाहीं. मामेबहिणीशीं लग्न करितां येतें, पण आतेबहिणीशीं अथवा मावसबहिणीशीं करतां येत नाहीं. भावाभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करतां येतें. लग्नापूर्वीं मुलांची मुंज करितात. मुलींचीं लग्नें बहुधा त्या वयांत येण्यापूर्वीं करितात. मराठा, माळवी, अहिर, लाड आणि कडू सोनारांत विधवाविवाहास मोकळीक आहे. इतर पोटभेदांत विधवांचें केशवपन करितात. जे ब्राह्मणत्वाचा हक्क सांगत नाहींत त्या सर्वांत सोडचिठ्ठी देण्याची मोकळीक आहे.

सोनार स्मार्त आणि वैष्णव या दोन्ही पंथांचे अनुयायी आहेत. कानडा जिल्ह्यांतील सोनार माध्व पंथाचे वैष्णव आहेत. त्यांच्या कुलदेवता नरसोब

रामेश्वर, जोगेश्वरी, खंडोबा, मूळवीर, एकवीरा, शांतादुर्गा, महामाया इत्यादि आहेत. जे सोनार ब्राह्मणत्वाचा हक्क सांगतात ते ब्राह्मणांचे संस्कार पाळतात. मुंबईस आणि दुसऱ्या कित्येक ठिकाणीं त्यांचे उपाध्ये त्यांच्याच जातीचे असतात. तथापि त्यांच्यांतील पुष्कळ लोक स्थानिक ब्राह्मणांकडूनही उपाध्यांचें काम करून घेतात. कानडा जिल्ह्यांतील सोनारांचीं बाड, सुनकेरी आणि कडवाड येथें तीन देवळें आहेत. त्यांतील पुजारी सोनारच आहेत.

सोनारांतील उच्च दर्जाच्या पोटभेदांचे धर्मविधि ब्राह्मणांप्रमाणें असतात. इतरांचे स्थानिक कुणब्यांप्रमाणें असतात.

सोनारांचा परंपरागत धंदा सोन्याचांदीचे व जडावाचे दागिने करण्याचा आहे. कांहीं शेती करितात आणि कांहीं सरकारी नोकर आहेत. मुंबईतील कांहीं सोनार वकिली, डॉक्टरी इत्यादि श्रेष्ठ धंदे करणारेही आहेत.

कानडे आणि वैश्य शिवायकरून इतर सर्व सोनार मांस खातात. ते फक्त ब्राह्मणांच्याच हातचें अन्न खातात. कानडे इतर कोणत्याच जातीच्या हातचें अन्न खात नाहींत आणि इतर कोणतीही जात त्यांच्या हातचें अन्न खात नाहीं.

**दैवज्ञ**—ह्यांस देवांगण किंवा देवाग्नि असेंही म्हणतात. ते मुख्यत्वेंकरून ठाणें, कुलाबा, रत्नागिरी, कानडा, पुणें आणि सातारा जिल्हा, कोल्हापूर संस्थान व गोवें ह्या ठिकाणीं आढळतात. ते आपण ब्राह्मण आहों असें प्रतिपादन करितात व आपणास दैवज्ञ ब्राह्मण म्हणवितात. त्यांच्या मताप्रमाणें दैवज्ञ हा शब्द 'दैव' म्हणजे 'देवासंबंधीं' आणि 'ज्ञ' म्हणजे जाणणारा ' ह्या दोन शब्दांचा समास असून त्याचा अर्थ "देवासंबंधीं ( काम ) जाणणारा, म्हणजे सोन्याचांदीच्या देवांच्या मूर्ति, रथ, देव्हारे, दागिने इत्यादि करणारा" असा आहे. ते म्हणतात कीं, प्राचीन काळीं एकाच जातीचे लोक पुष्कळ धंदे करीत असत. उदाहरणार्थ, रथकार हे ब्राह्मण असून सोनें, लोखंड, लांकूड व दगडाचीं कामें करीत असत. त्याच रथकार ब्राह्मणांचे आपण वंशज आहों असें त्यांचें म्हणणें आहे. ह्या आपल्या म्हणण्यास ते असा आधार देतात कीं, ऋग्वेदांत विश्वकर्मा हा लोखंडाचें व सोन्याचें वज्र आणि लांकडाचा रथ करीत असे असें वर्णन आहे. तसेंच ऋभू हे लांकूड आणि धातूचें काम

करीत असेंही वर्णन आहे. पुढें क्षत्रिय, वैश्य आणि शूद्रही हीं कामें करूं लागले; आणि समाज जसजसा जास्त सुसंघटित होऊं लागला, तसतसे हे धंदे वेगळे होऊन ते करणाऱ्या वेगवेगळ्या जाती निर्माण झाल्या. पांचाळ किंवा विश्व ब्राह्मण ही एकच जात असून अजूनही ते पांच प्रकारचे धंदे करितात. त्यांच्यांत आणि कर्मठ ब्राह्मणांत त्यांच्या वेदाधिकाराविषयीं तंटे उपस्थित होऊन जेव्हां जेव्हां ते निर्णयासाठीं जगद्गुरूकडे गेले तेव्हां तेव्हां जगद्गुरूंनीं पांचाळांचाच पक्ष उचलून धरला आहे. पांचाळांचें ब्राह्मणत्व ह्याप्रमाणें कबूल केलेलें पाहातांच त्यांचेच धंदे करणाऱ्या सोनार, सुतार, लोहार, तांबट किंवा कासार आणि पाथरवट ह्याही जाती आपण ब्राह्मण आहों असें प्रस्थापित करूं पाहूं लागल्या. पांचाळांप्रमाणें दैवज्ञांतही त्यांच्याच जातीचे उपाध्ये असतात आणि आपले उपाध्ये नेमण्याचा त्यांचा हक्क पेशव्यांनींही कबूल केला होता, ह्या गोष्टीवरून दैवज्ञ हे ब्राह्मण आहेत ह्या म्हणण्यास बरीच बळकटी येते.

**सोनी**—गुजराथेंत सर्व शहरांत व मोठमोठ्या खेड्यांत आढळतात. त्यांच्यांत सहा मुख्य पोटभेद आहेत. त्यांतील गुजर, मरू, मेवाडा आणि श्रीमाळी हे पोटभेद आपली उत्पत्ति वाण्यांपासून झाली आहे असें प्रतिपादितात, त्रागदा आपली उत्पत्ति वाणी बाप व ब्राह्मण आई यांपासून झाली आहे असें सांगतात, आणि पर्जिया आपण रजपूत वंशाचे आहों असें म्हणतात. पर्जियांत गरनारा आणि पटणी असे दोन पोटभेद आहेत. वरील सहा पोटभेदांशिवाय कच्छमध्यें कंसारा सोनी आणि काठेवाडांत मल सोनी आहेत; पण कंसारा सोनी हे खरोखर सोनी नसून सोन्याचें काम करणारे कंसाराच आहेत. ह्याशिवाय घाटी, मास्तान, मेथ आणि भाटिया सोनी नांवांचे पोटभेद बडोदें संस्थानांत आढळतात.

श्रीमाळी सोनी किंवा सोनी वाणी यांत अहमदाबादी आणि चरोतरिया असे दोन पोटभेद आहेत. ह्या दोघांचा परस्पर रोटीव्यवहार होतो, पण बेटीव्यवहार होत नाहीं. चरोतरांतील श्रीमाळी सोनींनीं लग्नाच्या सोईकरितां गोल म्हणजे खेड्यांचे निरनिराळे समुदाय केलेले आहेत. प्रत्येक गोलांतील मुलांचीं त्याच गोलांतील मुलींबरोबर लग्नें झालीं पाहिजेत असा नियम आहे.

सोनींत चार पिढयांच्या आंत लग्नसंबंध करतां येत नाहींत. लग्नें लहानपणीं अथवा वयांत आल्यानंतरही करितात. मरू, चरोतरिया, श्रीमाळी आणि पजिया ह्या पोटभेदांत विधवाविवाहास मोकळीक आहे. फक्त चरोतरिया श्रीमाळींतच घटस्फोट करण्यास प्रतिबंध नाहीं.

सोनी मुख्यत्वेंकरून वाघेश्वरी व महालक्ष्मी ह्या देवींस भजतात. त्यांचे उपाध्ये औदिच, श्रीमाळी, साचोरा आणि सारस्वत ब्राह्मण असतात. त्रागदा आणि पजिया जानवीं घालतात. पजिया मुसलमान पिरांस भजतात व मृतांस पुरतात. इतर सोनी मृतांस जाळतात व त्यांच्या शांत्यर्थ श्राद्धें करितात.

सोनी सोन्याचांदीचे दागिने करण्याचा आपला परंपरागत धंदाच करितात. कच्छमधील पजिया सोनी मात्र गवंडीकाम, सुतारकाम व शेती करितात.

सोनी शुद्ध शाकाहारी असून त्यांचा समाजांतील दर्जा वाण्यांखालोखाल आहे.

**हजाम**—पहा–न्हावी.

**हटकर**—देवांग जातीचें दुसरें नांव.

**हनबर**—मुख्यत्वेंकरून कर्नाटकांत आढळतात. हनबर ह्या शब्दाचा अर्थ उभीं शिंगें असलेला बैल असा आहे. हनबरांच्या प्रत्येक घरांत असा एखादा-दुसरा बैल असतो. त्याची ते मोठ्या भक्तीनें पूजा करितात. हनबरें पूर्वी गुरांचे कळप पाळून त्यांना चारीत जंगलाजंगलांतून भटकत असत. हल्लीं ते शेती करितात, व शेतावर मजुरी करितात.

हनबरांत ( १ ) हळे म्हणजे जुने हनबर, ( २ ) होसे म्हणजे नवे हनबर, ( ३ ) बिलेश्रिया आणि ( ४ ) बन्नडश्रिया असे चार पोटभेद आहेत. ह्यांपैकीं पहिल्या दोन पोटभेदांत परस्पर रोटीबेटीव्यवहार होतो.

हनबरांत अनेक बेडगू आहेत. एकाच बेडगूच्या स्त्रीपुरुषांचा शरीरसंबंध होत नाहीं. आतेबहिणीशीं किंवा मामेबहिणीशीं लग्न करितां येतें, मावसबहिणीशीं करितां येत नाहीं. भावांभावांस बहिणीबहिणींबरोबर लग्न करितां येतें. मुलांच्या लग्नास वयाची मर्यादा नाहीं. मुलींचीं लग्नें मात्र त्या वयांत येण्यापूर्वी केलीं पाहिजेत असा नियम आहे. विधवाविवाहास मोकळीक आहे. सोडचिठ्ठी देतां येते.

हनबर मुख्यत: शिव, मारुती, यल्लम्मा आणि मंगलव्वा ह्यांस भजतात. त्यांचे उपाध्ये ब्राह्मण असतात; पण कधीं कधीं ते जंगमांकडूनही लग्नें चालवितात. मृतांस बहुधा पुरण्यांत येतें, पण कित्येक दहन करणें विशेष प्रशस्त मानतात. मृतांच्या शांत्यर्थ दर वर्षीं पितृपक्षांत ब्राह्मणांची पूजा करून त्यांस दक्षिणा देतात आणि त्यांच्या पायांचें तीर्थ पितात.

ते मांस खातात व दारू पितात.

**हरकंता**—फक्त कानडा जिल्ह्यांत समुद्रकिनाऱ्यावरील शहरांत व खेड्यांत आढळतात. त्यांच्यांत पंधरा बळी (कुळें) आहेत. जें झाड, प्राणी अगर वस्तु यावरून बळीचें नांव पडलेलें असतें त्यास त्या बळीचे लोक कोणत्याच प्रकारें इजा करीत नाहींत. एकाच बळीच्या लोकांत लग्नसंबंध होत नाहीं. मामेबहिणीशीं लग्न करतां येतें, पण आतेबहिणीशीं करतां येत नाहीं. मुलींचीं लग्नें दहा ते बारा व मुलांचीं पंधरा ते पंचवीस वर्षांच्या दरम्यान करितात. जातीच्या पंचांच्या परवानगीनें विधवेस लग्न करतां येतें.

हरकंता सर्व देवदेवतांस भजतात, पण कोडिबिरा आणि बलेबिराची विशेष भक्ति करितात. त्यांचे उपाध्ये हविक किंवा कर्नाटक ब्राह्मण असतात. मृतांस बहुधा पुरण्यांत येतें. त्यांच्या शांत्यर्थ प्रत्येक अमावास्येस गाईस अन्न चारतात आणि प्रत्येक वर्षीं भाद्रपदांतील अमावास्येस कावळ्यांस अन्न घालतात व जातीच्या लोकांस जेवण देतात.

हरकंता मासे मारण्याचा व डोल्या व पालख्या वाहण्याचा धंदा करितात.

ते मांस खातात व दारू पितात.

**हरिदास**—ही गुरांची पैदास्त करणारी एक लहान जात असून ती पूर्व खानदेशांत आढळते.

**हलवक्की वक्कल**—फक्त कानडा जिल्ह्यांत आढळतात. त्यांस 'गावडा' असेंही म्हणतात. 'वक्कल' हा कानडी शब्द असून त्याचा अर्थ 'शेती करणारा' असा आहे. तो जातिनिदर्शक शब्द नसून उद्योगनिदर्शक आहे. तो मराठींतील कुणबी शब्दाशीं समानार्थक आहे. कान्डी मुलखांत वक्कल ह्या नांवांत शेती करणाऱ्या सर्व जातींचा समावेश होतो.

हालवक्की हा शब्द हालु म्हणजे शुभ्र आणि अक्की म्हणजे तांदूळ ह्या शब्दांवरून निघाला आहे. ही जात उत्तम प्रतीचे तांदूळ पिकविते म्हणून तिला हें नांव पडलें असावें.

पूर्वी हालवक्की वक्कल कानडा जिल्ह्यांतील जमिनींचे मालक होते असें दिसतें. पुढें हळू हळू ही मालकी गौड सारस्वत, हविक व लिंगायतांकडे गेली.

हालवक्की वक्कलांत अनेक बळी आहेत. त्यांतील मुख्य खालीं दिले आहेत:—

| | | | |
|---|---|---|---|
| १ बलेर बळी | ... | ... | बलई = केळीचें झाड. |
| २ बलिन बळी | ... | ... | बली = समुद्रांतील एक प्रकारचा मासा. |
| ३ बर्गळ बळी | ... | ... | बर्गा = एक प्रकारचें हरिण. |
| ४ भैरण बळी | ... | ... | भैरण = एक प्रकारचा पक्षी. |
| ५ देवी बळी | ... | ... | देवी. |
| ६ यावन बळी | ... | ... | याव = कांसव. |
| ७ गुर्विन बळी | ... | ... | गुरगी = एक कांटेरी झाड. |
| ८ होले बळी | ... | ... | होले = एक प्रकारचें झाड. |
| ९ कडसन बळी | ... | ... | कडची = एक प्रकारचें झुडुप. |
| १० कडविन बळी | ... | ... | कडवे = सांबर. |
| ११ कोडकल बळी | ... | ... | कोडकल = वानर. |
| १२ कुंते बळी | ... | ... | कुंती = एक प्रकारचें झाड. |
| १३ केदगी बळी | ... | ... | केदगी = केवडा. |
| १४ मच्छोळी बळी | ... | ... | मच्छू किंवा मच्छी = कुऱ्हाड. |
| १५ मजकळ बळी | ... | ... | |

| | | | |
|---|---|---|---|
| १६ मनाल बळी | ... | ... | मनाल=एक प्रकारचें झाड. |
| १७ मंजळ बळी | ... | ... | मंजाळ=केशर. |
| १८ मस्किन बळी | ... | ... | मस्किन=नदींतील एक प्रकारचा मासा. |
| १९ नाग बळी | ... | ... | नागचांफा. |
| २० शिरिन बळी | ... | ... | शिरकल=एक प्रकारचें झाड. |

ह्या बळींवरून ह्या जातीचे लोक येथील मूळ रहिवासी असावे असें स्पष्ट दिसतें. उदाहरणार्थ, केदगीचीं झाडें कानडा जिल्ह्यांतील ओढयांत व नदींत सर्वत्र आढळतात. केदगी बळीचे लोक तीं झाडें तोडीतही नाहींत किंवा त्यांचीं फुलेंही खुडीत नाहींत. वर्गळ बळीचे लोक बर्गा जातीच्या हरणास मारीत नाहींत किंवा त्याचें मांसही खात नाहींत. शिरिन बळीचे लोक शिरकलाच्या झाडाखालीं बसत नाहींत किंवा त्यास कोणत्याही प्रकारें इजाही करीत नाहींत. वारसाहक्क मात्र पितृवंशाच्या बळीकडून गणला जातो. बहुतेक मूळ रहिवाशांच्या जातींत हा हक्क स्त्रीवंशाकडून गणला जातो, किंवा स्त्री व पुरुष ह्या दोनही वंशांकडून गणला जातो. हा दुसरा प्रकार बहुतकरून पहिला प्रकार व हल्लीं प्रचलित असलेला प्रकार यांतील मधल्या स्थितीचा निदर्शक असावा.

एकाच बळीच्या लोकांत शरीरसंबंध होत नाहीं. आतेबहिणीशीं अथवा मामेबहिणीशीं लग्न करितां येतें. मुलींचीं लग्नें बहुधा आठ ते सोळा आणि मुलांचीं बारा ते अठरा वर्षांच्या दरम्यान करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे, पण विधवाविवाह करणें प्रशस्त मानीत नाहींत. नवऱ्यास बायकोस सोडचिठ्ठी देतां येते. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रीस नवरा जिवंत असेपर्यंत दुसरें लग्न करतां येत नाहीं.

कानडा जिल्ह्यांतील पुष्कळ जातींप्रमाणें हालवक्की वक्कलांवरही रामानुजाच्या वैष्णव पंथाचा बराच पगडा बसलेला दिसतो. त्यांचा कुलदेव तिरुपतीचा व्यंकटरमण. ते ब्राह्मणांस मान देतात, पण कोणताही विधि चालविण्याच्या कामीं

त्यांची योजना करीत नाहींत. मृतांस जाळतात. त्यांच्या शांत्यर्थ दर वर्षी जातीच्या लोकांस जेवण देतात.

हालवक्की वक्कल शेतीचा धंदा करितात. घरचें काम नसेल तेव्हां कित्येक लोक दुसऱ्याच्या शेतांवर मजुरीही करितात.

ते मांस खातात. ते दारूला कधींही स्पर्श करीत नाहींत, इतकेंच नव्हे तर माडाची माडी काढीत असतांना त्या झाडाखालीं उभेही राहात नाहींत.

**हलसावा**—महार जातींचें दुसरें नांव.

**हलालखोर**—भंगी जातींचें दुसरें नांव.

**हळेपैक**—फक्त कानडा जिल्ह्यांतच आढळतात. हळेपैक हा शब्द 'हळे' म्हणजे 'जुने' आणि 'पैक' म्हणजे 'शिपाई' ह्या शब्दांवरून निघाला आहे असें मानण्यांत येतें. कानडा जिल्ह्यांत कुमारपैक नांवाची जी दुसरी एक जात आहे तिच्या नांवाची व्युत्पत्तीही याच प्रकारें लावण्यांत येते. यावरून वर दिलेली 'हळेपैक' ह्या शब्दाची व्युत्पत्ति असंभवनीय मानतां येत नाहीं. ब्रिटिश अमलाच्या सुरवातीस हळेपैक आणि कोमारपैक लढवय्ये असून ते दरोडे घालून व लूटमार करून लोकांस अतिशय उपद्रव देत असत. ह्या गोष्टीवरूनही वरील विधानास बळकटी येते. हळेपैकांच्या उत्पत्तीसंबंधीं खात्रीलायक माहिती कांहींच सांपडत नाहीं; परंतु त्यांच्यांतील कांहीं पोटभेदांचा स्वामी अनेगुंदी ( विजयानगर ) येथें राहतो व त्यांच्यांत प्रचलित असलेल्या दंतकथा त्यांचा संबंध विजयानगरच्या राज्याशीं जोडतात, यावरून एके काळीं विजयानगरच्या राजाच्या लष्करांत त्यांच्यांतील पुष्कळ लोक होते असें दिसतें. दक्षिण कानडांतील बिल्लव किंवा धीवर आणि मलबारचे तियन ह्यांच्याशीं हळेपैकांचा कांहीं संबंध असावा असें दिसतें. ह्या सर्वांचा मुख्य धंदा ताडी काढण्याचा आहे.

हळेपैकांत तेंगिन धीवर किंवा तेंगिन मक्कळु आणि बैनु धीवर किंवा कान धीवर असे दोन पोटभेद आहेत. तेंगिन मक्कळु किंवा "माडाचीं अपत्यें" समुद्रकिनाऱ्यावर राहतात. त्यांस नामधार किंवा त्रिनामधार असेंही म्हणतात. बैनु घाटांवर राहतात.

हळेपैकांत अनेक बळी आहे. ते असे.

## तेंगिन धीवर

| | | | |
|---|---|---|---|
| १ शेट्टी बळी | ... | ... | शेट्टी=मासा. |
| २ होन्ने बळी | ... | ... | होन्ने=एक प्रकारचें झाड. |
| ३ चेंडी बळी | ... | ... | चेंडी=एक प्रकारचें झाड. |
| ४ तोळण बळी | ... | ... | तोळा=लांडगा. |
| ५ देवन बळी | ... | ... | देवन=एक प्रकारचें झाड. |
| ६ होले बळी | ... | ... | होले=एक प्रकारचें झाड. |
| ७ भैरण बळी | ... | ... | भैरण=एक प्रकारचा पक्षी. |
| ८ केन्डी बळी | ... | ... | केन्डी=एक प्रकारचें झाड. |
| ९ हंडी बळी | ... | ... | हंडी=डुकर. |
| १० नाग बळी | ... | ... | नागचांफा. |
| ११ वली बळी | ... | ... | वली=वेल. |
| १२ शिगे बळी | ... | ... | शिगे=शिकेकाई. |
| १३ अजने बळी | ... | ... | अज्ज=एक प्रकारचें झाड. |
| १४ कन्ने बळी | ... | ... | कन्न=एक प्रकारचें झाड. |
| १५ शिंवन बळी | ... | ... | शिवनी=एक प्रकारचें झाड. |
| १६ गंगा बळी | ... | ... | गंगावळी नदी. |
| १७ सल्यण बळी | ... | ... | सलेर=साळू. |
| १८ मनाल बळी | ... | ... | मनाल=एक प्रकारचें झाड. |
| १९ शिरे बळी | ... | ... | शिरे=एक प्रकारचें झाड. |
| २० अरशिन बळी | ... | ... | अरसिन=हळद. |

## बैनू धीवर

| | | | |
|---|---|---|---|
| १ महार बळी | ... | ... | माडाचें झाड. |
| २ बंगार बळी | ... | ... | बंगार=सोनें. |
| ३ कडवे बळी | ... | ... | कडवे=सांबर. |
| ४ सर्पण बळी | ... | ... | सर्प. |

ह्यांशिवाय तेंगिन धीवरांतील पहिले सहा बळीही यांच्यांत सांपडतात. प्रत्येक बळीनें दर्शविलें जाणारें झाड, प्राणी वगैरे त्या त्या बळीचे लोक पूज्य मानतात. ते त्याची पूजा करितात व त्यास कोणत्याही प्रकारें इजा करीत नाहींत. बळी स्त्रीवंशाकडून गणला जातो, ह्यावरून ह्यांच्यांत पूर्वीं बहुपतिकत्वाची चाल असून हे दक्षिण हिंदुस्थानांतील मूळ रहिवाशांपैकीं असावे असें दिसतें.

एकाच बळीच्या लोकांचा शरीरसंबंध होत नाहीं. मामेबहिणीशीं लग्न लावतां येतें, पण आतेबहिणीशीं लावतां येत नाहीं. समुद्रकिनाऱ्यावर राहणाऱ्या हळेपैकांत मुलीचें लग्न ती वयांत येण्यापूर्वीं करण्याची चाल आहे. घांटावरील हळेपैक मुलींचीं लग्नें त्या सोळा वर्षांच्या होईपर्यंत करितात. नवऱ्यास मुलीच्या आईबापांस वीसपासून शंभर रुपयेपर्यंत तेरू (मुलीची किंमत) द्यावी लागतो. हें देणें वांचविण्यासाठीं कधीं कधीं उलटसुलट लग्नें करितात. हें न जुळल्यास नवरीचा बाप नवऱ्यास दत्तक जांवई (मने–अलय) करितो. असें केलें म्हणजे नवऱ्यास नवरीच्या घरीं रहावें लागून तेथें काम करावें लागतें. ह्या कामाबद्दल त्यास नफ्यांतील कांहीं हिस्सा मिळतो. विधवाविवाहास मोकळीक आहे. सोडचिठ्ठी देतां येते. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रीस नवरा जिवंत असेपर्यंत दुसरें लग्न करतां येत नाहीं.

उत्तर कानडा जिल्ह्यांतील हळेपैक वारसाहक्कासंबंधीं हिंदु कायदा पाळतात; दक्षिण कानडांतील हळेपैक अळयसंतान कायदा पाळतात, म्हणजे त्यांच्यांत वारसाहक्क स्त्रीवंशाकडे जातो. हळेपैक रामानुज पंथाचे अनुयायी आहेत. ते तिरुपतीच्या व्यंकटरमणास विशेष भजतात. त्यांचे उपाध्ये सागर जिल्ह्यांतील त्रिनामधारी वैष्णव ब्राह्मण असतात. स्थानिक ब्राह्मणांपैकीं फक्त सकलापुरी त्यांच्या येथें उपाध्येपण करितात. हविक अथवा इतर ब्राह्मणांनीं तसें केल्यास त्यांस जातीबाहेर टाकतात. ते मृतांस जाळतात. समुद्र किनाऱ्यावर राहणारे कांहीं हळेपैक श्राद्धें करितात. घांटावरील हळेपैक फक्त महालयच करितात.

हळेपैकांचा परंपरागत धंदा ताडी काढण्याचा आहे. त्यांच्यांतील पुष्कळ लोक शेतीही करितात, खाणींतून दगड काढतात आणि सुताराचें व लोहाराचेंही काम करितात.

हळेपैक मांस खातात. किनाऱ्यावर राहणारे हळेपैक दारू पीत नाहींत, घांटावर राहणारे पितात.

**हळ्ळीर**—फक्त कानडा जिल्ह्यांत आढळतात. त्यांचें मूलस्थान तिरुपती आहे असें मानण्यांत येतें. ते दहाबारा पिढ्यांपूर्वी कानडा जिल्ह्यांत आले व कारवारजवळ माजाळी व बाड येथें स्थायिक झाले. तेथून ते हळू हळू दक्षिणेकडे होनावरपर्यंत पसरले. कारवार येथील हळ्ळीर आपलें नांव वाजंत्री आहे असें सांगतात, आणि गोकर्ण, हिरगुत्तीर आणि हेगडे येथील हळ्ळीरांशीं आपला कांहीं संबंध नाहीं असें म्हणतात. ते सांगतात कीं, आपल्याशिवाय इतर हळ्ळीर अस्पृश्य असून त्यांना देवळांत अगर ब्राह्मणांच्या लग्नामुंजींत वाद्यें वाजवूं देत नाहींत. सर्वच हळ्ळीरांस अस्पृश्य मानण्यांत येतें असें दिसतें. कारवारांतील हळ्ळीर इतर वाजंत्र्यांच्या चालीरीतींचें अनुकरण करून आपली अस्पृश्यत्वापासून मुक्तता करूं पहात आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं.

ज्यांच्याशीं पूर्वीचा संबंध आढळून येतो अशाच कुटुंबांचा परस्पर शरीरसंबंध होतो. आतेबहिणीशीं अथवा मामेबहिणीशीं लग्न करतां येतें. मावसबहिणीशीं करतां येत नाहीं. मुलांचीं लग्नें बहुधा पंधरा ते पंचवीस आणि मुलींचीं आठ ते तेरांच्या दरम्यान करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. अविवाहितास विधवेशीं लग्न करतां येत नाहीं. सोडचिठ्ठी देतां येतें. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रीस विधवाविवाहविधीनें दुसरें लग्न करतां येतें.

हळ्ळीर मुख्यत्वेंकरून वेताळ, बीर, म्हस्ती इत्यादि ग्रामदेवतांस भजतात. ते मामाई किंवा महामाई हिची विशेष भक्ति करितात. त्यांचे धर्मविधि जातीचेच लोक चालवितात. कधीं कधीं लग्नें चालविण्याच्या कामीं कर्नाटक ब्राह्मणांची योजना करण्यांत येते. पण अशा ब्राह्मणांस प्रायश्चित्त घेतल्याशिवाय पुनः जातींत घेत नाहींत.

मृतांस जाळतात अथवा पुरतात. ते श्राद्ध करीत नाहींत.

हळ्ळीरांचा परंपरागत धंदा वाद्यें वाजविण्याचा आहे. पुष्कळ जातींचे लोक लग्नांत आणि इतर समारंभांत वाद्यें वाजविण्याच्या कामीं हळ्ळीरांचीच

योजना करितात. खेड्यांतील देवळांत वाद्यें वाजविण्याचा त्यांचा वंशपरंपरागत हक्क आहे.

ते मांस खातात व दारू पितात.

**हाती**—मुख्यत्वेंकरून काठेवाडांतील सोराठ प्रांतांत आढळतात. चितोडच्या सिसोदिया रजपुतांचे आपण वंशज असून आपला मूळ पुरुष हाथीसिंघ या नांवाचा होता असें ते सांगतात.

हातींत सखायत आणि अवर्तिया असे दोन पोटभेद आहेत. त्यांच्यांत पांच मुख्य कुळें आहेत. सखायत हातींचीं अवर्तिया हातींशीं अथवा अवर्तिया काठींशींही लग्नें होतात, पण सखायत काठींशीं होत नाहींत. कधीं कधीं ते अहिरांशींही लग्नें करतात. आतेबहिणीशीं अथवा मामेबहिणीशीं लग्न करितां येतें, पण मावसबहिणीशीं करितां येत नाहीं. मुलींचीं लग्नें बहुधा दहा वर्षांच्या सुमारास करितात, मुलांचीं विसांच्या सुमारास करितात. विधवाविवाहास मोकळीक आहे. सोडचिठ्ठी देतां येते. सोडचिठ्ठी दिलेल्या स्त्रीस विधवाविवाहविधीनें दुसरें लग्न करतां येतें.

हाती स्वामीनारायण आणि रामदासी पंथाचे अनुयायी आहेत. त्यांच्या कुलदेवता नाग आणि चामुंडा. त्यांचे उपाध्ये ब्राह्मण असतात.

मृतांस जाळतात. त्यांच्या शांत्यर्थ श्राद्धपक्ष करितात.

हाती आपला मूळ धंदा शिपाईगिरीचा होता असें म्हणतात, आणि इतिहासाचाही त्यास आधार आहे. हल्लीं त्यांच्यांत थोडेसे जमीनदार आहेत, पुष्कळ लहान वतनदार आहेत, आणि कांहीं शेती व मजुरी करितात.

ते मांस खातात व दारू पितात.

**हिजडा**—पावैय्या जातीचें दुसरें नांव.

**हजुरी**—खवास जातीचें दुसरें नांव.

**हुसेनी ब्राह्मण**—सहदेव जोशी या जातीचें दुसरें नांव.

**हेब्बे गौडा**—मुकरी जातीचें दुसरें नांव.

**होलार**—होलिया जातीचें दुसरें नांव.

**होलिया**—किंवा होलार मुख्यत्वेंकरून कर्नाटकांत आढळतात. ते दक्षिण महाराष्ट्रांतही कांहीं ठिकाणीं आढळतात. त्यांस जंबू किंवा वलेर अशींही नांवें आहेत. होलिया किंवा होलार हा शब्द 'होला' म्हणजे शेत किंवा 'होले' म्हणजे विटाळ ह्या शब्दापासून निघाला असून तो त्या जातीच्या हलकेपणाचा निदर्शक आहे. गुजराथेंतील धेड व महाराष्ट्रांतील महार यांच्याप्रमाणेंच ते कर्नाटकांतील मूळ रहिवासी असून, त्यांच्याप्रमाणेंच ते वंशपरंपरागत खेड्यांतील रखवालदार आहेत. ते मेलेल्या गुरांस ओढून नेतात आणि त्यांचीं कातडीं-शिंगें विकतात. ते मेलेल्या जनावरांचें मांस खातात, व महारधेडांप्रमाणेंच त्यांस अस्पृश्य मानण्यांत येतें.

कर्नाटकांतील होलियांत होलिया आणि पोट्जा असे दोन पोटभेद आहेत. त्यांचा परस्पर रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. महाराष्ट्रांतील होलारांत पंधरा पोटभेद आहेत. ते असेः—(१) आयवळे, (२) भिरलिंगे, (३) धनवट, (४) गारोडे, (५) गिजगे, (६) गोत्रंग, (७) गुलीक, (८) जाबीर, (९) कामळे, (१०) कर्डे, (११) हालमणे, (१२) मानवत, (१३) नमदामे, (१४) पार्शा, (१५) वागार. त्यांच्यांत अनेक कुळें आहेत. एकाच कुळांतील लोकांचा शरीरसंबंध होत नाहीं. देवक एक असलें तरीही शरीरसंबंध होत नाहीं. त्यांच्यांत कुऱ्हाड, चाट, सूर्यफूल, पांचपालवी इत्यादि देवकें आहेत. मामेबहिणीशीं लग्न करितां येतें, पण आतेबहिणीशीं अथवा मावसबहिणीशीं करितां येत नाहीं. विधवाविवाहास मोकळीक आहे. सोडचिठ्ठी देतां येते.

होलिया हिंदूंच्या मुख्य देवांस भजत नाहींत. त्यांच्या कुलदेवता यामव्वा, दुर्गव्वा, उडचव्वा, यल्लवा, मर्गव्वा, हिनोड्या आणि व्यंकटरमण ह्या आहेत. मृतांस पुरतात. ते श्राद्धें करीत नाहींत.

ते गोमांसासुद्धां सर्व प्रकारचें मांस खातात व दारू पितात.

**क्षत्रिय यदुवंशी**—भाटिया जातीचें दुसरें नांव.

**क्षत्री**—खत्री जातीचें दुसरें नांव.

**क्षौरक**—न्हावी जातीचें दुसरें नांव.

# श्री सयाजीग्रंथमालेंतून प्रसिद्ध झालेल्या मराठी ग्रंथांची यादी.

## ( १ ) श्रीसयाजीसाहित्यमाला.

| ग्रंथानुक्रम | ग्रंथाचें नांव | किंमत |
|---|---|---|
| १ | **संस्कृत वाङ्मयाचा इतिहास–( इतिहासगुच्छ )-** लेखक रा. रा. सीताराम वासुदेव पेंडसे बी. ए., एम् सी. पी., एफ्. आर्. सी. आय. Macdonnel's History of Sanskrit Literature ह्या पुस्तकाचें भाषांतर. वेदकाळ, वेदांतील कविता, तत्त्वविचार, सामाजिक स्थिति, ब्राह्मणग्रंथ, सूत्र, पुराण, काव्य, नाटक, तत्त्वज्ञान, वगैरे विषयांचा इतिहास या पुस्तकांतून देण्यांत आला आहे. | २-८-० |
| १० | **बालोद्यानपद्धतीचें गृहशिक्षण--( शिक्षणगुच्छ )** सचित्र. लेखक रा.रा. वासुदेव गोविंद आपटे बी. ए., Kindergarten Teaching at Home ह्या ग्रंथाचा अनुवाद. पाठ कसा द्यावा याचा विचार, शिक्षणाचें साधन या दृष्टीनें खेळाचा विचार, वाचन व लेखन शिकविणें, प्राथमिक गणित, हातकाम, शाळेंतल्या इतर विषयांतले प्राथमिक पाठ, एक आठवड्यापुरत्या अभ्यासाचें पत्रक, इतके विषय ह्या | |

| ग्रंथानुक्रम | ग्रंथाचें नांव | किंमत |
|---|---|---|
| | ग्रंथांत दिले आहेत; आणि यावरून घरीं लहान मुलांना शिकवितां येतें. | ०-८-० |
| १९ | **सुधारणा आणि प्रगति-(प्रकीर्णगुच्छ)**-द्वितीयावृत्ति. लेखक रा. रा. दाजी नागेश आपटे बी. ए., एल्एल्. बी. Crozier's Civilization and Progress ह्या ग्रंथाचा अनुवाद. प्रमाणचिकित्सा, साध्यमीमांसा, विषयविवेचन आणि उपसंहार ह्या चार परिच्छेदांतून इतिहास, सुधारणेचा मार्ग, परिस्थितीचें समीकरण, समाजरचना, जनताधर्म, धर्मसाधन, राजकीय अनुशासन वगैरे विषयांचें उत्कृष्ट विवेचन केलेलें आहे. ग्रंथ फार उपयोगी व लोकप्रिय झाला आहे व त्याचें गुजराथी व हिंदी या भाषांतून भाषांतर झालें आहे. | ३-०-० |
| २१ | **शिस्त-( प्रकीर्णगुच्छ )**-लेखक कर्नल नानासाहेब शिंदे व मेजर के. एन्. सावंत, स्वतंत्र मराठी पुस्तक. लष्करी दृष्टीनें गृहशिक्षण, शाळाशिक्षण, खेळ, व्यवहार वगैरेंतून शिस्तीची उपयुक्तता, नीतिविषयक व धार्मिक शिस्तीचा ऐतिहासिक दृष्ट्या विचार, हे विषय ह्या ग्रंथांत दिले गेले आहेत. | १-०-० |
| २३ | **दीघनिकाय भाग १ ला-( धर्मगुच्छ )**-लेखक रा. रा. चिंतामण वैजनाथ राजवाडे एम्. ए., बी. | |

| ग्रंथानुक्रम | ग्रंथाचें नांव | किंमत |
|---|---|---|
| | एम्.सी. पाली भाषेंतील ग्रंथाच भाषांतर. बौद्धपंथाचा मूळ ग्रंथ 'त्रिपीटक' याचे तीन भाग आहेत. त्यापैकीं 'सुत्तपीटकां'तून बुद्ध भगवानानें वेळोवेळीं केलेल्या उपदेशांचा संग्रह केला आहे. त्याचे पांच भाग आहेत; त्यांपैकीं 'दीघनिकाय' हा एक भाग आहे. त्यांत मोठ्या सूत्रांचा संग्रह केला आहे त्याचें हें भाषांतर आहे. | १-८-० |
| ३९ | **हिंदुस्तानचा लष्करी इतिहास व दोस्त राष्ट्रांच्या फौजा**-( **प्रकीर्णगुच्छ** )-लेखक कर्नल नानासाहेब शिंदे. स्वतंत्र मराठी पुस्तक. ह्या ग्रंथांतून वेदकालापासून आधुनिक काळापर्यंतचा लष्करा इतिहास दिला आहे; इतकेंच नव्हे तर देशी संस्थानें, इंग्रज सरकार, ग्रेटब्रिटन, फ्रेंच, रशियन, इटालियन अमेरिकन व जर्मन या राष्ट्रांच्या फौजा ह्या संबंधानेंहि हकीकत दिलेली आहे. | २-८-० |
| ४१ | **महाराजा शिवाजी**--( **चरित्रगुच्छ** )--लेखक रा. रा. सीताराम वासुदेव पेंडसे बी. ए., एफ्. आर. सी. आय्, एम. सी. पी. स्वतंत्र मराठी पुस्तक.यांत महाराष्ट्रवीर शिवाजी महाराजांचें चरित्र दिलें आहे. | १-६-० |

| ग्रंथानुक्रम | ग्रंथाचें नांव | किंमत. |
|---|---|---|
| ६५ | **हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास** मराठी रियासत ( मध्यविभाग ). इतिहासगुच्छ द्वितीयावृत्ति. लेखक रा. रा. गोविंद सखाराम सरदेसाई बी. ए. स्वतंत्र मराठी पुस्तक. अनेक आधारांचें दोहन करून छत्रपति शाहू महाराजांचा इतिहास व बाळाजी विश्वनाथाच्या उदयापासून बाजीरावानें दिल्लीवर स्वारी केली तेथपावेतों जो इतिहास घडला त्याची हकीकत व बाजीरावाची योजना आणि त्याचें जीवनचरित्र यांत दिलें आहे. | २-१२-० |
| ६६ | **हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास ( मध्यविभाग भाग** )१७४०-१७६१(इतिहासगुच्छ ). लेखक रा. रा. गोविंद स. सरदेसाई बी. ए. स्वतंत्र. नवीन पेशव्याच्या उपक्रमापासून इंग्रज लोकांची हकीकत देऊन नागपुरकर भोंसल्यापर्यंतची सगळी उपयुक्त हकीकत ह्या ग्रंथांत दिली आहे. | ३-०-० |
| ६८ | **सदर-मध्यविभाग १७४०--१७६१ पानिपत प्रकरण इतिहासगुच्छ**-लेखक रा. रा. गो. स. सरदेसाई बी. ए. स्वतंत्र मराठी ग्रंथ. यांत रघुनाथरावांच्या पहिल्या स्वारीपासून पानिपतच्या भयंकर रणसंग्रामापर्यंतची माहिती देण्यांत आली आहे. | २-४-० |

| ग्रंथानुक्रम | ग्रंथाचें नांव | किंमत |
|---|---|---|
| ७३ | **जबाबदार राज्यपद्धति--( प्रकीर्णगुच्छ )**-लेखक स्व. महादेव रामचंद्र भिडे एम् ए. स्वतंत्र ग्रंथ. लोक आणि लोकमत, प्रतिनिधि आणि प्रतिनिधींची सभा, कायदे घडणारी मंडळी, हुकुमांची अम्मलबजावणी, राज्यबंधारण, वगैरे विषयांच्या संबंधानें उपयुक्त माहिती दिली आहे. | ०-१३-६ |
| ७४ | **मिराबाई-( चरित्रगुच्छ )**-लेखक रा. रा. दाजी नागेश आपटे बी. ए., एल्एल्. बी. गुर्जर कवयित्री मीराबाईच्या संबंधानें ह्या ग्रंथांत संपूर्ण माहिती दिली आहे. | ०-१५-० |
| ७९ | **इंग्रजी शिष्टाचार-( प्रकीर्णगुच्छ )**-लेखक रा. रा. चिंतामण विनायक जोशी, एम्. ए. Webb's English Etiquette ह्या ग्रंथाचें भाषांतर. यांत शिष्टाचाराचे सामान्य नियम, भेट घेणें, व्हिझिटिंग कार्डें, उपवन संमेलन, भोजनसमारंभ, वाटेंत भटण्याच्या प्रसंगाचे शिष्टाचार, दरबार, विवाह-समारंभ, प्रवास, सार्वजनिक ठिकाणें, गृहशोभा, सेवकांचा शिष्टाचार, त्यांचें काम, इतक्या विषयांचें विवेचन केलें आहे. | ०-१४-० |

| ग्रंथानुक्रम | ग्रंथाचें नांव | किंमत |
|---|---|---|
| ८३ | **पार्लमेन्ट-** ( इतिहासगुच्छ )-लेखक रा. रा. दाजी नागश आपटे बी. ए., एलएल्. बी. 'Parliament' by Sir Courtney P. Ilbert या ग्रंथाचा अनुवाद. पार्लमेंटची उत्पत्ति आणि वाढ, कॉमन्स सभची घटना, कायदे करण्याची पद्धति, जमाबंदी व राज्यकारभार, सभेचें अधिवेशन व कार्यपद्धति, सभची कार्यव्यवस्था, सभासद व मतदारसंघ, सभेचें दप्तर, छापखाना व लौकिकसंघ, हाऊस ऑफ लॉर्डस् व तुलनात्मक विवेचन, इतक्या प्रकरणांत मुख्य विषयाचें सुंदर विवेचन केलें आहे. | १-८-० |
| ८४-८५ | **सनईवादन पाठशाळा-**पुस्तक तिसरें व चवथें ( विज्ञानगुच्छ ). लेखक रा. रा. गणपतराव पिराजी वसईकर. | |
| | स्वतंत्र पुस्तक १ | ०-१२-० |
| | " पुस्तक २ | ०- ८-० |
| | " पुस्तक ३ | १- २-० |
| | " पुस्तक ४ | १-१२-० |
| | **सनई** कशी वाजवावी हें ह्या ग्रंथांतून शास्त्रीय रीतीनें दाखविलें आहे. | |
| | **सगुणोपासना व मूर्तिपूजा-**स्वतंत्र. लेखक रा. रा. शिवराम महादव फडके. मूर्तिपूजेच्या संबंधानें संपूर्ण माहिती ह्या ग्रंथांत दिली आहे. | १-८-० |

| ग्रंथानुक्रम. | ग्रंथाचें नांव. | किंमत. |
|---|---|---|
| ८७ | **नागरिकांचीं कर्तव्यें-( प्रकीर्णगुच्छ )**-लेखक रा. रा. कृष्णाजी गंगाधर गोगटे, बी. ए. यांत कुटुंब, शाळा, समाज, राज्य, ब्रिटिश राज्य, बडोदें राज्यांतील स्थानिक स्वराज्य, ग्रामपंचायत, वगैरे विषयांच्या संबंधीं नागरिकांचीं कर्तव्यें दाखविलीं आहेत. | ०-१४-० |
| ८८ | **सजीव सृष्टीची उत्क्रांति-( विज्ञानगुच्छ )**-सचित्र. लेखक रा. रा. सदाशिव नारायणराव दातार एम्. ए., बी. एस्सी. स्वतंत्र. ह्या ग्रंथांत उत्क्रांति-बद्दलचें ऐतिहासिक विवेचन, नैसर्गिक संमति, निषदसंबंधीं संमति, मानवजातीची उत्क्रांति, मनुष्या-सारखे वानर, मनुष्य वानरांपासून उत्पन्न झाला, आहे कीं काय, पशूंचें मन व त्यांची बुद्धि, मनु-ष्याची मानसिक उत्क्रांति, इत्यादि विषयांची चर्चा केली आहे. | २-११-० |
| ९० | **मराठ्यांच्या प्रसिद्ध लढाया-( इतिहासगुच्छ )** लेखक कर्नल नानासाहेब शिंदे. स्वतंत्र. ह्या ग्रंथांत मराठ्यांच्या मुख्य मुख्य लढायांचें सविस्तर वर्णन केलें आहे. | ३-०-० |
| ९१ | **यामिकप्रदीप, सचित्र, प्रथम भाग-( विज्ञान-गुच्छ )**-लेखक रा. रा. सखाराम विनायक आपटे | |

| ग्रंथानुक्रम | ग्रंथाचें नांव | किंमत |
|---|---|---|
| | एम्.ए., बी.एस्.सी. स्वतंत्र. ह्या ग्रंथांत यंत्रशास्त्राच्या विविध विषयांची सविस्तर हकाकत देण्यांत आली आहे. | |
| ९४ | **बडोद्याचें मराठी साहित्य-(प्रकीर्णगुच्छ)** लेखक रा. रा. गणेश रंगनाथ दंडवते, स्वतंत्र. बडोदें राज्यांत आजपावेतों प्रसिद्ध झालेल्या मराठी ग्रंथांची सविस्तर माहिती यांत दिली आहे. | ०-११-० |
| ९८ | **अप्रसिद्ध ऐतिहासिक चरित्रें-( इतिहासगुच्छ )** लेखक रा. रा. विनायक सदाशिव वाकसकर. स्वतंत्र. ह्यांत मराठ्यांच्या इतिहासांतील अज्ञात ऐतिहासिक व्यक्तींच्या संबंधानें आजपावेतों अप्रसिद्ध राहिलेली हकीकत देण्यांत आली आहे. | १-०-० |
| ११२ | **तत्त्वज्ञानांतील कूटप्रश्न-(विज्ञानगुच्छ)** लेखक रा. रा. दाजी नागेश आपटे बी. ए., एल्एल्. बी. पाश्चात्य व पौरस्त्य अशा दोन्ही पद्धतींच्या तत्त्वज्ञानाचा तुलनात्मक अभ्यास करण्यास उत्तम ग्रंथ. यांत नित्य व्यवहारांतील दृष्टांतांचे द्वारें सर्व विषय सोप्यापासून अवघड या रीतीनें समजाविला असल्यानें विद्यार्थ्यांस ता फार सुलभ व रसाळ झाला आहे. | १-०-० |

**ग्रंथांनुक्रम** | **ग्रंथाचें नांव** | **किंमत**

११३ **सुबोधकथामाला–( वार्तागुच्छ )** लेखक रा. रा. दाजी गोविंद चिपळूणकर. या पस्तकांत एकंदर साठ गोष्टी असून त्या नेहमीं व्यवहारांत घडणाऱ्या व पदोपदीं त्यांचा आपणांस अनुभव येण्यासारख्या आहेत. लहान मुलाच्या मनावर यांतील नीतितत्त्वांचा चांगलाच परिणाम घडण्यासारखा आहे. शाळेंत जाणाऱ्या विद्यार्थ्यांस गणित, भूगोल, व्याकरण व इतिहास हे विषय जसे त्यांचे शिक्षक त्यांस मनापासून शिकवितात, त्याचप्रमाणें शिक्षकानें शाळेंत व आईबापांनीं घरीं, नीतिशिक्षण हें आपल्या मुलांस अवश्य दिलें पाहिजे. ०-१५-०

११४ **सुप्रजाजननशास्त्र--(विज्ञानगुच्छ)** लेखक रा. रा. गजानन नारायण मोडक बी. एजी. सुप्रजाजननशास्त्रावर पाश्चात्य देशांत अनेक ग्रंथ तयार झाले असून याच धर्तीवर मराठी भाषेंत हें पुस्तक तयार करण्यांत आलें आह. उत्तम प्रकारची संतति कशी निर्माण करतां येईल, हें या पुस्तकांत उत्कृष्ट तऱ्हेनें दाखविलें आहे. ०-१२-०

११९ **मुक्या मुलांचें गृहशिक्षण-(विज्ञानगुच्छ)** लेखक रा. रा. पांडुरंग रामचंद्र नंदुरबारकर. मूकशिक्षण

| ग्रंथानुक्रम | ग्रंथाचें नांव | किंमत |
|---|---|---|
| | आपल्या देशांत नवीन आहे. युरोप, अमेरिका वगैरे खंडांतून तें रूढ झालें आहे. त्याविषयीं एक ओळहि आपल्या देशांतील भाषांतून कोठून सांपडणार ? मराठींत हें पुस्तक पहिलेंच आहे. मुक्या व बहिऱ्या मुलांच्या पालकांनीं हें पुस्तक अवश्य वाचावें. | ०-१४-० |
| १२० | **कादंबरीची गोष्ट—( प्रकीर्णगुच्छ )**—लेखक रा. रा. गणेश रंगनाथ दंडवते, लायब्रेरियन, सेंट्रल लायब्ररी, बडोदें स्वतंत्र. हें पुस्तक आपल्या नांवाप्रमाणें खरोखरीच मराठी कथावाङ्मयाचा इतिहास गोष्टीच्या रूपानें व मनोरंजक रीतीनें निवेदन करतें. | १-०-० |
| १२३ | **हिंदुस्थानच्या इतिहासांतील गोष्टी ( इतिहासगुच्छ)**—लेखक रा. रा. महादेव मुकुंद जोशी. आर्य लोकांनीं पंजाबांत पंचनद्यांच्या दोआबांत आपली वस्ती केली तेथपासून इ. स. ९९९ पावेतों इतिहास त्रोटक रीतीनें ह्या पस्तकांत आलेला आहे. | ०-१३-० |
| १२७ | **पं. जगन्नाथराय चरित्र आणि संगीत गंगालहरी--( चरित्रगुच्छ )**-लेखक रा. रा. रामराव मार्तंड भांबुरकर. ह्या ग्रंथांतून पंडित जगन्नाथराय | |

| ग्रंथानुक्रम | ग्रंथाचें नांव | किंमत |
|---|---|---|
| | यांचें विस्तृत जीवनचरित्र दिलें असून साग्रसंगीत गंगालहरी काव्य दिलें आहे. पुस्तक खरोखर नवीन माहितीनें भरलेलें असून वाचण्यासारखें आहे. | १-०-० |
| १२८ | **चीन देशांतील सुधारणा--( इतिहासगुच्छ )** लेखक रा. रा. राजाराम नारायण पाटकर बी. ए. *Civilization is china* नामक इंग्रजी ग्रंथाचा अनुवाद म्हणून हा ग्रंथ तुलनात्मक दृष्टीनें अत्यंत उपयुक्त असून हिंदुस्थानांतील व चीन देशांतील संस्कृतीचें साम्य त्याच्यांतून स्पष्ट होतें. | १-४-० |
| १३८ | **मुंबई इलाख्यांतील जाती— ( प्रकीर्णगुच्छ )** लेखक रा. रा. गोविंद मंगेश कालेलकर. *Tribes and Castes of Bombay* नामक ग्रंथाचा अनुवाद म्हणून हा ग्रंथ अत्यंत उपयुक्त माहितीनें भरलेला असून जातींच्या संबंधानें सर्व माहिती त्याच्यांतून मिळूं शकते. | २-०-० |

### ( २ ) श्रीसयाजी बालज्ञानमाला.

| | | |
|---|---|---|
| ४७ | **छत्रपति संभाजी महाराज-( चरित्रगुच्छ )-** लेखक रा. रा. केशव मंगेश रांगणेकर बी. ए. ह्या लहान ग्रंथांत छत्रपति संभाजी महाराजांचें संपूर्ण जीवनचरित्र दिलें आहे. | ०-६-० |

| ग्रंथानुक्रम | ग्रंथाचें नांव | किंमत |
|---|---|---|
| ४८ | **महाराणा प्रताप** ( **चरित्रगुच्छ** )-लेखक परशुराम काटदरे बी. ए. यांत सुप्रसिद्ध क्षत्रिय वीर महाराणा प्रताप याचं सविस्तर चरित्र देण्यांत आलें आहे. | ०-६-० |
| ६० | **कोषांचें वर्णन** -( **विज्ञानगुच्छ** )-लेखक रा. रा. रघुनाथ बळवंत फलणीकर बा. ए. प्राणिशास्त्रासारख्या नीरस विषयासंबंधीचें हें पुस्तक फार सुबोध व सरस उतरलें आहे. आपल्या शरीरामध्यें जे Cells ( कोष ) म्हणून असतात, त्यांच्यासंबंधानें संपूर्ण शास्त्रीय माहिती ह्यांतून मिळते. | ०-६-० |
| ७१ | **विलियम एवर्ट ग्लॅडस्टन**-(**चरित्रगुच्छ**)-लेखक रा. रा. विष्णु पांडुरंग नेने, बी. ए. यांत सुप्रसिद्ध इंग्रज राजनीतिनिपुण ग्लॅडस्टन साहेब यांचें सविस्तर चरित्र देण्यांत आलें आहे. | ०-६-० |
| ७२ | **संपत्ति व भांडवल**-(**विज्ञानगुच्छ**)-लेखक रा. रा. भास्कर त्रिंबक काळे, बी. ए. प्रस्तुत सारख्या शास्त्रीय विषयावर हें पुस्तक सोप्या व सरळ भाषेंत लिहिलें आहे. | ०-६-० |

